*राष्ट्रीय चरित्र माला*

# छत्रपती शिवाजी

सेतुमाधवराव पगडी




नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# अनुक्रमणिका

*प्रस्तावना*

1. प्रारंभीची वर्षे 1
2. शिवाजी महाराज आणि अफजलखान 26
3. शिवाजी महाराज आणि शायिस्तेखान 37
4. शिवाजी महाराज आणि जयसिंग 56
5. महाराजांची आग्रा भेट आणि सुटका 66
6. मोगलांशी युद्ध 86
7. सन 1673 तील युद्ध 104
8. राज्याभिषेक आणि नंतर 114
9. शेवटची दोन वर्षे 140
10. उपसंहार 150

*निवडक संदर्भ ग्रंथ* 157

# प्रस्तावना

भारताच्या श्रेष्ठ राष्ट्रपुरुषांत शिवाजीमहाराजांची गणना होते. शिवाजीमहाराज हे जितके निष्ठावंत तितकेच कर्तव्यनिष्ठ होते. ते असामान्य होते. ते मुत्सद्दी आणि सेनानायक होते. त्यांनी एक राष्ट्र निर्माण केले, आपल्या समाजापुढे एक ध्येय ठेवले. ह्या ध्येयासाठी लढणे आणि प्राणत्याग करणेही कसे श्रेयस्कर आहे हे दाखवून दिले. त्यांनी स्वराज्याची स्थापना केली; असे स्वराज्य की ज्यामधील सारे वातावरण न्याय, नीती आणि सहिष्णुता यांनी भरलेले होते. ते खऱ्या अर्थाने कल्याणकारी, उदारमतवादी आणि धर्मनिरपेक्ष असे राजे होते.

पण असे राज्य अस्तित्वात येईल याचा कुणाला तरी विश्वास वाटू शकला असता काय? विजापूरचे राज्य हेच मुळी मोगल साम्राज्याचे मांडलिक राज्य. त्या विजापूर राज्यातील एका सरंजामी सरदारांचा हा मुलगा. हा आपल्या अवघ्या 50 वर्षांच्या आयुष्यात मोगलांना आव्हान देईल, आणि एतद्देशीय लोकांचे मोठे राज्य, हिंदवी स्वराज्य निर्माण करील अशी कुणालाही कल्पना आली नसती. महाराज हे उत्कृष्ट सैनिक, योद्धे आणि सेनानायक होते. त्यांनी आपले सैन्य हे खऱ्या अर्थाने राष्ट्रीय सैन्य बनवले. सैन्यातील शिस्त मोठी कडक असे. सैन्याच्या हालचाली अतिशय चपळ होत. हेरखाते उत्कृष्टपणे काम करी, संरक्षणाच्या लहानमोठ्या बाबींकडे सतत लक्ष पुरविण्यात येई. ही महाराजांच्या लष्करी यंत्रणेची वैशिष्ट्ये होती, आणि यामुळेच ते आपल्या शत्रूचा पुन:पुन्हा पराभव करू शकले. सागरी किनारपट्टीच्या संरक्षणाकडेही त्यांनी दुर्लक्ष केले नाही. भारतीय नाविकदलाचे जनक असे त्यांना यथार्थतेने म्हटले जाते.

ते स्वराज्याच्या संरक्षणासाठी लढले. त्यांचा लढा असहिष्णुता, अन्याय, आणि वांशिक दुरभिमानाविरुद्ध होता. त्यांचे उदाहरण पाहून रजपूत, बुंदेले आणि इतर, यांना त्यांचे अनुकरण करण्याची स्फूर्ती मिळाली. काही काळातच महाराजांनी चालविलेल्या या उठावाला भारतव्यापी संघर्षाचे स्वरूप प्राप्त झाले. या संघर्षामुळे भारताचा राजकीय नकाशाच बदलून जाणार होता. पराजय झाला तरी महाराज डगमगून जात नसत. विजयाच्या वेळी ते शत्रूशी उदारपणाने वागत. त्यांच्यात धार्मिक भावना आणि श्रद्धा खोलवर रूजल्या होत्या. स्त्रीजातीच्या सत्वाची आणि मानाची ते अतिशय जपणूक करीत. सर्व धर्मांशी त्यांची वागणूक सहिष्णुतेची आणि उदारपणाची होती. त्या वृत्तींचा त्यांनी प्रचार केला, इतकेच नव्हे तर त्या त्यांनी प्रत्यक्ष आचरणात आणल्या. शिवाजीमहाराजांचे व्यक्तित्व आणि त्यांचा संदेश यांची गतकाळात जेवढी गरज होती तेवढीच ती आजही आहे.

**—सेतुमाधवराव पगडी**

# 1

# प्रारंभीची वर्षे

तो महिना होता फेब्रुवारीचा आणि वर्ष 1630. सम्राट अकबर ह्याच्या नेतृत्वाखाली विस्तारत जाणारे मोगल साम्राज्य दक्षिणेत शिरले होते. त्याने खानदेश, विदर्भ, आणि निजामशाही राज्याची राजधानी अहमदनगर, यांचा ताबा घेतला होता. इ.सन 1605 मध्ये अकबराचा मृत्यू झाला. ऐषारामी जहांगिरच्या कारकिर्दीत सेनापती आणि अधिकारी यांच्यातील भ्रष्टाचार आणि आपसातील भांडणे यांच्यामुळे अहमदनगरच्या सत्ताधिशांचा प्रधान हबशी मलिकअंबर याच्या लष्करी प्रतिभेपुढे मोगलांचे पाय सरकेनात. मलिकअंबरने मराठ्यांच्या चपळ आणि हलक्या घोडदळाचा आणि पायदळाचा पूर्ण उपयोग करून घेतला आणि गनिमी काव्याच्या बळावर मोगलांना जवळ जवळ 25 वर्षेपर्यंत थोपवून धरले.

मलिकअंबरचा मृत्यू सन 1626च्या मे महिन्यात झाला. त्यानंतर शाहजादा खुर्रम शहाजहान हा मोगल सिंहासनावर आरूढ झाला. या घटनेबरोबरच मोगलांची निष्क्रियता संपली. मराठा सरदार लखुजी जाधवराव हा वऱ्हाडचा प्रतिष्ठित उमराव होय. इ.स. 1628 मध्ये तो मोगलांना सोडून निजामशाही राज्याला येऊन मिळाला होता. पण तेथील दरबारी कारस्थानात त्याचा बळी गेला. एक वर्षानंतर तो आणि त्याचे नातेवाईक, ह्यांचे खून करण्यात आले. ह्या घृणास्पद घटनेची चीड येऊन लखुजी जाधवरावचा जावई, शहाजी भोसले यांनी निजामशाही घराण्याशी असलेली आपली निष्ठा काढून घेतली. शहाजी भोसले हे तरुण आणि तडफदार नेते. त्यांनी मलिकअंबरच्या नेतृत्वाखाली सन 1624च्या ऑक्टोबर महिन्यातील भातवडीच्या लढाईत उत्कृष्ट कामगिरी बजावली होती. शहाजींना विजापूरच्या चाकरीत परत जाणे शक्य नव्हते कारण त्यांनी रागानेच विजापूरची चाकरी सोडली होती. विजापूरच्या सैन्याने त्यांच्या पुण्याच्या जहागिरीवर आक्रमण केले. शहाजी हे अहमदनगर राज्यातील जुन्नरजवळील शिवनेरी किल्ल्यावर आले. तेथे त्यांचा मोठा मुलगा संभाजी याचा विवाह शिवनेरीचा किल्लेदार विश्वासराव ह्याच्या मुलीशी घडवून आणायचा होता. ह्या घटनेनंतर शहाजीने आपली पत्नी जिजाबाई

यांना शिवनेरीवर ठेवले. जिजाबाईना दिवस गेले होते. नंतर शहाजी हे आपल्या पथकांची पुनर्रचना करणे, जहागिरीच्या रक्षणाची व्यवस्था करणे आणि मोगलांना जाऊन मिळणे कितपत शक्य आहे ह्याचा अंदाज घेणे इत्यादी कामासाठी शिवनेरीहून निघाले.

अहमदनगरचे निजामशाही घराणे कायमचे संपवून टाकण्यासाठी शहाजहान आतूर झाला होता. दक्षिणेतील मोगल सुभेदार, खानजहान लोदी हा एक भ्रष्ट माणूस. त्याने लाच खाऊन मोगलांचे इलाखे घालविले होते. शहाजहानने त्याची बदली माळव्याच्या सुभ्यावर केली आणि निजामशहाला बालाघाटाचे महाल परत करण्यास भाग पाडले. खानजहान याला आग्र्याला बोलावून घेण्यात आले. आपल्याला शिक्षा होणार ह्या भीतीने तो पळून दक्षिणेकडे गेला. सन 1629 च्या नोव्हेंबर महिन्यात तो दौलताबाद येथे निजामशहाला जाऊन मिळाला. सन 1628 च्या 24 एप्रिल रोजी शहाजहानने खानजहानच्या जागी दक्षिणेचा सुभेदार म्हणून महाबतखान ह्याची नेमणूक केली. मार्च 1629 पर्यंत महाबतखानाचा मुलगा खानजहान हा दक्षिणेत आपल्या बापातर्फे नायब म्हणून काम पाहात होता. त्यानंतर इरादतखान या नवीन सुभेदाराची नेमणूक करण्यात आली. तोच पुढे आज्जमखान या पदवीने प्रसिद्ध झाला.

खानजहान हा निजामशहाला जाऊन मिळाला या घटनेने मोगलांच्या प्रतिष्ठेला फार मोठा धक्का बसला. शहाजहानने निर्धार केला की आपण दक्षिणेकडे जावे, खानजहानला शिक्षा करावी आणि निजामशाही राज्य एकदाचे नष्ट करून टाकावे.

विजापूर आणि गोवळकोंडा, या दक्षिणेतील राज्यांचे सुलतान हे मोगलांच्या दक्षिणेतील उसळलेल्या हालचालींकडे चिंताग्रस्त होऊन पहात होते. तोपर्यंत, सन 1630च्या 16 फेब्रुवारी रोजी शहाजहान हा खानदेशातील ब्ऱ्हाणपूर येथे येऊन दाखल झाला.

## जन्म

सहा दिवसानंतर सन 1630च्या 19 फेब्रुवारी रोजी[1] शिवनेरी ह्या निजामशाही किल्यात मोगल साम्राज्याला सर्वात मोठे आव्हान देणारे शिवाजीमहाराज ह्यांचा जन्म झाला.

---

1. लाहोरी, अब्दुल हमीद, *बादशाहनामा*

परमानंद हा एक विद्वान पंडित. शिवाजीमहाराजांशी त्याचा निकटचा संबंध. शिवाजीमहाराजांच्या सूचनेनुसार त्याने एक महाकाव्य रचले आहे. हे महाकाव्य म्हणजे 'शिवभारत' होय. या महाकाव्यात मालोजी, शहाजी आणि शिवाजी ह्या, भोसले घराण्यातील तीन पिढ्यांच्या जीवनातील घटनांचे वर्णन आहे. या समकालीन साधनांत शिवाजीमहाराजांची जन्मतारीख दिली आहे. अशीच जन्मतारीख 'जेधे शकावली' आणि राजस्थानमध्ये सापडलेल्या जन्मपत्रिका यांतून आली आहे. ही तारीख फाल्गुन वद्य तृतीया, शके 1552 अशी येते. इंग्रजी तारीख 11 फेब्रुवारी 1630 होय. इ. स. 1627 ही चिटणीस बखरीवरून पूर्वी घेण्यात आली होती. पण चिटणीस बखर ही उत्तरकालीन आहे. ह्या तारखेवर आता कोणीही विश्वास ठेवीत नाही.

शिवनेरीच्या किल्ल्यात शिवाजी महाराजांचा जन्म झाल्यावर अल्पकाळातच विजापूरच्या सैन्याने शहाजी राजांच्या पुण्याच्या जहागिरीवर हल्ला करून ती पूर्णपणे नष्ट केली. त्या काळात (महाराजांच्या जन्मावेळी) शहाजी राजे शिवनेरीवर नव्हते. ते आपली साधनसामुग्री एकत्र करण्याच्या प्रयत्नांत होते. पुणे वाचवण्याचा त्यानी सर्व प्रकारे प्रयत्न केला, पण पुण्याचा नाश त्यांना थांबवता आला नाही. आठ वर्षाच्या दीर्घ काळापर्यंत पुणे हे ओसाडच होते. मोगलांची चाकरी पत्करण्याचा निर्णय शहाजी राजांनी 1630च्या नोव्हेंबर महिन्यात घेतला. दक्षिणेचा मोगल सुभेदार आज्जमखान ह्याच्या नेतृत्वाखाली मोगलांची सैन्ये युद्धात जय मिळवीत होती आणि निजामशाही मुलुख जिंकून घेत होती. मोगलांच्या ह्या मोहिमेत शहाजी राजांनी तडफदारपणे भाग घेतला. शहाजहानने त्यांना मनसब दिली, आणि संगमनेर व जुन्नर हे निजामशाही इलाखे त्यांच्या हवाली केले. सन 1631च्या मार्चच्या महिन्यात शहाजी राजांची नेमणूक नाशिकचे लष्करचे अधिकारप्रमुख म्हणून झाली. शहाजी राजांचे मित्र आणि सोबती यांना आजच्या नाशिक आणि अहमदनगर जिल्ह्यातील विविध भागांत अनेक नोकऱ्या देण्यात आल्या.

पण ही परिस्थिती फार काळ टिकली नाही. आपल्या काही जहागिरी काढून घेण्यात आल्या आहेत ह्या कारणावरून शहाजी राजे हे मोगलांपासून फुटून निघाले. जुन्या अहमदनगर राज्याचा दक्षिण भाग हा पूर्वेकडील श्रीगोंद्यापासून पश्चिमेकडील किनाऱ्यावरील चौलपर्यंत पसरला होता. शहाजी राजांनी हा प्रदेश आपल्या ताब्यात घेतला. उत्तरेकडील मोगल आक्रमकांच्या विरुद्ध आपण लढत आहोत, मला तुमचा नैतिक आणि सक्रीय पाठिंबा हवा असे आवाहन शहाजी राजांनी विजापूरला केले. मलिकअंबरच्या परंपरेला अनुसरून त्यांनी निजामशाही घराण्यातील एका इसमाला

गादीवर बसवले आणि स्वत:कडे सर्व राज्यव्यवस्था घेतली. सन 1633च्या जून महिन्यात मोगलांनी निजामशाहीची राजधानी, दौलताबाद ही जिंकून घेतली. हे शहाजी राजांना थांबवता आले नाही. पण नाशिक, जुन्नर आणि कोकण येथील आपल्या मजबूत स्थळावरून शहाजी राजांनी मोगलांविरूद्ध सतत लढा चालू ठेवला. त्यांच्या ह्या लढ्याकडे विजापूरची सत्ता मोठ्या कौतुकाने आणि आदराने पाहात होती. विजापूरच्या सीमेवर मोगल येऊन ठेपणे ही विजापूरला समाधानकारक वाटणारी अशी घटना निश्चितच नव्हती.

पण सतत त्रास देणाऱ्या निजामशाही राज्याचा एकदाचा शेवट करण्याचा निश्चय शहाजहानने केला होता. त्याने मोठे आक्रमक धोरण स्वीकारले. एकीकडे विजापूर राज्यात आक्रमणे करून त्याने त्या सत्तेला दहशत बसविली. त्याच वेळी त्याने निजामशहाचे पुणे आणि कल्याण, भिवंडी हे जिल्हे विजापूरला देण्याची तयारी दाखविली. असे करून त्याने आदिलशहाला शहाजीपासून दूर करण्यात यश मिळविले.

हा लढा सन 1636 मध्ये संपला. शहाजी राजांनी आपले नाशिक, जुन्नर, संगमनेर व कोकण ह्या प्रदेशांतील इलाखे हे मोगलांना देऊन टाकले. त्यांनी विजापूरचा मुहम्मद आदिलशहा याची चाकरी पत्करली. पुण्याच्या जहागिरी त्यांना परत करण्यात आल्या. शहाजी राजांना मोहिमांतून भाग घेण्यासाठी दक्षिणेकडे पाठविण्यात आले. सन 1637 च्या अखेरीस किंवा सन 1638 च्या सुरूवातीस बेंगळूर हे विजापूरच्या सत्तेच्या हाती पडले. ते शहाजी राजांना जहागीर म्हणून देण्यात आले. शहाजी राजांचा मोगलांशी चाललेला लढा संपला त्यावेळी शिवाजीमहाराज सात वर्षांचे होते. दक्षिणेतील विजापूर व गोवळकोंडा, या दोन सत्ता मोगलांशी लढत होत्या. शिवाजी महाराजांचे विजापूर व गोवळकोंडा यांच्याशी निकटचे संबंध होते. दक्षिणेवर मोगलांनी आक्रमणे केली त्याचे जे कटू संस्कार मनावर झाले असतील, त्यातूनच असे घडून येणे स्वाभाविक आहे.

या सुमारास बेंगळूरच्या जहागिरीतच वास्तव्य करण्याचा निर्णय शहाजी राजांनी घेतला. शहाजी राजांची पत्नी जिजाबाई हिला सहा मुले झाली. त्यापैकी फक्त दोन जगली. मोठा मुलगा संभाजी हा आपल्या बापाबरोबर बेंगळूर येथेच राहिला. शहाजीची दुसरी बायको तुकाबाई आणि तिचा मुलगा व्यंकोजी (तंजावर राज्याचा भावी संस्थापक) ही दोघे बेंगळूरला राहिली.

जिजाबाई आणि तिचा कनिष्ठ पुत्र म्हणजे शिवाजी राजे, ही दोघे, शिवाजी राजे बारा वर्षाचे होईपर्यंत बेंगळूरला शहाजी राजांपाशीच होती. त्यावेळी असे ठरले

की पुण्याच्या जहागिरीची व्यवस्था पाहाण्यासाठी जिजाबाईंनी शिवाजीराजांना घेऊन पुण्यास जावे. शहाजी राजे यांचे जिजाबाईंशी पटत नव्हते, अशा अनेक कथा सांगितल्या जातात, पण त्या काल्पनिक आणि बिनबुडाच्या म्हणून निकालात काढल्या पाहिजेत. वर सांगितलेला जो निर्णय घेतला गेला तो साधा, सरळ आणि व्यवहाराला धरून होता.

इ. सन 1641-42च्या सुमारास शिवाजीराजे पुण्यास आले. त्यावेळी ते बारा वर्षांचे होते. त्यांच्या बरोबर शहाजीराजांचे थोडेच पण निवडक आणि विश्वासू अधिकारी होते.

शिवाजी महाराजांच्या कारभाराखाली दिलेली जहागीर म्हणजे सध्याच्या पुणे जिल्ह्याचा बव्हंश भाग होय. महाराजांच्या मातोश्री, जिजाबाई या असामान्य चारित्र्याच्या आणि निर्धाराच्या होत्या. महाराजांना त्यांच्याविषयी अतिशय जिव्हाळा आणि भक्ती वाटत असे. जिजाबाईंच्या मार्गदर्शनाखाली शिवाजीराजे वाढू लागले. अढळ श्रद्धा आणि आपला धर्म व संस्कृती याबद्दल निष्ठा हे त्यांचे गुण त्याच काळात वाढीस लागले. आपल्या देशाच्या अमोल सांस्कृतिक परंपरेचा अभिमान, खोल अशी धार्मिक श्रद्धा आणि सहिष्णुतेची उदार वृत्ती हे त्यांचे गुण आपल्या आईच्या प्रेमळ आणि दक्ष नजरेखाली विकसित झाले.

पुण्याची ही जहागीर मोठी नव्हती, पण ती मोक्याच्या ठिकाणी होती. सह्याद्री पर्वताच्या रांगा महाराष्ट्र परिसरात उत्तरेतील खानदेशापासून दक्षिणेत गोव्याच्या सरहद्दीपर्यंत पसरल्या आहेत. त्या रांगाच्यामुळे कोकण आणि घाट हे दोन वेगळे प्रदेश बनले आहेत. या रांगांमधील डोंगर काही ठिकाणी समुद्रसपाटीपासून 1218 मीटर इतके उंच आहेत. त्यांच्यामुळे भोवतालच्या प्रदेशाचे उत्कृष्टपणे संरक्षण होऊ शकते. उत्तरेकडून दक्षिणेकडे जाणाऱ्या या सह्याद्रीच्या रांगांतून लहान लहान पर्वताच्या रांगा पश्चिमेकडून पूर्वेकडे जाणाऱ्या अशा निघाल्या आहेत. या रांगांच्यामधून शेतीवाडीसाठी पुरेशी जमीन उपलब्ध होते, मात्र त्यासाठी माणसे काटक, चिवट, शूर, आक्रमक आणि स्वातंत्र्यप्रिय हवीत. तशी माणसे ह्या जमिनीवर वसली. त्यांच्या खेड्याजवळून वहाणाऱ्या लहान नद्या हे ह्या भूप्रदेशाचे एक लक्षण, त्यामुळे शेतकऱ्यांना शेती करणे सोयीचे होई. दोन दोन रांगांच्या मधून असणाऱ्या अशा जमिनी, खेडी आणि लहान लहान नद्या यांना खोरी म्हणत. अशी खोरी उत्तरेकडील जुन्नरपासून दक्षिणेकडील महाबळेश्वरपर्यंत पसरली आहेत. बऱ्याच खोऱ्यांची नावे त्यातील वहाणाऱ्या नद्यांच्या नावापासून पडली आहेत. ही खोरी पश्चिमेकडे असल्यामुळे व पश्चिमेला मावळती हा शब्द वापरत असल्यामुळे

(त्या दिशेला सूर्य अस्ताला जातो.) ह्या भूप्रदेशाला 'मावळ' म्हणू लागले; आणि लोकांना 'मावळे' असे म्हणण्यात येऊ लागले. प्रत्येक खोऱ्याला एखादा डोंगर असे आणि डोंगराच्या टोकावर एखादा लहान अगर मोठा किल्ला असे. यामुळे लोकांना चांगले संरक्षण मिळे.

मराठे हे प्राचीन काळापासून अनेक जातीजमातींतून विभागले गेले होते. ते वंशपरंपरेने शेतीवाडी करीत किंवा गावच्या वसुलीचे हिशेब वगैरे ठेवीत. खेड्यातून पाटील व कुलकर्णी असत आणि अनेक खेड्यांच्या समूहावर देशमुख व देशपांडे असत. जमिनीचा वसूल आणि इतर व्यवस्था ह्या कामांत ती मंडळी दक्षिणेचे बहामनी सुलतान आणि त्यांच्यानंतर आलेली निरनिराळी राज्ये यांची चाकरी बजावीत. त्या चाकरीच्या मोबदल्यात त्यांना मिळणाऱ्या नगद रकमा, बिनसाऱ्याच्या जमिनी आणि लहान जहागिरी, या सर्वांना मिळून वतन असे म्हणत. सरकारी नोकर या अर्थाने ती वतनदार मंडळी सरकारी नोकर नव्हते. काही वतनदार वाढत वाढत महत्वाचे सरंजामदार आणि जहागीरदार बनले. पण एकंदरीत पाहाता शांततापूर्ण शेतीवाडी आणि जमिनीचे बंदोबस्त याबाबतीत केलेल्या कामगिरीने वतनदारांना मोठा मान असे आणि त्यांच्या कामात सहसा कोणी हस्तक्षेप करीत नसे.

जेव्हा सत्ता स्थिर असे तेव्हा ही वतनदार मंडळी निष्ठेने वागत, पण संघर्षाच्या काळात शासनाबद्दलची त्यांची निष्ठा उतरणीस लागे अर्थात वतनासंबंधी त्यांना आसक्ती मात्र भरपूर असे. इतके म्हणता येईल की वतनदार काय आणि सरंजामदार काय, ह्या सर्वांचे प्रस्थापित व्यवस्थेत हितसंबंध भक्कमपणे गुंतलेले असत आणि म्हणून त्यांचा कल राजकारणात 'जैसे थी' अशीच परिस्थिती रहावी, तीत बदल नको असे मानण्याकडे असे.

दक्षिणेतील बहामनी राजघराणे हे तुर्क अफगाण वंशांचे घराणे होय. या घराण्याने महाराष्ट्र या नावाखाली येणारा जवळ जवळ सगळा प्रदेश आपल्या सत्तेखाली आणण्यात यश मिळविले. याला अपवाद फक्त पूर्वेकडील गोंड राजे, बागलाणातील रजपूत राजे, आणि पश्चिमेकडील कोळी राजे, हे होत. मराठ्यांच्याकडे वतनदारीची लहानसहान कामे किंवा किल्ल्यातील पायदळ शिपायांची नोकरी आणि क्वचित पथकांचे नाईक अशी कामे असत.

## मराठ्यांचा वाढता प्रभाव

बहामनी राज्याचे विघटन झाले. बहामनींच्या जागी सोळाव्या शतकाच्या

सुरूवातीस दक्षिणेत लहान लहान स्वतंत्र राज्यांमध्ये हा प्रदेश वाटला गेला. मराठ्यांच्या दृष्टीने परिस्थितीतील हा बदल थोडासा का होईना, त्यांना अनुकूलच ठरला.

दक्षिणेतील ही राज्ये फार मोठी नव्हती. प्रत्येक राज्याच्या ताब्यात दक्षिणेचा थोडासा भाग असे. संपत्ती आणि मनुष्यबळ ही मोठ्या राज्यांना उपलब्ध असतात, ती या राज्यांना कोठून मिळणार ? ही राज्ये आपसात भांडत, कधी विजयनगरसारख्या शक्तीविरुद्ध अल्पकाळ एकत्र होत. पण गोवा आणि उत्तर कोकण येथे ठाण मांडून बसलेल्या पोर्तुगीजांच्याविरुद्ध ती काही करू शकली नाहीत.

बहामनींच्या काळापासून दक्षिणेत इराण, अरब आणि आफ्रिका यांची किनारपट्टी येथून लोकांचे येणे सतत चालू होते. लवकरच दक्षिणेच्या राजकारणात अमीर उमराव म्हणून तुर्क, इराणी, अरब आणि आफ्रिका (*शिद्दी*) यांचा समावेश होऊ लागला. दक्षिणेतील लोकांच्या दृष्टीने हे सर्वजण क्षितिजाच्या पलीकडून आले, (फारसी भाषेत क्षितिजाला आफाक म्हणतात.) म्हणून या नवागतांना *आफाकी* म्हणू लागले. यातच उत्तरेकडून आलेल्या पठाणांची भर पडली. लवकरच या पठाणांचे जे बळ वाढले ते निश्चितच उपेक्षणीय नव्हते.

बहामनींचे लष्करी अधिकारी म्हणून पंधराव्या शतकात मराठ्यांची फारच थोडी नावे आढळतात. तरीपण मुधोळचे घोरपडे यांनी थोडेबहुत नाव कमावले. अहमदनगरच्या निजामशाही घराण्याचा संस्थापक हा मूळचा महाराष्ट्रीय ब्राह्मण. त्याचे धर्मान्तर करून त्याला मुसलमान करण्यात आले होते, असाच प्रकार वऱ्हाडच्या इमादशाही घराण्याच्या बाबतीत घडला. या घराण्याचा संस्थापक फत्तेउल्ला हा मूळचा ब्राह्मण. दक्षिणेकडील युद्धात हा कैदी म्हणून सापडला होता. विजापूर, गोवळकोंडा आणि बिदर, येथील घराण्यांचे संस्थापक हे सर्व तुर्कवंशीय होते.

मराठ्यांच्या परिस्थितीत बदल झालेला आपल्याला सोळाव्या शतकात आढळून येतो. अहमदनगर राज्यात मुलकी कारभारातून काही मराठ्यांना महत्व प्राप्त झाले. मराठ्यांच्या पायदळाला नायकवाडी म्हणत, त्यांचा उपयोग किल्ल्यातील शिबंदी म्हणून करण्यात येऊ लागला.

पण समकालीन फारशी बखरींतून आणि कागदपत्रांतून मराठ्यांचा उल्लेख येतो तो हलके आणि चपळ घोडदळ बाळगणारे आणि गनिमी काव्याने लढणारे असा. सैय्यद अहमद तबातबाई हा इ.स. 1580 मध्ये इराकमधून आला. नळदुर्गच्या वेढ्यात त्याने मराठ्यांचे निरीक्षण केले. त्याने आपले मत दिले की मराठे हे मध्य

आशियातील उजबेक जमातीप्रमाणे आहेत.

इ.स. 1596 मध्ये मोगलांनी वऱ्हाड जिंकून घेतला. सन 1602 पर्यंत खानदेश हा मोगलांच्या रास्त अमलाखाली आला. अनेक प्रतिष्ठित मराठा घराणी पूर्वी अहमदनगरच्या चाकरीत होती ती आता मोगलांच्या नोकरीत आली. मोगलांकडून त्यांना सरंजाम आणि मनसबी मिळाल्या. मोगलांच्या हाताखाली ज्या प्रमुख मराठा घराण्यांना चाकरी मिळाली त्यात वऱ्हाडचे जाधव आणि वऱ्हाडमधील माहूरचे उदाराम, हे प्रमुख होत. मातोश्री जिजाबाई या जाधव घराण्यापैकीच होत. निजामशाही राज्याचा अधिकाधिक मुलुख जसा मोगलांच्या ताब्यात येऊ लागला तशी मोगलांची चाकरी बजावणाऱ्या मराठा मनसबदारांची संख्या वाढू लागली.

मलिकअंबरने मोगलांशी चिवटपणे झुंज दिली. त्याने महत्वाच्या जागांवर अनेक मराठ्यांच्या नेमणुका केल्या. शिवाजीमहाराजांचे आजे मालोजी व वडील शहाजी यांनी मलिकअंबरच्या नेतृत्वाखालीच नाव आणि प्रतिष्ठा कमावली.

विजापूर राज्यातही अनेक प्रतिष्ठित मराठा घराणी चाकरीवर होती. मुधोळचे घोरपडे, जावळीचे मोरे, फलटणचे निंबाळकर, कोल्हापूरचे घाटगे, कोकणचे शिर्के, ही त्यापैकी काही नावे.

पण ह्याचा अर्थ असा नव्हे की दक्षिणचे हे मूळ रहिवासी म्हणजे विजापुरात मराठे अन् गोवळकोंड्यात आंध्र यांचा तेथील शासनाची धोरणे ठरविण्यात अगर त्यांची अंमलबजावणी करण्यात विशेष हात होता. विजापुरातील परिस्थितीचे चित्रण डॉक्टर नईम यांनी पुढील शब्दात उत्कृष्टपणे केले आहे: ''विजापूरच्या राज्याची रचना पाहता तेथे एका धर्माचे प्राबल्य असलेले दिसून येईल. या राज्यात अनेक जातीजमाती आणि अनेक वंश होते. हे राज्य फक्त घराण्यामुळे एकत्र आलेले होते. ते प्रामुख्याने आफाकी (क्षितीजापलीकडचे म्हणजे परदेशी लोकांचे) राज्य होते. विजापूर राज्यातील सरदारवर्गाची उच्च श्रेणी म्हणजेच हे आफाकी लोक होत. शासनात मग ते केन्द्रीय थरावर असो की प्रांतीय, त्याचेच प्राबल्य असे.[1]''

गोवळकोंडा राज्यातील परिस्थिती विजापूरहून काही भिन्न नव्हती. तेथेही जवळजवळ सर्व कारभार बाहेरून आलेल्या आफाकी लोकांच्या हातात होता.

इ.स. 1634 मध्ये शहाजहानने अहमदनगर राज्याचा संपूर्णपणे निकाल लावला. गोवळकोंड्याचे राज्य हे मोगलांचे पूर्णपणे मांडलिक बनले.

अहमदनगर राज्याचा नाश करण्यातील विजापूरने बजावलेली कामगिरी

1. एम.ए. नईम, *एक्सटर्नल रिलेशन्स ऑफ दी विजापूर किंगडम,* ब्राईट पब्लिशर्स, हैदराबाद, 500 002, 1974, पृ. 28.

शहाजहानने मान्य केली. विजापूर हे एक महत्वाचे राज्य आहे आणि ते तसेच राहील असे वचन शहाजहानने दिले. ठरीव खंडणीच्या मोबदल्यात विजापूर राज्याच्या सीमा सुरक्षित राहतील असे आश्वासन देण्यात आले. सीमारेषा ठरविण्यात आली ती अशी. ही रेषा जुन्नरच्या दक्षिणेकडून निघून पूर्वेकडे सरकत परंड्याच्या उत्तरेवरून जाई. म्हणजे परंडा हे विजापूरच्या राज्यात, पूर्वेकडील उदगीर, औसा आणि नांदेड हे मोगलांच्या राज्यात, अशी ही सीमा होती. चिरकालीन शांततेचे आश्वासन विजापूरच्या राज्याला देण्यात आले. विजापूर आणि गोवळकोंडा ह्या राज्यात काही वादग्रस्त प्रश्न निघाल्यास लवादासाठी ते मोगलांकडे सुपूर्द करण्यात यावेत असे ठरले.

उत्तरेत अशा रीतीने शांतता स्थापन झाली, दक्षिणेत राज्यविस्ताराची संधी प्राप्त झाली. त्याचा लाभ घेऊन विजापूर आणि गोवळकोंडा या दक्षिणेतील दोन राज्यांनी दक्षिण भारतात आपली सत्ता भराभर वाढविली. स्थानिक राजे हे मांडलिक बनले. गोवळकोंडा राज्याचा विस्तार हा समुद्रकिनाऱ्याने मद्रासपर्यन्त पोहचला. विजापूरने सध्याचा कर्नाटक व्यापला, आणि तामिळनाडूमधील तंजावूर आणि मदुराई ही स्थळे गाठली. विजापूर राज्याचा हा विस्तार मुहम्मद आदिल शहा (1627 ते 1656) याच्या कारकीर्दीत झाला.

## शिवबाची पुणे जहागिरी

शिवाजीमहाराज वाढले ते पुणे जिल्ह्यातील डोंगरदऱ्यातून आणि खोऱ्यांतून. ज्यांच्यावर त्यांचे शासन होते ती माणसे काटक, चिवट आणि मर्द होती. पण त्यांच्यात राजकीय जागृतीची जाण फार थोडी होती; जवळ जवळ नव्हती असे म्हटले तरी चालेल. महत्वाचे जमीनदार; देशमुख, देशपांडे इत्यादी वतनदार आणि लहानसहान सरदार ह्यांना विजापूर राज्याशी निष्ठा चालू ठेवणे सोयीचे आणि सुरक्षित वाटत होते. कोणत्याही मोठ्या घटनेची सुरुवात बहुतेक वेळा लहानसहान गोष्टीपासूनच होते. याची उदाहरणे द्यायची तर अमेरिकन आणि फ्रेंच या राज्यक्रांत्या यांचे देता येईल. शिवाजी महाराजांचे सर्वात मोठे कार्य जे आहे ते हे की, त्यांनी एतद्देशीय, स्वतंत्र आणि कल्याणकारी राज्याचा पाया घातला. हे राज्य संपूर्ण अर्थाने राष्ट्रीय होते आणि याचा विस्तार साऱ्या देशभर होण्याची क्षमता होती. त्यांनी राष्ट्रीय वृत्ती जागृत केली. उदासीन वृत्तीच्या लोकांत आत्मविश्वास निर्माण केला. आपल्या शत्रूचा गर्व, त्याची आक्रमक वृत्ती आणि त्याचा असहिष्णुपणा यांच्याविरूद्ध महाराजांनी झुंज दिली. त्यांनी आपल्या शत्रूंना दाखवून दिले की

जनतेचा उत्स्फूर्त पाठिंबा नसेल, तर कोणतीही सत्ता टिकू शकत नाही, आणि संपन्न तर होऊच शकत नाही.

पण या गोष्टी पुढे घडल्या. सुरुवातीची वर्षे पाहिली तर आपल्याला काय दिसते? एक तरुण एकेक पाऊल पुढे टाकीत चालला आहे. तो आपली उद्दिष्टे मनात ठरवीत आहे. तो अतिशय चाणाक्ष आहे, आणि त्याच्या वृत्तीमध्ये सावधगिरी, धाडसी पराक्रम यांचा विलक्षण संगम झाला आहे. कठोर परिस्थितीचा पहिला अनुभव शिवाजी महाराजांना आला त्यावेळी ते अवघे चौदा वर्षांचे होते. विजापूर राज्यात सरदार आणि प्रशासक ह्यांना त्यांच्या कामाच्या मोबदल्यात सरंजाम अगर जहागिरी देण्यात येत. अशा जहागिरीत किल्ल्यांचा समावेश नसे. किल्ल्यांवर रास्त अंमल असे. त्यामुळे एखाद्या नाठाळ अमीर-उमरावाला वठणीवर आणण्यासाठी बादशहाला विशेष त्रास पडत नसे. तसेच बादशहांनी एखाद्या सरदारविरूद्ध विनाकारण डाव धरला, तर अशा जहागिरदाराला बादशाहाच्या विरूद्ध आपल्या जहागिरीचे संरक्षण (किल्ल्यांच्या अभावी) करण्यास कोणतेही साधन रहात नसे.

असे एक उदाहरण घडले. काही कारणांमुळे मुहम्मद आदिलशहाची शहाजीवर इतराजी झाली. त्याने शहाजीच्या पुणे जहागिरीवर आक्रमण करून ती उध्वस्त करण्याची आपल्या सैन्याला आज्ञा केली. किल्ल्यासारखी संरक्षणाची साधने नसल्यामुळे जहागिरीवर अल्प काळातच आक्रमण झाले. त्यामुळे फार उपद्रव सोसावा लागला. काही दिवसांनी शांतता स्थापन झाली, आणि शहाजीवर बादशहाची पुन्हा कृपा झाली. शिवाजी महाराज हा धडा कधीच विसरले नाहीत.

किल्ले हस्तगत करावेत, ते आपल्या ताब्यात ठेवावे, संरक्षणासाठी नवीन किल्ले बांधावेत ही इच्छा शिवाजी महाराजांना सन 1645 मध्ये झाली असावी. त्यावेळी ते अवघ्या पंधरा वर्षांचे होते. विजापूरचा बादशहा मुहम्मद आदिलशहा हा सन 1646 मध्ये आजारी पडला. पुढे दहा वर्षांनी सन 1656 मध्ये त्याचा मृत्यू झाला. ह्या दहा वर्षांत तो जवळ जवळ पंगू होता. त्याच्या ह्या दीर्घकालीन आजारामुळे विजापुरच्या राज्यात गोंधळ निर्माण झाला, व तो दिवसेंदिवस वाढू लागला.

याच सुमारास शहाजी राजांचा पुणे जहागिरीचे कारभारी दादोजी कोंडदेव सन 1647 च्या 7 मार्च रोजी मरण पावले. शिवाजी महाराज हे तरूण, आणि साहसी सेनानायक म्हणून पुढे येऊ लागले याचे दादोजी कोंडदेव यांना कोण कौतुक! पण ते कुठे अविचारी धाडस तर करून बसणार नाहीत ना, ह्या बद्दल दादोजी

शिवाजी महाराजांना सावधगिरीचा इशारा देत असत. त्यांच्या मृत्यूने जुन्या आणि धोका न पत्करणाऱ्या पिढीने लादलेली महाराजांवरील बंधने साहजिकच गळून पडली.

शिवाजी महाराजांनी पुढे लवकरच मुरुंबदेव आणि तोरणा ह्या किल्ल्यांचा ताबा घेतला. मुरुंबदेवलाच पुढे 'राजगड' म्हणू लागले. इ. सन 1670 पर्यन्त राजगड हे महाराजांच्या राजधानीचे ठिकाण होते. पण त्यांची सर्वात मोठी कामगिरी म्हणजे त्यांनी मिळवलेला कोंडाणा किल्ल्याचा ताबा होय. इ.स. 1647 मध्ये ह्या किल्ल्याला 'सिंहगड' म्हणू लागले.

ह्या बातम्यांनी विजापूर दरबारला धास्ती वाटणे साहजिक होते. अर्धवट ओसाड पडलेले किल्ले ताब्यात घेणे ही एक गोष्ट होती, पण सिंहगडासारखा किल्ला बळकावणे ही बाब दुर्लक्ष करण्यासारखी नव्हती.

आदिलशहाने आपला सेनापती फत्तेखान खुदावंदखान याला कोंडाणा प्रदेशात शिवाजी महाराजांविरूद्ध मोहीम उघडण्याची आज्ञा केली. महाराजांनी पुरंदर येथे आपला तळ उभा करून या धोक्याचा प्रतिकार करण्याची तयारी केली.

या सुमारास शिवाजी महाराजांना एक धक्कादायक बातमी समजली. त्यांचे वडील, शहाजीराजे यांना कैद करण्यात आले होते. गोवळकोंडा राज्याशी आणि जिंजीच्या किल्ल्यातील शत्रूच्या शिबंदीशी त्याने कारस्थाने केली असा त्यांच्यावर आरोप होता. ही घटना 28 जुलै 1648 रोजी घडली. शहाजीच्या बंगळूरमधील जहागिरीवर आक्रमण करण्यात आले. पण शिवाजी महाराजांचे बंधू संभाजी यांनी चिवटपणे लढून जहागिरीचे संरक्षण केले.

महाराजांचे विरूद्ध विजापूरचे सैन्य चालून आले त्यात मराठ्यांची पथके होती. या पथकाचे नेतृत्व घाटगे, आणि फलटणचे निंबाळकर यांच्याकडे होते. महाराजांची पत्नी सईबाई ही फलटणचे बजाजी निंबाळकर यांची बहीण होती, हे लक्षात ठेवले पाहिजे.

कवींद्र परमानंद याने आपल्या 'शिवभारतात' फत्तेखानाविरूद्ध शिवाजी महाराजांनी दिलेल्या लढ्याचे मोठे प्रत्ययकारी वर्णन दिले आहे. लढा मोठा निकराचा झाला. विजापूरची सैन्ये पराजित होऊन पळाली. त्यांच्या सैन्यातील मेलेल्या इसमांत सरदार मुसेखान हा होता. या वरील काव्यावरून आपल्याला शिवाजी महाराजांच्या सुरुवातीच्या काळातील सोबत्यांची नावे कळतात. कावजी, गोदाजी, भिमाजी वाघ, संभाजी काटे. शिवाजी इंगळे. भिकाजी चोरे, त्याचा भाऊ भैरव इत्यादींची आपल्याला माहिती मिळते. शिवाजी महाराजांनी आपले सैन्य

जमविले ते समाजाच्या विविध थरातून होय. ह्या लढाईत कान्होजी जेधे यांचा मुलगा बाजी याने उत्कृष्ट कामगिरी केली. पण याच लढाईत शिवाजी महाराजांचा एकनिष्ठ अनुयायी बाजी पासलकर हा मारला गेला. त्याच्या मृत्यूने महाराजांची मोठी हानी झाली.

शिवाजी महाराजांनी आदिलशाही सैन्याचा हा हल्ला परतविला खरा, पण शहाजीराजांना आदिलशहाने अद्याप आपल्या कैदेतच ठेवले होते. त्यांची कैदेतून मुक्तता करणे हे काम अवघड होते. महाराजांनी दक्षिणेचा मोगल सुभेदार राजपुत्र मुराद याच्याशी पत्रव्यवहार केला. सन 1641 च्या 14 मार्चच्या मुरादच्या पत्रातून ही गोष्ट सिद्ध आहे, पण ह्याचा अर्थ असाच नव्हे की मोगलांच्या दडपणामुळे शहाजी राजांची कैदेतून मुक्तता झाली. ही मुक्तता सन 1641च्या 16 मे रोजी झाली, आणि शहाजी राजांवर बादशहाची पुन्हा कृपा झाली. शिवाजी महाराजांना मात्र ह्या घटनेची किंमत मोजावी लागली. म्हणजे त्यांना कोंडाणा उर्फ सिंहगड सोडून द्यावा लागला.

## मोगलांचे राजकीय धोरण

मोगलांनी विजापूरबरोबर कायमची शांतता स्थापना केली हे खरे, पण दक्षिणेतील राज्ये जिंकून घेणे हे जे त्यांचे अंतिम ध्येय होते, हे त्यांच्या परराष्ट्रीय राजकारणाचे एक कायम स्वरुपाचे अंग म्हणून राहिले. विजापूरचे अमीर उमराव आणि अधिकारी यांना फोडणे आणि त्यांना मोगलांच्या तावडीत आणणे याबद्दल ते सदा प्रयत्नशील असत. राजपुत्र मुराद याने एक पत्र शिवाजी महाराजांना आणि दुसरे पत्र शहाजी राजांना दिले, त्यातील उतारे मोगलांच्या राजकीय धोरणावर भरपूर प्रकाश पाडतात. राजपुत्र मुराद याने शिवाजी महाराजांना 14 ऑगस्ट 1641 रोजी लिहिलेल्या पत्रातील पुढील उतारा पहा:

''आमच्या अमर्याद बादशाही कृपेने संपन्न व्हावे आणि जाणावे की तुमच्या वडिलांनी केलेल्या अपराधाची क्षमा करण्यात आली आणि त्यांची निष्ठा स्वामीभक्ती यांच्यासाठी कृपा आणि क्षमा याचे दरवाजे उघडण्यात आले आहे. आता हीच वेळ आहे की तुम्ही, तुमचे वडील आणि तुमच्या जमातीचे लोक यांनी माझ्याकडे यावे. उद्देश हा की तुम्ही बादशहाच्या हुजुरास मुजरे करावे. तो मान आणि सौख्य मिळाल्यावर तुम्हाला तुमच्या सहकाऱ्यांमध्ये मान आणि प्रतिष्ठा ही प्राप्त होतील. यासाठी पाच हजार जात आणि पाच हजार स्वार अशी मनसब आणि योग्य ती बक्षिसे देण्यात येतील. आणि तुमच्या वडिलांना पूर्वी बादशाही चाकरीत जी मनसब

होती ती पुन्हा देण्यात येईल.''

इ.स. 1630 च्या नोव्हेंबर महिन्यात शहाजी राजे, त्यांचे पुत्र संभाजी आणि त्यांचे इतर सोबती यांना मनसबी, रोख बक्षिसे, आणि चाकऱ्या शहाजहान बादशहाकडून मिळाल्या हे आठवतच असेल. वर दिलेल्या पत्रात त्यांनी पुन्हा बादशाही चाकरीत यावे असे आमंत्रणच होते. विजापूरचे अमीर उमराव आणि अधिकारी यांना फोडून आपल्याकडे वळवायचे आणि विजापूरचे राज्य दुबळे करून सोडायचे या विषयी मोगलांचे प्रयत्न ते राज्य नष्ट होईपर्यंत चालूच राहिले.

शहाजी राजे सुटले आणि आपल्या जहागिरीला परतले. आता मोगलांशी पत्रव्यवहार चालू ठेवण्याचे महाराजांना काही कारण नव्हते. पुढील पाच वर्षांत महाराजांनी आपल्या वडिलांच्या पुणे जहागिरीवर स्वतःची संपूर्ण सत्ता स्थापन केली. कायदेशीर रीतीने पाहता शिवाजीमहाराज हे फक्त आपल्या वडिलांच्या जहागिरीचे कारभारी ठरत होते. पण शहाजी राजे बेंगळूरला स्थायिक झालेले, ते होते पुण्यापासून लांब. सन 1655 पर्यंत शहाजीराजांच्या सहीची आज्ञापत्रे निघत असली तरी आपल्याला नको असलेले अधिकारी काढून त्यांना बेंगळूरला पाठविण्याचा अधिकार शिवाजी महाराजांना होता. शिवाजी महाराजांनी उरलेल्या अधिकाऱ्यांची निष्ठा मिळवली आणि आवश्यक वाटले तिथे आपल्या अनुयायांमधून नवीन लोकांच्या नेमणुका केल्या.

सन 1655 पर्यंत शिवाजी महाराजांचा संपूर्ण ताबा पुणे, चाकण, बारामती, इंदापूर या भागावर बसला होता. तोरण, राजगड आणि पुरंदर हे किल्लेही त्यांनी हस्तगत केले होते. पुरंदरचा किल्ला मात्र मोठ्या मुत्सद्देगिरीने त्यांनी मिळविला होता.

शिवाजी महाराजांच्या जहागिरीची उत्तर सीमा हीच मोगल साम्राज्याची दक्षिण सीमा होय. त्या दिशेने पुढे सरकणे याचा विचार करणेही अशक्य होते. महाराजांच्या जहागिरीच्या पूर्व भागाला लागून विजापूर राज्याचे उत्तम रीतीने सुरक्षित आणि उत्तम राज्यव्यवस्था असलेले सातारा, सांगली आणि कोल्हापूर हे जिल्हे होते. त्यांना बालाघाट म्हणतात.

## कोकण

यामुळे शिवाजी महाराजांचे लक्ष कोकणच्या किनारपट्टीकडे गेले. शहाजी राजे मोगलांशी सन 1632 पासून 1669 पर्यंत लढा देत होते तेव्हा कोकणचा उत्तर भाग त्यांनी आपल्या ताब्यात ठेवला होता.

कोकणची किनारपट्टी उत्तरेस सुरतेपासून सुरू होते. तिची लांबी 486 किलोमीटर आहे, पण रूंदी 80 ते 85 किलोमीटरपेक्षा अधिक नाही. कोकणच्या पूर्वेस सह्याद्रीच्या उत्तुंग अशा पर्वतरांगा आहेत. कोकणची किनारपट्टी ही असंख्य अशा खाड्या, नद्या आणि ओढे यात विभागली गेली आहे. खाड्या तर कित्येक ठिकाणी सह्याद्रीपर्यंत जाऊन पोहोचतात. या प्रदेशात पाऊस खूपच पडतो; आणि दळणवळण अवघड होते. कोकणपट्टीवर लहानमोठी अशी अनेक बंदरे आहेत. उदा. वसई, मुंबई, चौल, दाभोळ, राजापूर, आणि वेंगुर्ले. या शिवाय खाडीवर बसलेल्या व्यापारी पेठाही आहेत. उदा. संगमेश्वर, महाड आणि ठाणे.

कोकणच्या बंदरातून देशाच्या बाहेरून येणाऱ्या लोकांची आणि मालाची आयात होत असे. इराणी, अरब, तुर्क आणि आफ्रिकी यांची रीघच लागलेली असे. हे लोक इकडे येत आणि बहामनी, विजापूर, गोवळकोंडा आणि अहमदनगर या राज्यांतून स्थायिक होत. किंमती वस्तू आणि चांगले उमदे घोडे हे परदेशातून आणले जात. डोंगरातून घाटमाथ्यावर जाण्यासाठी सह्याद्री पर्वतरांगातून अवघड असे रस्ते असत, त्यांना घाट म्हणत.

या कोकण प्रदेशात सत्ता स्थिर करून शांतता स्थापन करण्यास बहामनी घराण्याला शंभराहून अधिक वर्षे घालवावी लागली. बहामनींचा मुख्य उद्देश होता तो कोकण आणि वरघाटी प्रदेशांतील मार्ग सुरळीत आणि सुरक्षित ठेवणे. बहामनी राज्याची जागा विजापूर आणि अहमदनगर ह्या राज्यांनी घेतली आणि कोकणचा ताबा त्यांच्याकडे गेला. कोकणचा उत्तर आणि मध्यभाग अहमदनगरकडे आणि दक्षिण कोकण विजापूरकडे, अशी विभागणी झाली. आफ्रिकेहून आलेले लोक प्रथम दंडराजपुरी येथे स्थायिक झाले, त्यांना हबशी अगर शिद्दी म्हणत. हे लोक म्हणजे मोठी काटक जमात. या जमातीनेच मलिकअंबर आणि सिद्दीरेहान सारखे मुत्सद्दी आणि सेनापती दक्षिणेच्या राज्यांना पुरविले. अहमदनगर राज्याचे आरमार हेच चालवीत. त्यांचे मुख्य ठिकाण हेते जंजिरा. अठराव्या शतकाच्या मध्यापर्यंत जंजिऱ्याचे हे शिद्दी कोकणच्या राजकारणात महत्वाचा वाटा उचलणार होते.

इ. सन 1510 मध्ये पोर्तुगीजांनी गोवा जिंकून आपल्या ताब्यात घेतला. सन 1534 मध्ये त्यांनी गुजरातच्या सुलतानांच्याकडून उत्तर कोकण बळकावला. दक्षिणेकडील चौलपर्यंत कोकणची किनारपट्टी ते आपल्या नियंत्रणाखाली ठेवीत. त्यांना गोव्यातून काढून लावण्याचे विजापूरने सतत प्रयत्न केले, पण त्यांत त्याला यश आले नाही. उत्तर कोकणातील अहमदनगरच्या वाट्याला असेच अपयश आले. आपण परजित झालो हे शेवटी विजापूर आणि अहमदनगर ह्या दोघांनाही मान्य

करावे लागले, आणि नंतर ते आपल्या युरोपीयन शेजाऱ्यांशी शांततेने राहण्यास कबूल झाले.

उत्तर कोकणांतील पोर्तुगीजांच्या ताब्यात नसलेला भाग म्हणजे कल्याण-भिवंडीचा प्रदेश आणि कुलाबा (रायगड) जिल्ह्याचा बव्हंश भाग होय. अहमदनगर राज्याचे विसर्जन होण्यापूर्वी हा प्रदेश त्या राज्यात होता. इ.स. 1635 मध्ये मोगल आणि विजापूर यांच्यात वाटणीचा तह झाला. त्यांत हा प्रदेश आणि पुण्याचा प्रांत हे दोन्ही मोगलांनी विजापूरला देऊन टाकले. जंजिऱ्यांचे शिद्दी हे विजापूरच्या चाकरीत शिरले. विजापूरच्या अदिलशहाने पुण्याची जहागीर शहाजीराजांना दिली आणि कल्याण-भिवंडीचा प्रदेश मुल्ला अहमद या प्रमुख अधिकाऱ्याच्या ताब्यात दिला.

कोकणला मोगल नेहमी तळकोकण म्हणत. कल्याण-भिवंडी प्रदेशात विजापूरचे राज्य इ.स. 1636 पासून सुरू झाले. ही सत्ता मजबूत नव्हती आणि स्थिरही नव्हती. मुहम्मद अदिलशहा हा इ.स. 1646 मध्ये आजारी पडला. हा आजार दहा वर्षे रेंगाळला. ह्या आजाराच्या काळात मुल्ला अहमद याचा अधिकाधिक काळ विजापुरात जाऊ लागला. राजधानीतील राजकारणात तो भाग घेऊ लागला.

शिवाजी महाराजांची पुण्याची जहागीर ही विजापूर आणि कल्याण-भिवंडी यांच्यामध्ये होती. वर घाटावरून कोकणात उतरण्याचा आणखी एक रस्ता होता आणि तो महाबळेश्वरजवळून होता. नेमकी त्याच ठिकाणी मोरे यांची वतने आणि जहागिरी होत्या. त्यांच्या सहकार्याशिवाय शिवाजीमहाराज मध्य कोकणात चालून जाऊ शकत नव्हते. एकतर त्यांचे सहकार्य मिळावे नाहीतर त्यांचा निकाल लावावा हे दोनच पर्याय होते.

शिवाजी महाराज हे सतत पण धिमेपणाने आपली सत्ता वाढविणे आणि मजबूत करणे हे उद्देश मनाशी बाळगून होते हे उघड आहे. विजापूरच्या गोंधळाच्या राजकीय परिस्थितीत विजापूरचे अमीर उमरावही काही स्वस्थ बसले नव्हते. शिद्दी सरदार रूस्तुम जमान हा रायबाग, हुक्केरी आणि वेंगुर्ले या प्रदेशांत आपले बळ वाढवित होता. तेच काम बहलोलखान हा पठाण सरदार धारवाड, बेळगाव प्रदेशात करीत होता. आणखी एक सरदार शिद्दी जौहर हा कर्नूल भागात असेच वागत होता. हे सगळेजण एकाच प्रकारचे राजकारण करीत होते. साचा एकच. शेजाऱ्यांच्या वर आक्रमणे करून आपला अधिकार आणि सत्ता वाढवा, किल्ले घ्या आणि आपल्या ताब्यात ठेवा. नावापुरते ते किल्ले बादशहाचे आहेत असे दाखवीत चला, ताब्यात

असलेला प्रदेश आपल्या नावाने कायम करून घ्या आणि तेथे अर्ध स्वतंत्र अशी सत्ता गाजवू लागा; आणि राजधानीतील सत्तास्पर्धेत भरपूर भाग घ्या.

अशाच घटनांच्यामुळे बहामनींचे घराणे नष्ट झाले, आणि अशाच घटनांच्या मुळे दक्षिणेतील ह्या राज्यांचे विसर्जन झाले. शिद्दी आणि पठाण जर असे करू शकतात तर तीन पिढ्यांपासून उमराव असलेले शिवाजी महाराज हे आपल्या मराठी मुलखांत हे करतील यात काय आश्चर्य ? ह्यात काही आश्चर्य नाही. पण महाराजांच्या प्रतिस्पर्धांना जी गोष्ट खटकत होती ती हीच. कधी घडले नाही ते घडू लागले. पहिल्या प्रथम एक मराठा आपल्या मराठी मातीत आपले बळ हळू हळू पण निश्चितपणे वाढवू लागला होता, हे त्यांना पाहावत नव्हते.

## शिवाजी आणि जावळीचे मोरे

शिवाजीमहाराजांनी अनेक मराठे देशमुख आणि इतर स्थानिक लोकांना आपल्याकडे वळवूत घेतले. त्यांचे उद्देश ज्यांना पटत होते, अशा माणसांना त्यांनी वैवाहिक आणि इतर संबंध यांच्याद्वारे आपल्या बाजूला आणले. जे त्यांना येऊन मिळण्यास नाखूष होते त्यांना शरण येऊन महाराजांची ताबेदारी पत्करावी लागली. जावळीचे मोरे हे बलिष्ठ होते. ते आदिलशहाचे एकनिष्ठ सरदार होते. या तरुण मराठा नेत्याच्या हालचाली त्यांना पसंत नव्हत्या. हा नेता सातत्याने आणि धिमेपणाने एक संपूर्णपणे एतद्देशीय राज्य निर्माण करू पाहात आहे. पूर्वीची एकच घराण्याच्या अधिपत्याखाली चाललेली आणि परकीय सरदारांच्या वर्चस्वाखाली असलेली राज्ये संपूर्णपणे नाहीशी करून त्यांच्या जागी हे नवीन, एतद्देशीयांचे राज्य येणार ही कल्पना करणे मोरे सारख्यांच्या शक्ती बाहेर होते. बलाढ्य अशा मोगलांच्या सततच्या दडपणामुळे दक्षिणेतील राज्यांचे झपाट्याने विघटन सुरु झाले होते, आणि मराठ्यांना आपल्या मायभूमीत आपली स्वत:ची सर्वांगीण उन्नत्ती करून घ्यावयाची असेल तर एका धाडसी नेतृत्वाखाली त्यांची संघटना होणे आवश्यक होते. या गोष्टी मोरे आदींच्या जाणिवेच्या बाहेर होत्या.

मोऱ्यांच्या विरुद्ध लहानसहान मोहिमा चालूच होत्या. खुद्द जावळीच्या मोऱ्यांच्यामधेही आपापसात लहानसहान भांडणे होतीच. मोरे घराण्याच्या प्रमुखाला 'चंद्रराव' ही पदवी होती. जावळी आणि शिवाजी महाराजांची जहागीर या एकाला एक लागून होत्या. त्यामुळे समोरासमोर युद्धाची वेळ येऊन ठेपली. चंद्ररावाला जावळीची प्राप्ती झाली ती दत्तकातून आणि तीही शिवाजी महाराजांच्या पाठिंब्याने. या कुटुंबाच्या ताब्यातील विविध भागावर मोरे कुटुंबातील अनेक व्यक्तींचा

प्रत्येकाचा स्वतंत्र ताबा असे. विजापूरचा वाई प्रांताचा सुभेदार अफझलखान याने मोरे घराण्यातील आपापसातील भांडण तंट्यात हस्तक्षेप करण्याचा प्रयत्न केला, पण त्यात त्याला यश आले नाही.

आता शिवाजी महाराजांनी मोऱ्यांना शिक्षा करून जावळी जिंकून घेण्याचा दृढ निश्चय केला. ही गोष्ट इ. सन 1655 मधील होय.

इ. सन 1653 मध्ये राजपुत्र औरंगजेब हा दक्षिणचा सुभेदार होऊन आला. त्याच्या आगमनाबरोबर दक्षिणेतील मोगलांची राजकारणे वेगाने चालू झाली. मोगल साम्राज्याच्या दक्षिण सरहद्दीवर विजापूर आणि गोवळकोंडा ही राज्ये होती; ती मांडलिक आणि संरक्षित अशी राज्ये म्हणून चालू राहिली तरी शहाजहानला हरकत नव्हती; हे होते शहाजहानचे धोरण. इतकेच नव्हे तर शहाजहानने ह्या वरील राज्यांना दक्षिण भारतात आक्रमण करून पसरण्याची परवानगी दिली. पण नवीन सुभेदार राजपुत्र औरंगजेब याचे धोरण तसे नव्हते. त्याचे उद्दिष्ट होते गोवळकोंडा आणि विजापूर जिंकून घेणे आणि तेथे मोगलांचा रास्त अंमल चालू करणे. या राज्यातील अधिकाऱ्यांना फोडणे आणि आपल्या चाकरीत घेणे हे तर मोगलांचे धोरणच होते. लवकरच औरंगजेबाकडे एक संधी आयतीच चालून आली.

गोवळकोंड्याचा मुख्य प्रधान मीर जुमला हा एक इराणचा महत्वाकांक्षी माणूस. गोवळकोंड्यातर्फे दक्षिण भारतात ज्या मोहिमा झाल्या त्यात त्याने उल्लेखनीय भाग घेतला. लष्करी दृष्टीने मीर जुमला हा प्रतिभाशाली होता. त्याने एक प्रबळ असा तोफखाना तयार केला. देशांत आणि परदेशांत तो मोठ्या प्रमाणात व्यापारही करीत असे. ह्या सर्व कारणांमुळे त्याने प्रचंड संपत्ती गोळा केली. गोवळकोंड्याच्या दरबारात त्याच्याइतका प्रबळ असा दुसरा कोणी सरदार राहिला नाही. त्याने आपल्या नंतरच्या मोहिमात कर्नाटकाचा भाग जिंकून घेतला होता. त्या प्रांताला गोवळकोंडा कर्नाटक असे म्हणत. मीर जुमल्याने त्या समृद्ध आणि सुपीक प्रांतात आपले ठाण मांडले.

गोवळकोंड्याच्या अब्दुल्ला कुतुबशाहा या बादशहाला आपल्या या प्रबळ मंत्र्याचा संशय येऊ लागला. यामुळे स्वतःला आणि स्वतःची कर्नाटकातील जहागीर वाचवण्यासाठी मीर जुमला हा आपल्याला पाठिंबा देणारा कुणी भेटेल का याचा शोध घेऊ लागला. मीर जुमल्याला आपल्याकडे वळवून घेण्याची संधी औरंगजेबाने अचूक साधली.

विजापूर दरबारच्या चाकरीतून शहाजीला फोडण्यासाठी मीर जुमलाने प्रयत्न केला. जे.एन्. सरकार हे आपल्या मीर जुमल्याच्या चरित्रात म्हणतात, ''त्याने (मीर

जुमला) आता मराठा सरदार शहाजी भोसले यांना आपल्याकडे वळवून घेण्याचा प्रयत्न केला. शहाजींना विजापूरच्या आदिलशहाच्या विरूद्ध काही तक्रारी होत्या. शहाजींच्यातर्फे मीर जुमल्याने औरंगजेबापाशी मध्यस्थी केली. शहाजींच्यावर औरंगजेबाची कृपा होईल अशी मीर जुमल्याने त्याला खात्री दिली. औरंगजेबाने मीर जुमल्याची ही मसलत मान्य केली आणि म्हटले की हे अतिशय योग्य झाले. औरंगजेबाने मीर जुमल्याला विचारले, 'शहाजींचे हेतू काय आहेत?' ...मुहम्मद मोमिनखान हा कर्नाटकांत होता आणि त्याचवेळी मीर जुमला हा शहाजींबरोबर बोलणी करीत असावा. औरंगजेबाने त्याला पत्र लिहिले होते. त्याच्या हालचाली मान्य करताना औरंगजेबाने लिहिले होते ते असे, 'एखादा माणूस (शहाजी) हा आपल्या मालकाला घाबरत असेल आणि त्यामुळे या दरबारात चाकरी पत्करण्याची इच्छा दाखवित असेल तर त्याचे समाधान करणे हे तुम्हाला आवश्यक आहे.'

बिकानेरचा राजा राव कर्ण आणि त्याचा मुलगा अनूपसिंग यांच्या पदरी संकर्षण सकळकळे हा राजकवी म्हणून होता. त्याने 'शिवकाव्य' ह्या नावाचे अद्याप काहीसे अपरिचित असलेले संस्कृत काव्य लिहिले आहे.[1] त्याचा नुकताच शोध लागला. त्या काव्यातील कथा काहीशी चमत्कारिक आहे. कवी म्हणतो: "बिकानेरचा राजा राव कर्ण हा औरंगजेबाच्या हाताखाली दौलताबाद येथे अधिकारी होता. तो वेषांतर करून साधू धरणीधरमहाराज या नावाने शिवापूर येथील शिवाजीमहाराजांच्या तळावर गेला. त्याच्याबरोबर त्याचा मुलगा अनूपसिंग हा होता. असे म्हणतात की, राव कर्ण याने शिवाजीमहाराजांना त्यांनी जावळीवर हल्ला करून मोऱ्यांना नष्ट करावे असे सांगितले." शिवाजीमहाराजांना असे कुणी सांगण्याची गरज होती असे नाही. त्यांनी आपले बेत आधीच आखून ठेवले होते. पण दक्षिणेतील राज्यात असंतोषाचे बी पेरावे आणि ती राज्ये दुबळी करून सोडावी हे जे मोगलांचे प्रयत्न ते या काव्यावरून स्पष्ट होतात.

मीर जुमला हा गोवळकोंड्याहून फुटून मोगलांना मिळाला. अगदी लहानसहान अशा कारणांचे निमित करून औरंगजेबाने गोवळकोंड्यावर आक्रमण केले. हा लढा अल्प काळातच संपला. औरंगजेब आणि मीर जुमला यांनी गोवळकोंडा राज्याचा नाशच केला असता, पण शहाजहानने मध्यस्थी केली औरंगजेबच्या वाढत्या बळाचा त्याला मत्सर वाटू लागला होता. त्यामुळे गोवळकोंड्यांचे राज्य

---

1. सकळकळे, संकर्षण, *शिवकाव्य,* संपादक - आर.सी. गोस्वामी, भारत इतिहास संशोधक मंडळ, त्रैमासिक, अंक 1 ते 4, 1974, पुणे.

सर्वनाशापासून बचावले; पण गोवळकोंड्याहून आपली सैन्ये काढून घेण्यापूर्वी औरंगजेबाने त्या राज्यावर अतिशय अपमानास्पद असा तह लादला. शहाजहानने मीर जुमल्याची नेमणूक मोगल साम्राज्याचा मुख्य प्रधान म्हणून केली. पण ह्यापूर्वी कधीही न घडलेली गोष्ट घडली. गोवळकोंड्याच्या कुतुबशहाने मीर जुमल्याला कर्नाटकात जहागिरी दिल्या होत्या. मोगल साम्राज्याचा मुख्य प्रधान झाल्यावरही त्या जहागिरी मीर जुमल्याकडेच राहातील अशी ही योजना होती. ही एक अभूतपूर्व गोष्ट होय. मीर जुमल्याच्या तर्फे आपण त्याच्या कर्नाटकातील जहागिरीची देखरेख करू असे आश्वासन दक्षिणचा सुभेदार औरंगजेब याने दिले. यानंतर मीर जुमला हा मोगल दरबारात हजर होण्यासाठी निघाला. या घटना इ. सन 1655-56 मध्ये घडल्या.

शिवाजीमहाराजांनी मोऱ्यांना निरोप पाठवला, ''आम्ही राजे. श्री शंभूमहादेवांनी आम्हास राज्यपद दिले. तुम्ही यापुढे स्वत:स राजे म्हणून घेऊ नये.'' याला चंद्रराव मोरे यांनी मग्रुरीचे उत्तर पाठविले. ''तुम्ही कालचे राजे, हे राज्यपद तुम्हास कोणी दिले ? तुमच्यात काही शौर्य असेल तर तुम्ही आजच यावे. उद्यावर चालढकल करू नये.''

शिवाजीमहाराजांची मोऱ्यांच्याविरुद्ध मोहीम जितकी कडक तितकीच तडफदार झाली. जेधे यांच्या घराण्यातील हकीकती या 'जेधे शकावली' आणि 'जेधे करीना' यात नोंदवून ठेवल्या आहेत, त्यातील उल्लेख संक्षेपाने असा, ''27 जानेवारी 1656, शिवाजीमहाराजांनी कूच केले आणि जावळी घेतली. त्यावेळी त्यांच्याबरोबर कानोजी जेधे बांदल, सिलिमकर, आणि मावळचे देशमुख यांची पथके होती.''

सन 1656च्या मे महिन्यात शिवाजी महाराजांनी रायरीचा किल्ला घेतला. हा बळकट किल्ला पुढे रायगड ह्या नावाने प्रसिद्ध झाला. इ. सन 1670 मध्ये रायगड ही शिवाजीमहाराजांची राजधानी बनली. जावळीहून पळाल्यानंतर चंद्रराव याने रायरी किल्ल्यात आश्रय घेतला होता. किल्ल्यावरून खाली येण्यासाठी त्याचे मन वळवण्यात आले. या मोऱ्यांची अनेक माणसे मारली गेली. मोऱ्यांच्या भाऊबंदापैकी हणमंतराव हा मारला गेला, विजापूरशी गुप्त पत्रव्यवहार केल्यामुळे चंद्ररावही पुढे मारला गेला असावा. या प्रकरणांत बखरीपेक्षा कवींद्र परमानंद याचे काव्य हे आपले एक विश्वसनीय साधन ठरते. परमानंदाच्या म्हणण्याप्रमाणे शिवाजीमहाराजांनी युद्धात बाजीराव, कृष्णाराव आणि त्यांचे वडील चंद्रराव यांचा पाडाव केला आणि जावळी जिंकून घेतली. त्यांनी चंद्ररावांचे नातेवाईक आणि अनुयायी यांना ठार

मारले. हे घडल्यानंतर चंद्रराव वंशातील प्रतापराव हा आदिलशहाचा आश्रय घेण्यासाठी म्हणून गेला.

मोऱ्यांचे भाऊबंद जावळीहून पळून गेले. काही जणांनी मोगलांची चाकरी पत्करली. शिवाजीमहाराजांना त्यांचा उपसर्ग अधून मधून होत असे. उदा. महाराजांच्या विरुद्ध जयसिंगाने मोहीम उघडली त्यावेळी मोऱ्यांचे भाऊबंद जयसिंगाच्या चाकरीत होते.

महाराजांची जावळीची मोहीम म्हणजे सरळ सरळ सामना होता. या युद्धात महाराज अतिशय कडकपणे वागले यात संशय नाही; पण जावळी प्रदेशातून मोऱ्यांना कायमचे काढून लावणे आणि प्रतिकूल परिस्थितीशी झगडून उदयाला येऊ पहाणाऱ्या मराठी राज्याला तो जोडणे हाच त्यांचा उद्देश होता.

पण नियोजित विश्वासघात आणि मुद्दाम घडवून आणलेले खून, असे ह्या मोहिमेवर करण्यात आलेले आरोप हे निराधार आहेत. अशा प्रकरणांत बखरींच्यावर विसंबून रहाणे आणि अधिक विश्वसनीय साधनांकडे दुर्लक्ष करणे योग्य नव्हे.

जावळीचा प्रदेश मराठी राज्यांना जोडण्यात आला. रायरीचा किल्ला (नंतरचा रायगड) ताब्यात आला. त्यांतर शिवाजी महाराजांनी मध्य कोकणातील कुलाबा जिल्ह्यात (रायगड जिल्हा) आक्रमण केले. जंजिऱ्याच्या किनारपट्टीवर विजापूरचा कल्याण-भिंवडी प्रांत होता. या दोघांनाही शिवाजीमहाराजांच्या आक्रणामुळे मोठा शह निर्माण झाला. विजापूर आणि कोकण यांतील दळणवळण थांबवावे आणि कोकणात जाणाऱ्या घाटांचे रक्षण योग्य प्रकारे व्हावे यासाठी शिवाजीमहाराजांनी प्रतापगडचा जबरदस्त किल्ला बांधला. आयुष्यभर शिवाजीमहाराज असे अनेक किल्ले बांधीत होते, डागडुजी करीत होते किंवा पुनर्निर्मिती करीत होते.

विजापूरला शिवाजीमहाराजांकडून धोका हा होताच, पण विजापूरला ह्याहूनही मोठा धोका होता तो महत्वाकांक्षी राजपुत्र औरंगजेब ह्याच्याकडून. गोवळकोंड्यांच्या वाटेला आता जाऊ नका, उलट विजापूरवर आक्रमण करा अशा मसलतीकडे मीर जुमल्याने औरंगजेबाचे मन वळविले. आक्रमणासाठी मोगलांनी जी कारणे शोधून काढली ती अत्यंत भुसभुशीत होती. मुहम्मद अदिलशहाच्या मृत्यूनंतर अली आदिलशहा हा गादीवर आला. मोगलांनी आरोप केला की अली अदिलशहा हा मुहम्मद आदिलशहाचा मुलगाच नव्हे. दुसरा आरोप असा की, अली आदिलशहा ह्याचे राज्यरोहण घोषित करण्यापूर्वी मोगल सत्तेची परवानगी घेण्यास हवी होती. हे दोन्ही आरोप खोटे होते. विजापूरच्या गादीचा वारसा ठरविण्यासाठी मोगलांची आधी मान्यता घेतली पाहिजे असे कधीच ठरले नव्हते.

वरील कारणामागची दंडेली शहाजहानला सुद्धा पटली होती, पण त्याचे मन वळविण्याचे भक्कम प्रयत्न करण्यात आले, मोठ्या नाखुषीनेच त्याने आक्रमणाला मान्यता दिली. त्याने एकच अट घातली की कमीतकमी वेळात विजापूर जिंकले जावे, ते जर शक्य होत नसेल तर सन 1636 च्या तहाने निजामशाहीचा जो मुलुख विजापूरला देण्यात आला होता तो परत घेतला जावा.

मीर जुमला हसन सन 1657 च्या 18 जानेवारी रोजी दक्षिणेत आला. औरंगजेब आणि मीर जुमला हे बिदरवर चाल करून गेले; त्यांनी बिदरला वेढा घातला. सन 1657, 21 मार्च रोजी मोगलांनी बिदर जिंकून घेतले. कल्याणीचा किल्ला 31 जुलै 1657, रोजी त्यांच्या हाती आला. शिवाजीमहाराजांनी औरंगजेबाला पत्र लिहून काही सवलती मागितल्या. विजापूरला दुबळे करून सोडणे हे औरंगजेबाचे धोरण होते. त्याने 22 एप्रिल 1657 रोजी शिवाजीमहाराजांना लिहिले: ''वास्तविक पाहाता तुमच्या ताब्यात असलेले विजापूरचे सगळे किल्ले आणि महाल हे पूर्वीप्रमाणे तुमच्याकडे कायम करण्यात आले आहे. दाभोळचा किल्ला आणि दाभोळच्याखालील प्रदेश यांचे उत्पन्न तुम्ही इच्छिल्याप्रमाणे मी तुम्हाला देत आहे... तुमच्या उरलेल्या मागण्याही मान्य करण्यात येतील आणि तुमच्या कल्पनेच्या बाहेर तुमच्यावर मर्जी आणि कृपा दाखवण्यांत येईल.''

मोगलांच्या विजयामुळे शिवाजीमहाराजांना चिंता उत्पन्न झाली. त्यांना आपल्या पुणे आणि चाकणच्या प्रजेच्या सुरक्षिततेसंबंधी काळजी वाटू लागली. हे इलाखे (पुणे, चाकण) एकेकाळी निजामशाही राज्यात होते ते आता मोगलांच्या ताब्यात जाणार की काय? त्यामुळे शिवाजीमहाराजांनी विजापूरचे सरदार आणि सरंजामदार या नात्याने मोगलांचे विरुद्ध एक नवीन आघाडी उघडली. सन 1657 मध्ये त्यांनी जुन्नरवर चाल केली; आणि ते गांव लुटले. मोगलांच्या अहमदनगर जिल्ह्यातही त्यांनी आक्रमणे केली.

औरंगजेब रागाने बेभान झाला. शिवाजीमहाराजांना आपल्याकडे वळवून घ्यावे यासाठी केलेल्या प्रयत्नांचे हे फळ त्याला मिळत होते. औरंगजेबाचा कडवटपणा त्याने आपल्या अधिकाऱ्यांना दिलेल्या सूचनांवरून उघड होतो. त्याने आपल्या अधिकाऱ्यांना लिहिले, ''शिवाजीच्या मुलखावर हल्ला करा, खेडी उध्वस्त करा, कांही दयामाया न दाखविता लोकांची कत्तल करा आणि त्यांना संपूर्णपणे लुटा. शिवाजीच्या ताब्यातील पुणे आणि चाकण ही स्थळे संपूर्णपणे उध्वस्त झाली पाहिजेत. लोकांना ठार मारण्यांत आणि गुलाम करण्यात थोडीशीही कसूर होता कामा नये.''

या युद्धात विजापूरने मोठी चिवट झुंज दिली. मोगलांनी कल्याणी जिंकून घेतली पण नंतर त्यांची प्रगती मंदावली. विजापूरवर आक्रमण करण्यात मोगलांनी अन्याय केला आहे ही गोष्ट प्रत्येकाला दिसून आली. मोगल दरबारात औरंगजेबाला विरोध करणाऱ्या शक्ती होत्याच; त्यांच्या मनासारखे घडून आले. शहाजहानने औरंगजेबाला आज्ञा केली, ''युद्ध थांबवा आणि विजापूरशी तह करा.''

## ऑगस्ट 1657 चा तह

या तहाच्या अटी पुढील प्रमाणे होत्या: विजापूरने पुढील प्रदेश मोगलांना देऊन टाकावा, (1) बिदर, कल्याणी, परांडा आणि त्याखालचा प्रदेश, वांगीचा परगणा, पूर्वीच्या निजामशाही कोकणातील सर्व किल्ले, आणि ह्याबरोबरच एक कोटी रुपये युद्धखर्च द्यावा.

या अटी संपूर्णपणे अंमलात आल्या नाहीत. बिदर, कल्याणी ही स्थळे मोगलांपाशी राहिली. परांड्याचा किल्ला मोगलांना देण्यात विजापूरच्या अधिकाऱ्यांनी अडथळे आणले. पुणे जिल्ह्यात तर शिवाजीमहाराज ठाण मांडून होते. कल्याण भिवंडीचा प्रदेश अद्याप मोगलांकडे यावयाचा होता.

सन 1657च्या सप्टेंबर महिन्यात शहाजहानच्या गंभीर आजाराची अस्वस्थ करणारी बातमी आली. औरंगजेबाला उत्तरेकडे कूच करून जाण्यासाठी तयारी सुरू करणे भाग होते. मोगल गादीच्या वारसाचा त्याला आपल्या मनासारखा निकाल लावून घ्यावयाचा होता. दक्षिणेतील मोगलांची प्रकरणे गोंधळातच राहिली.

शिवाजीमहाराजांसमोर ही एक मोठीच संधी चालून आली. त्यांनी 24 ऑक्टोबर 1657 रोजी गरुडझेप घेतली आणि कल्याण व भिवंडी ही शहरे काबीज केली. सन 1658च्या जानेवारी महिन्यात त्यांनी माहुलीचा किल्ला जिंकून घेतला. अशा रीतीने त्यांनी किनारपट्टीपासून सह्याद्रीपर्यंत जुने निजामशाही कोकण आपल्या ताब्यात आणले.

शिवाजीमहाराजांनी मोगलांशी पत्रव्यवहार थांबविला नव्हता. ऑगस्ट 1657 च्या मोगल विजापूरच्या तहाने पुणे आणि कल्याण, भिवंडीचा प्रदेश मोगल साम्राज्याला जोडला गेला ह्याची जाणीव महाराजांना होती. मोगल साम्राज्याचा प्रजाजन म्हणून मोगलांशी संबंध कोणत्या प्रकारचे ठेवायचे हे महाराजांना ठरवावयाचे होते. असे दिसते की पुण्याची जहागीर आपल्या ताब्यात चालू रहावी अशी त्यांची इच्छा होती. व्यवहार म्हणून त्यांनी नुकताच जिंकलेल्या निजामशाहीच्या कल्याण-भिवंडीच्या प्रदेशावर हक्क सांगितला. कल्याण-भिवंडीचा प्रांत आणि

पुण्याची जहागीर ही त्यांच्याकडे कायम करण्यात आली असती आणि त्यांच्यावर त्यांचा निर्विघ्न ताबा रहिला असता तर महाराजांनी मोगलांना पूर्णपणे सहकार्य दिले असते.

संकर्षण हा आपल्या 'शिवकाव्य'या ग्रंथात म्हणतो, ''शिवाजीमहाराजांनी मुद्दामच आपल्या हालचाली कोकणापुरत्या मर्यादित ठेवल्या. मोगलांच्या ताब्यातील मुलखात आक्रमण करण्याचे त्यांनी टाळले.''

ही घटना (महाराजांचे कल्याण-भिवंडी घेणे) औरंगजेबाच्या जिव्हारी लागली. पण त्याला उत्तरेकडे जाण्याची घाई होती; त्यामुळे कोकण ताब्यात घेण्याविषयी त्याला काहींही करता येणे शक्य नव्हते. औरंगजेबाने विजापूर बरोबर सांत्वनपर तह करून सारवासारव केली. युद्धाची चिथावणी देण्याबद्दल त्याने सगळा दोष मीर जुमल्याला दिला. मुलुखाच्या तडजोडीद्दल औरंगजेबाच्या पुढील परिस्थिती स्पष्टपणे कळून येते. ''परांड्याचा किल्ला आणि त्याखालील प्रदेश, कोकण, आणि वांगीचा महाल हे साम्राज्याला जोडले गेले आहेत. कर्नाटकाचा जो भाग मरहूम आदिलशहाला देण्यात आला होता तो विजापूरकडे पूर्वीप्रमाणे राहील पण किल्ले आणि महाल हे मीर जुमल्याच्या बदलीनंतर मोगल साम्राज्याच्या खालसा सरकारमध्ये समाविष्ट करण्यात आले. ते आदिलशहासाठी सोडलेल्या प्रदेशांतून वगळण्यात येतील.''[1]

शिवाजीमहाराजांबद्दल औरंगजेबाने अली अदिलशहा यांस पुढीलप्रमाणे लिहिले, ''या देशाचे रक्षण करा. शिवाजीने गुपचुपपणे या देशांतील काही किल्ल्यांचा ताबा घेतला आहे. त्याला हाकलून लावा. त्याला तुमच्या चाकरीत ठेवायची तुमची इच्छा असली तर त्याला जहागिरी द्या. पण ती लांब कर्नाटकात. मोगल साम्राज्याच्या सीमेपासून लांब. म्हणजे सीमांना त्याच्यापासून उपद्रव होणार नाही''.

उत्तरेस जाण्यासाठी औरंगजेबाने 24 फेब्रुवारी 1658 रोजी औरंगबाद सोडले. त्यावेळी त्याने शिवाजीमहाराजांना पुढीलप्रमाणे लिहिले आहे: ''माझ्या वाडवडिलांपासून चालत आलेले, माझ्या पिढीजात वतनाचे सगळे महाल मला मिळाले आणि बादशाही फौजांनी पूर्वी निजामशहाकडे असलेले आणि आता आदिलखानाच्या ताब्यात असलेले प्रदेश आणि किल्ले मला दिले. अशी माझ्या मागण्या मान्य केल्याची सनद मला मिळाली ही आनंदाची बातमी मला मिळाल्यास

---

1. सरकार, जे. एन., द *लाइफ ऑफ मीर जुमला,* पृ 131.

मी माझा एक सरदार (सैन्यासह) आपल्या छावणीत रवाना करीन आणि दक्षिणेतील मोगलांच्या सीमांचे रक्षण करणे तेथे कोणतीही धामधूम होऊ न देणे याबद्दल मी बादशाही अधिकाऱ्यांशी मिळून पूर्णपणे झटेन.' तुमच्या वरील पत्राला माझे उत्तर असे की, तुम्ही सोनाजी (सोनाजी पंत डबीर) याच्याबरोबर पत्र लिहून त्याला माझ्याकडे पाठवा. पत्रात या मागण्या लिहून पाठवा म्हणजे त्या मान्य करता येतील... कोणत्याही परिस्थितीत ताबेदारी आणि स्वामीनिष्ठा या राजमार्गापासून ढळू नका.''

औरंगजेबाला प्रकरणाची फक्त चालढकल करावयाची होती. त्या अवधीत शिवाजी महाराज हे कोकणातील आपल्या जिंकलेल्या मुलखाचा बंदोबस्त करण्यात गुंतले होते. जंजिऱ्याचा शिद्दी फत्तेखान हा आता विजापूरच्या चाकरीत आला होता. त्याला आता शिवाजीमहाराजांचा मारा सहन करण्याची वेळ आली. पुढील दोन वर्षात महाराजांनी शिद्याची किनारपट्टीवरील अनेक स्थळे जिंकून घेतली. पण शिद्याचा समुद्रातील किल्ला जंजिरा हा होता, त्याची प्रभावी नाकेबंदी करणे त्यांना जमले नाही. शिवाजीमहाराजांच्या उदयामुळे पोर्तुगीजांनी धास्ती घेतली होती. ते शिद्दीला मदत करीत होते हे उघड आहे. सन 1659च्या सहा ऑगस्टच्या पोर्तुगीजांच्या एका पत्रावरून हे स्पष्ट होते. त्या पत्रात शिवाजीमहाराजांचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे, ''शहाजीच्या एका मुलाने आदिलशहाविरुद्ध बंड केले असून वसई आणि चौल या लगतचा प्रदेश काबीज केला आहे. तो प्रबळ झाला आहे. वसई प्रांतातील भिवंडी, कल्याण, आणि पनवेल या बंदरात त्याने काही लढाऊ जहाजे तयार केली आहेत. त्यामुळे आम्हाला सावध रहाणे भाग आहे. पोर्तुगीज अधिकाऱ्याला आम्ही आज्ञा केली आहे की ही जहाजे बंदरातून बाहेर पडणार नाहीत आणि समुद्रातून संचार करणार नाहीत याविषयी त्याने बंदोबस्त करावा.''[1]

कल्याण शिवाजी महाराजांच्या ताब्यात आले होते. तेथे आरमाराच्या बांधणीचे काम जोरात सुरू झाले. कुशल लोकांच्या देखरेखीखाली वीस लढाऊ जहाजे बांधण्यात येऊ लागली. शिवाजीमहाराजांचे म्हणणे असे की ही जहाजे जंजिऱ्याच्या शिद्याविरूद्ध उपयोगात आणण्यात येतील. पण वास्तविक पाहता महाराजांचे हेतू त्याहूनही व्यापक होते. कोकणचा अधिकारी भाग महाराजांच्या ताब्यात येऊ लागला, त्यांनी समुद्रकाठावर पद्मदुर्ग, विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, सिंधुदुर्ग

1. पिसुर्लेकर, *पोर्तुगीज-मराठे संबंध,* पृ 41.

आणि इतर किल्ले बांधले. आपल्या आरमाराला ह्या किल्ल्यांमुळे संरक्षण मिळावे आणि पोर्तुगीजांच्या हालचालींवर लक्ष ठेवता यावे आणि त्यांच्या हालचालींवर बंधने पडावीत असा त्यांचा हेतू होता.

मोगलांची शक्ती ही जमिनीवरील, खुष्कीवरील शक्ती होय; दर्यावरील नव्हे. आरमार उभे करण्याकडे त्यांनी दुर्लक्ष केले. त्यांची यात्रेकरूंची जहाजे आणि व्यापार करण्याची जहाजे यांनासुद्धा आपल्या सुरक्षिततेसाठी किनाऱ्यावरील युरोपियनांच्या आश्वासनांवर आणि खातरजमेवर अवलंबून राहावे लागे. अर्थात समुद्रावरील दळणवळणाचा नाश करणारे चाचे, यांच्याविरूद्ध संरक्षण असे काही नव्हतेच. पुष्कळ वर्षे लोटली. जंजिऱ्याचे शिद्दी हे मोगलांना मिळाले तेव्हा कोठे मोगलांचे एक चिमुकले आरमार समुद्रकाठावर दिसू लागले.

अशा परिस्थितीत शिवाजीमहाराजांनी आरमारावर जो भर दिला त्यातून त्यांचे दूरदर्शित्व दिसून येते. भारतीय नाविक दलाचे त्यांना जनक म्हणणे हेच योग्य ठरेल.''

2

# शिवाजीमहाराज आणि अफजलखान

वारसाच्या झगड्यात औरंगजेब गुंतला होता. त्याचा तरुण मुलगा मुअज्जम हा दक्षिणेचा सुभेदार होता. मोगलांच्या आक्रमणापासून विजापूरला आता उसंत मिळाली होती. पण ही तात्पुरती आहे हे विजापूरने ओळखण्यास हवे होते. औरंगजेबाचे नरमाईचे धोरण वास्तविक पाहाता कोणत्या उद्देशाने आहे आणि त्याचे खरे स्वरूप काय आहे हे विजापूरला माहीत असावयास पाहिजे होते. विजापूर खालसा करून मोगल साम्राज्याला जोडणे हा मोगलांचा उद्देश स्पष्ट स्वच्छ आणि उघड होता, तो काही लपलेला नव्हता. उत्तरेकडील सीमा (मोगलांच्या हद्दीवर) सुरक्षित झाल्या हे पाहून विजापूरने आपले लक्ष शिवाजीमहाराजांकडे वळविले.

हा लढा सरळ सरळ राजकीय लढा होता. शिवाजीमहाराजांचा नाश करणे हा विजापूरचा उद्देश आणि जगण्यासाठी लढणे महाराजांना भागच होते. शिवाजीमह.राजांचे समकालीन चरित्रकार त्यांच्या काळातील कवी आणि त्यांच्या कारकिर्दीचे बखरकार हे कमी-अधिक प्रमाणात या प्रकरणाच्या जातीय पैलूंवर भर देतात. हे ग्रंथकार पुराणे, रामायण, महाभारत इत्यादीच्या परंपरेत वाढलेले, कोणत्याही लढ्याचा अर्थ लावताना ते पुराणांचाच संदर्भ डोळ्यासमोर ठेवणार; पुराणात वर्णन केलेले अवतार आणि सज्जन व दुष्ट यांच्यातील लढे हे आदर्श डोळ्यांसमोर. घटनांच्या मागे असलेली राजकीय, सामाजिक आणि आर्थिक कारणे यांची त्यांना जाण नसे. विजापूर राज्यातील सरंजामी पद्धत, तेथील पठाण, शिद्दी, दक्षिणी मुसलमान यांचे आपसांतील संघर्ष, विजापूर राज्यातून मोगल साम्राज्याकडे अखंड वाहात जाणारा सैनिक, सरदार, मुत्सद्दी, अधिकारी यांचा ओघ इत्यादी घटनांच्याकडे अशा ग्रंथकारांचे लक्षच गेले नाही. मोगल साम्राज्याबद्दलही त्यांना फारशी माहिती नव्हती. मोगल राज्याचे स्वरूप काय, तिची घटना काय, तिचा आधार काय, तिचे उद्देश काय, परक्यांचा प्रचंड भरणा असलेली त्या राज्यातील लष्करी आणि मुलकी खाती यांचे स्वरूप काय, कशाचाही त्या

ग्रंथकारांना पत्ता नव्हता. मोगलांचे आणि विजापूरचे इतिहास आणि बखरी ही सुद्धा काही फारशी भिन्न नव्हती. या ग्रंथातून एक सूर सामान्यपणे दिसून येतो, 'प्रतिस्पर्धी हे सैतान आणि काफिर आहेत आणि त्यांच्याशी युद्ध करणे हे धर्मयुद्ध आहे.' अशा परिस्थितीत इतिहासकाराला त्या काळच्या संघर्षांत गुंतलेल्या शक्तींची तपासणी करताना बखरकारांपेक्षा अधिक अशी चिकित्सक दृष्टी ठेवणे भाग आहे.

विजापूरने शिवाजीमहाराजांविरूद्ध जी मोहीम उघडली ती अतिशय अदूरदर्शीपणाची आणि अनुचित होती असे काही इतिहास-अभ्यासकांना वाटते. कोकणात आपली सत्ता बळकट करणे हा हेतू होता. येथे कोकण म्हणजे आदिलशाही कोकण (दाभोळ ते गोवा असे) समजावे लागेल. कारण मोगल साम्राज्यास जोडले गेलेले पुणे जिल्हा, आणि कल्याण-भिवंडी प्रदेश यांचे भवितव्य अनिश्चित होते. विजापूरचे शत्रू हे मोगलच, शिवाजीमहाराज नव्हेत. शिवाजीमहाराजांनी विजापूरचे सार्वभौमत्व नाकारले नव्हते. महाराजांची इच्छा कोकणचा प्रदेश आपल्या रास्त ताब्यात असावा ही होती, त्याबद्दल कांही ठरविक रक्कम दरवर्षी विजापूरला ते देण्यास तयार होते. या बाबतीत विजापूरचे इतर सरदार जे करीत होते तेच महाराज करीत होते. धारवाड, बेळगाव प्रदेशांतील पठाण कर्नूलचे शिद्दी, आणि रायबाग, दक्षिण कोकण आणि कारवार येथील शिद्दी हे सगळेजण असेच वागत होते.

या पद्धतीबद्दल डच लोकांनी पुढील शब्दांत चर्चा केली आहे, ''राजा आपल्या सरदाराला मोठा प्रदेश देतो त्याचे फर्मान, (आज्ञापत्र) देऊन तो त्याच्यावर कृपा करतो, त्या सरदाराचा हुद्दा काही वंशपरंपरा नसतो. बादशहाची केवळ कृपा म्हणून त्याला हा लाभ होतो. काही सरदार (लीनबेरेन-लॉर्ड-सरदार) प्रत्यक्षात असे वागतात जणू काय ते स्वतंत्रच आहेत. अशा सरदारांत एक प्रमुख म्हणजे सरदार बहलोलखान हा आहे. तो विजापूरच्या बादशहाचा केवळ नावाचा सेवक आहे.''

जे जिल्हे मोगल साम्राज्याला जोडण्यात आले होते (पुणे, कल्याण, भिवंडी) तेथून शिवाजी महाराजांना काढून लावण्याची औरंगजेबाची तीव्र इच्छा होती. आदिलशहाला त्याने जे पत्र लिहिले होते त्यात त्याने मागणी केली होती की शिवाजीला वरील प्रदेशातून काढून लावावे. त्या पत्राचा उल्लेख मागील प्रकरणात करण्यात आला आहे. मोगलांच्या ह्या सूचनांप्रमाणे अंमल करण्याचे विजापूरने ठरविले.

मोगल आणि शिवाजीमहाराज यांच्या प्रकरणात विजापूरला काटेकोरपणे तटस्थ असे धोरण राखणे शक्य होते. तसे पाहता खालसा केलेल्या मुलखात मोगलांनी शिवाजी महाराजांशी कसे वागावे आणि कसे वागू नये हे ठरविण्याचे काम मोगलांचेच होते, ते काम विजापूरचे नव्हते. मोगलांच्याकडून आपल्याला अंतिम धोका आहे याची जाणीव विजापूरने ठेवायला हवी होती. दक्षिण कोकणातील शिवाजीमहाराजांच्या हितसंबंधाची खातरजमा देऊन त्यांच्याशी विजापूरला तडजोड करता येणे शक्य होते. विजापूरतर्फे इतर सरदारांशी अशाच तडजोडी झाल्या होत्या; तोच प्रकार महाराजांच्या बाबतीत करता आला असता. असे झाले असते तर मोगलांशी व्यवहार करताना विजापूरची बाजू अधिक बळकट झाली असती, पण असे न करता मोगलांना हवे ते करण्यास विजापूर सिद्ध झाले. खरे पाहता शिवाजीमहाराजांच्या विरुद्ध विजापूर असा हा लढा नव्हताच, उत्तरेत गुंतलेले मोगल विजापूरच्या आड राहून महाराजांशी लढत होते.

शिवाजीमहाराजांविरुद्ध मोहीम करण्याचे ठरविल्यावर विजापूरला त्या मोहिमेचे समर्थन करण्यास कारणेही बरीच सापडली. त्यांचे प्रमुख उद्देश दोन होते. एक उद्देश होता, शिवाजीमहाराजांचा संपूर्णपणे नाश करणे आणि दुसरा होता, मोगलांना देऊ करण्यात आलेला मुलुख हा (पुणे, कल्याण, भिवंडी) व्यवस्थितपणे आणि कोणत्याही अडचणीविना मोगल साम्राज्यात समविष्ट होईल असा बंदोबस्त करणे. विजापूरचा सेनापती अफजलखान याला ज्या सूचना देण्यात आल्या, त्यातून हाच एक अर्थ निघतो; दुसरा कोणताच निघत नाही.

आदिलशाही दरबारांतील एक सरदार, आणि *तारीखे अली* [1] आदिलशहाच्या या समकालीन चरित्राचा लेखक नुरुल्ला म्हणतो, "अफझलखानाला निरोप देतेवेळी आदिलशहाने त्याला पुढील सूचना दिल्या. विजापूरच्या सैन्याने शिवाजीला कोंडीत पकडले तर तो आपल्या नेहमीच्या कुटिल स्वभावाला अनुसरून शांततापूर्ण शरणागती पत्करण्याची भाषा बोलू लागेल. पण तुम्ही त्याचे मुळीच ऐकता कामा नये. त्याच्या बाबतीत तुम्ही एकच धोरण स्वीकारावे. ते म्हणजे त्याच्या जीवनरूपी धान्याच्या राशीवर मृत्यूरूपी अग्नीचा वर्षाव करणे." (म्हणजे त्याला ठार मारणे)

आपल्या ग्रंथात यापूर्वी नुरुल्ला याने जे विवेचन केले आहे तेही तितकेच उद्‌बोधक आहे. त्यावरून त्याकाळच्या बखरलेखनाचे स्वरूप आणि दर्जा ही

1. सरकार, यदुनाथ, *शिवाजी,* तिसऱ्या प्रकरणाचे परिशिष्ट, पृ. 73.

समजून येतात. नुरुल्ला म्हणतो, "अली आदिलशहाला एक गोष्ट दिसून आली. शत्रूनाशक तलवारींतून निघणाऱ्या आगीत काफर धर्माचे रान जळून भस्म झाल्याशिवाय मुसलमानी धर्माचे पालन आणि आचरणही शक्य होणार नाही. त्याने अफझलखानाची नेमणूक केली; त्याच्याबरोबर दहा हजार स्वारांचे सैन्य दिले. हेतू हा की त्या दुष्ट शिवाजीला शिक्षा व्हावी आणि त्याची पाळेमुळे उखडून काढण्यात यावी."

वाई प्रांताचा सुभेदार म्हणून अफझलखानाची नेमणूक झाली. आदिलशहाने 16 जून 1659 रोजी मराठा सरदार कान्होजी जेधे याला पुढीलप्रमाणे *फर्मान* (आज्ञापत्र) पाठविले. फर्मानाची भाषा पाहाण्यासारखी आहे, "संकुचित विचारसरणी आणि दुष्ट स्वभाव यामुळे प्रवृत्त होऊन शिवाजीने पूर्वेच्या निजामशाही अंमलातील कोकणात असलेल्या मुसलमानांचा छळ करण्यास सुरुवात केली आहे त्याने त्यांना (मुसलमानांना) लुटलेही आहे. बादशहाच्या (मोगल) मुलखातील अनेक किल्ले त्याने बळकाविले आहेत. त्यामुळे, त्याचे परिपत्य करण्यासाठी आणि त्याला हाकलून लावण्यासाठी आम्ही अफझलखानाची नेमणूक केली आहे."

सन 1659च्या एप्रिल महिन्यात अफझलखान हा विजापुरातून बाहेर पडला. त्याच्या सैन्यात अनेक मराठे सरदार होते. अफझलखानाने या मोहिमेत तुळजापूर आणि पंढरपूर येथील देवळे पाडली असा आरोप करण्यात येतो; पण याला काही पुरावा नाही. तुळजापूर हे गाव त्याच्या वाटेवरच नव्हते. काय झाले असावे ते असे. आपल्या मोहिमांसाठी त्याने देवळांकडून मुबलक पैसे मागितले असावे. हा पैसा मिळाला नाही तर देवळे नष्ट करीन अशी धमकी त्याने दिली असावी. अशा गोष्टी नेहमी होत. अशा धोक्याच्या प्रसंगी दुष्टांच्या हातून मूर्तीचे रक्षण करण्यासाठी लोक मूर्ती लपवून ठेवीत. पंढरपुरात या मोहिमेच्या प्रसंगी अशी गोष्ट घडली हे समकालीन कागदपत्रावरून सिद्ध आहे. तुळजापूरला उपसर्ग झाला असेल तर तो अफझलखानाकडून पूर्वीच्या एखाद्या मोहिमेच्या प्रसंगी झाला असावा. सामान्यपणे समजूत अशी की तुळजापूर येथील भवानीची मूर्ती ही तिच्या भक्तांकडून पश्चिमेकडे हलविण्यात आली असावी. ती मूर्ती म्हणजे कदाचित प्रतापगडची देवी असावी.

शिवजीमहाराज हे वाईला (जावळी) आले. अफझलखानाने आपली सैन्ये पुणे जिल्ह्याचा म्हणजे महाराजांच्या राज्याचा ताबा घेण्यासाठी रवाना केली. यानंतर तो महाराजांच्या विरुद्ध मोहिमेची योजना करू लागला.

आपल्या अस्तित्वालाच किती धोका निर्माण झाला आहे ह्याची महाराजांना

पुरेपूर कल्पना आली. ऐन पेचप्रसंगाच्या त्या काळात महाराजांची आजारी असलेली पत्नी सईबाई (संभाजी राजांची आई) ही सन 1659च्या सप्टेंबर महिन्यात वारली. तिच्या मृत्यूने महाराजांना फार धक्का बसला. पण हे दु:ख त्यांनी मोठ्या संयमाने सहन केले. यापूर्वीच ते सन 1659 च्या 11 जुलै रोजी पुण्याजवळील आपली राजधानी, राजगडहून निघून महाबळेश्वरच्या डोंगरातील प्रतापगड येथे ठाण मांडून राहिले होते. प्रतापगड हे वाईहून कांही किलोमीटर अंतरावर आहे.

## अफझलखानाचा निर्वाणीचा इशारा

कवींद्र परमानंदाच्या 'शिवभारत' ह्या संस्कृत काव्यात दोन पत्रे समाविष्ट झाली आहेत. एक पत्र अफझलखानाकडून महाराजांना आलेले, आणि दुसरे महाराजांच्याकडून अफझलखानाला गेलेले उत्तर; अशी ही पत्रे आहेत. पत्रे पहाता ती म्हणजे मूळ पत्रांची शब्दश: संस्कृतमध्ये केलेली भाषांतरे असावीत असे वाटते. अभावितपणे झालेल्या या भाषांतरांमुळे पुढील पिढ्यांच्यासाठी महाराज आणि अफझलखान यांचा पत्रव्यवहार अशा विलक्षण रीतीने सुरक्षित राहिला. अफझलखानाने महाराजांना निर्वाणीचा जो इशारा पाठविला तो पुढीलप्रमाणे आहे.

1. निजामशहा संपल्यावर त्याचा जो मुलुख आदिलशहाने घेतला होता तो त्याने शांतता नांदावी म्हणून मोगलांना दिला. डोंगरी किल्ल्यांनी भरलेला हा मुलुख तुम्ही (महाराज) बळकावून बसला आहात.
2. राजपुरीचा सरदार (जंजिऱ्याचे शिद्दी) त्याला तुम्ही अनेक वेळा वेढा घातला होता; त्याचा मुलुख तुम्ही घेतला. तो तुमच्यावर संतप्त आहे.
3. चंद्रराव (मोरे) याचे राज्य हे किती दुर्गम पण तुम्ही त्याच्यावर आक्रमण केले आणि युद्ध करून ते मोठे राज्य जबरदस्तीने बळकाविले.
4. तुम्ही कल्याण आणि भिवंडी ही पण ताब्यात घेतली आणि असे म्हणतात की तुम्ही तेथील मशिदी नष्ट केल्या.
5. तुम्ही मुसलमानांचे सर्वस्व लुटले. तुम्ही त्यांचा अपमान केलात, ते तुमच्यावर दात-ओठ खात आहेत.
6. आपली शक्ती किती ह्याचीही तुम्हाला जाण नाही. तुम्ही इस्लामच्या धर्मशास्त्र्यांना आणि फकीर अवलियांना निर्बंधात ठेवले. मुसलमानांना त्यांच्या धर्माप्रमाणे आचरण करण्यात तुम्ही अडथळे निर्माण केलेत.

7. तुम्ही राजेशाहीची चिन्हे मुक्तपणे वापरता, सुवर्ण सिंहासनावर अन्यायाने बसता. स्वत:च्या सत्तेने तुम्ही लोकांना दंड करता, शिक्षा देता, अगर कृपा दाखविता, आणि ज्यांची ताबेदारी करावयाची त्यांची आज्ञा पालन करण्यास दुराग्रहाने नकार देता. तुम्ही मनाला येईल तसे स्वच्छंदपणे फिरता. तुम्हाला कुणाचा धाक नाही. ह्या सर्व कारणांसाठी थोर अशा आदिलशहाने मला पाठविले आहे.
8. माझ्याबरोबर असलेले सैन्य, मी तुमच्याशी लढावे म्हणून सारखा आग्रह करीत आहे. मुसेखान आणि माझे इतर अधिकारी ह्यांचीही इच्छा लढण्याची आहे. जावळी परत घेऊ पहाणारे सरदार, त्यांचीही हीच इच्छा आहे. मी तुमच्याविरूद्ध चालून जावे असे त्या सर्वांचे मला पुन:पुन्हा सांगणे आहे.
9. म्हणून, हे सरदारा, माझ्या आज्ञेचे पालन कर, तुझा सगळा मुलुख आणि किल्ले देऊन टाक.
10. सिंहगड आणि लोहगड हे मोठे आणि बळकट किल्ले, तसेच पुरंदरचा किल्ला, चाकणचे गाव, निरा आणि भिमा ह्या नद्यांच्या मधील प्रदेश, हा सर्व भाग तुम्ही अमाप शक्ती असलेल्या दिल्लीच्या सम्राटांना परत करा.
11. आणि अली (आदिल) शहा यांची मागणी ही आहे की चंद्रराव याजकडून जबरदस्तीने बळकविलेले जावळींचे राज्य तुम्ही देऊन टाकावे.

शिवाजीमहाराजांनी मशिदी नष्ट केल्या ही गोष्ट म्हणजे निखळ अपप्रचार होय. ही गोष्ट डॉ. फ्रायर यांची डायरी, खंड पहिला, पृ. 301 हे वाचून स्पष्ट होते. वरील घटनेनंतर (अफझलखान प्रसंग) काही वर्षातच डॉ. फ्रायर यांनी कल्याणला भेट दिली. कल्याणमधील धार्मिक स्थळांची त्यांनी काळजीपूर्वक पाहाणी केली; आणि तिची नोंद केली आहे.

विजापूरने शिवाजीमहाराजांविरुद्ध मोहीम चालू केली, असे जरी असले तरी खरा लढा मोगलच लढत होते असे दिसून येईल. फरक एवढाच की मोगल हे उत्तरेत गुंतले असल्याने ते विजापूरला पुढे करून आपला डाव साधीत होते. या प्रकरणात विजापूर हे औरंगजेबाच्या इच्छेप्रमाणेच वागत होते हे उघड आहे.

शिवाजीमहाराज मोठ्या पेचात सापडले होते. शरण जाणे, म्हणजे राजकीय आत्महत्याच होय. या पेचातून ते यशस्वीपणे बाहेर कसे पडले? त्यांचा दुर्दम्य

आत्मविश्वास हाच त्यांना ह्यावेळी उपयोगी पडला. आपण एका न्याय्य उद्दिष्टासाठी झगडत आहोत आणि परमेश्वर आपल्या पाठीशी आहे हा प्रचंड आत्मविश्वास त्यांच्या ठायी वसत असल्यामुळे त्या बळावरच ते यशस्वी होऊन या आणिबाणीच्या प्रसंगातून बाहेर आले.

आपल्या अनुयायांमध्ये निष्ठा आणि आत्मविश्वास निर्माण करण्याची अद्वितीय क्षमता शिवाजीमहाराजांजवळ होती. या मोहिमेत त्यांच्या मातबर आणि हयातभर साथ देणाऱ्या सोबत्यांची नावे आपल्याला आढळतात. पेशवे मोरोपंत पिंगळे, घोडदलाचे प्रमुख नेताजी पालकर आणि इतर अनेक सरदार त्यांच्याबरोबर होते. शिवाजीमहाराजांनी कोकणातून आपली पायदळ पथके बोलावून घेतली होती. घोडदळाच्या हालचाली नेताजी पालकरांकडे सोपविण्यात आल्या होत्या. प्रतापगडाच्या भोवती असलेल्या डोंगरातून प्रबळ अशा मराठा पथकांना तैनात करण्यात आले होते.

अफझलखानाचे मन वळवून त्याला जावळीच्या बळकट स्थळी आणावा असा महाराजांचा हेतू होता. त्याने अफझलखानाला जे पत्र लिहिले ते म्हणजे मुत्सद्देगिरीची कमाल होय. त्या पत्रात अफझलखानाला जितका फुगवला आहे तितकेच महाराजांनी आपण किती भयभीत झालो आहोत आणि आपण कसे काळजीत आहोत हे दाखविले आहे. पत्र पुढीलप्रमाणे आहे:

1. तुम्ही युद्धामध्ये कर्नाटकातील राजे लोकांचा नि:पात केला. तुमच्यासारख्या श्रेष्ठ माणसाने माझ्यावर इतकी कृपा करावी हीच मोठी गोष्ट होय.
2. तुमच्या बाहूंची शक्ती केवळ अतुलनीय आहे. तुमचे शौर्य म्हणजे अग्नीसारखे आहे. तुम्ही म्हणजे पृथ्वीचे एक भूषण आहात. तुमच्यामध्ये कपट नाही.
3. इकडील रानावनांतील सौंदर्य पाहावयाचे असल्यास आपण इकडे यावे आणि जावळीचा परिसर पाहावा.
4. माझ्या मते आपण आताच इकडे येणे अतिशय योग्य होईल. आपण आल्याने मी सर्व प्रकारे निर्भय होईन; आणि माझ्या उन्नतीचा मार्ग मोकळा होईल.
5. अरेरावी मोगलांचे सैन्य मी तुच्छ समजतो. आदिलशहाच्या सैन्याबद्दलही माझी हीच भूमिका आहे. ह्याला अपवाद म्हणजे भयंकर शक्तीने युक्त असलेले तुम्ही होत.

6. आपण यावे, आपला प्रवास सुखाचा व्हावा. मी आपले किल्ले देऊन टाकीन आणि आपण मागितल्याप्रमाणे जावळीही देऊन टाकीन.
7. तुमच्याकडे दृष्टी उचलून पाहाण्याचीही हिंमत कुणालाच होत नाही. पण मी नि:शंकपणे तुमच्याकडे पाहीन, आणि माझे शस्त्र तुमच्या समोर ठेवीन.
8. हे जुनाट व अफाट अरण्य पाहात असता आपले सैन्य पाताळाच्या छायेचे सुख अनुभवील.

त्या पत्राची भाषा काळजीपूर्वक लिहिण्यात आली आहे. त्या पत्रातून एकाहून अधिक अर्थ निघतात. या पत्राचा जो परिणाम व्हावा अशी महाराजांची इच्छा होती तोच परिणाम अफझलखानावर झाला. उभयपक्षाकडील वकिलांची ये-जा झाली आणि त्याचे सोबती आणि सहकारी नको म्हणत असतानाही अफझलखानाने जावळीला जाण्याचा घातुक मार्ग पत्करला. त्याने आपला तोफखाना आणि मुख्य छावणी ही वाईला ठेवली. पण जावळीला जाताना त्याच्या बरोबर बरेच सैन्य होते.

प्रतापगड किल्ल्याच्या बाहेर एक शामियाना उभा करून तेथे शिवाजीमहाराज व अफझलखान यांची भेट व्हावी असे ठरले. त्या दोघांनी आपल्याबरोबर दहा शरीरसंरक्षक घ्यावे. ती माणसे भेटीच्या जागेपासून बाणाच्या टप्प्याच्या अंतरावर ठेवावीत असे ठरले. शिवाजीमहाराज आणि अफझलखान हे शामियान्यांत असताना सशस्त्र राहतील. त्यावेळी शामियान्यांत त्यांच्याबरोबर दोन किंवा तीनहून अधिक सेवक राहणार नव्हते. या सेवकांत अफझलखानाचा वकील कृष्णाजी आणि महाराजांचा वकील पंताजी ह्यांचा समावेश होता.

परमानंदाने आपल्या काव्यात शिवाजीमहाराजांच्या शरीरसंरक्षकाची नावे दिली आहेत. त्यापैकी काही नावे म्हणजे, संभाजी कावजी, काटोजी इंगळे, सिद्दी इब्राहीम, आणि इतर ही होत. अफझलखानाच्या शरीरसंरक्षकांत रहीम खान, पहिलवान खान, शंकराजी मोहिते, आणि इतर यांचा समावेश होता. वरील नावे पाहता लढ्याचे राजकीय स्वरूप ठळकपणे जाणवते. परस्पर विरोधी पक्ष मराठी आणि फारशी बखरींतून सुचवितात तसा हा लढा काही जातीय नव्हता.

शिवाजीमहाराजांच्या आयुष्यातील हा अत्यंत आणिबाणीचा प्रसंग होता. त्यांच्यावर जवळ असह्य वाटण्याइतका ताण पडला असला पाहिजे. पण त्यांचे अध्यात्मिक बळ प्रचंड होते. आपला धर्म, आणि आपल्या परंपरा यांच्याविषयी त्यांची निष्ठा दृढ होती. आपली मातोश्री जिजाबाई यांचा आशीर्वाद ते नेहमी घेत

असत. आपण आपल्या लोकांच्यासाठी झगडत आहोत, ह्या लढ्यांत आपल्याला परमेश्वराचे मार्गदर्शन होत आहे अशी त्यांची अटळ श्रद्धा होती. महाराज हे खोल अध्यात्मिक प्रवृत्तीचे थोर पुरूष आहेत, अशी त्यांची प्रतिमा जनमानसात रूजली होती. यातूनच भवानी मातेने त्यांना दर्शन देऊन, आशीर्वाद दिला अशा कथा रूढ झालेल्या दिसतात.

## अफझलखानाशी भेट

शिवाजीमहाराज आणि अफझलखान यांची भेट सन 1659 च्या 10 नोव्हेंबर रोजी झाली. दोघेही शामियान्यात आले, तेव्हा ते पूर्णपणे सशस्त्र होते. त्यांच्याबरोबर त्यांचे वकील होते. शिवाजीमहाराजांपाशी एक पट्टीश तलवार (रूंद पात्याची), एक लांब खंजीर (कृपाण), ही शस्त्रे होती. कदाचित हातात लपून ठेवलेली वाघनखेही असावीत. कवींद्र परमानंद हा वाघनखाचा उल्लेख करीत नाही. भीमसेन सक्सेनासारखे इतिहासकार यांनी बिचवा (बांकदार कट्यार) आणि वाघनखे यांची कदाचित् गल्लत केली असावी. वास्तविक पाहता ही दोन्ही शस्त्रे भिन्न आहेत.

अफझलखानापाशी तलवार आणि खंजिर ही होती. शिवाजीमहाराजांना आपल्याबद्दल विश्वास वाटावा म्हणून अफझलखानाने आपली तलवार आपल्या नोकराच्या हातात दिली. शिवाजीमहाराजांनी आपलीही तलवार आपल्या नोकराच्या हातात दिली किंवा असे याबद्दल परमानंद काहीच सांगत नाहीत. इतर बखरीत मात्र महाराजांनी तलवार आपल्या नोकराला दिली असे म्हटले आहे; हे खरे दिसते.

परमानंदाच्या म्हणण्याप्रमाणे, महाराजांना अफझलखान भेटला त्यावेळी त्याने त्यांच्यापाशी पुढील मागण्या केल्या; "तुमची ही गर्विष्ठ आणि उद्धट वागणूक टाकून द्या आणि संपूर्ण शरणागती पत्करा." अफझलखानाने महाराजांना पुढे म्हटले, "माझ्या हाताने मी तुम्हाला विजापूरला घेऊन जाईन, बादशहासमोर मुजरा करण्यास लावीन, आमच्या प्रबळ बादशहाला मी नम्रपणे विनंती करीन आणि तुमच्यासाठी याहूनही अधिक वैभव मिळवून देईन. तुम्ही गोंधळू-घाबरू नका. तुम्ही आपला हात माझ्या हातात द्या, आणि मला आलिंगन द्या."

शिवाजीमहाराज अफझलखानाच्या मिठीत सापडले. त्यांना ठार मारण्याचा मोह अफझलखानाला अनावर झाला असावा. परमानंद म्हणतो, "असे म्हणून त्याने (अफझलखानाने) आपल्या डाव्या हाताने त्यांची (महाराजांची) मान धरली

आणि दुसऱ्या हाताने महाराजांच्या कुशीवर कट्यारीने वार केला. शिवाजीमहाराज हे एक कसलेले मल्ल होते. त्यांनी तडाखून आपली मान सोडवून घेतली. आपली वृत्ती शांत ठेवली. कट्यार त्यांच्या कुशीत शिरत होती, पण महाराजांनी आपले शरीर किंचित् आकसून घेऊन तो प्रहार चुकविला. त्यानंतर त्यांनी आपला खंजीर अफझलखानाच्या पोटात खोलवर खुपसला. या आघातामुळे अफझलखानाचा झोक जाऊ लागला. आणि तो अडखळत चालू लागला. तो आपल्या अनुयायांना म्हणाला, ''याने मला मारले, याला ठार मारा, शत्रूला ताबडतोब ठार मारा.''

शिवाजीमहाराजांनी बैठकीच्या उंच जागेवरून खाली उडी घेतली, त्याचवेळी अफझलखानाच्या अनुयायांनी महाराजांवर तलवारीचा वार केला.''

परमानंदांच्या मते महाराजांनी अफझलखान आणि त्याचा अनुयायी ह्या दोघांनाही ठार मारले. त्यांनी त्यांची शिरे उडविली.

परमानंदानी दिलेली ही हकिकत इतर मराठी बखरींहून भिन्न आहे. हल्ल्याच्या वेळी महाराजांच्या जवळ तलवार नव्हती. त्यांनी खंजीर आणि वाघनखे यांचा उपयोग केला. अफझलखानाला त्यांनी प्राणांतिक जखम केली. परमानंदावर विश्वास ठेवला, तर असे म्हणावे लागेल की महाराजांनी तलवारीचा शेवटचा वार केला आणि अफझलखानाचा शिरच्छेद केला. हे खरे नाही. अफझलखानाचा संपूर्ण निकाल लावणारे महाराजांचे सोबती होते. ते अफझलखानाच्या मागोमाग गेले आणि त्यांनी त्याला ठार मारले. शरीरसंरक्षक शामियान्यात घुसले. शामियान्यात मारामारी झाली. महाराजांवरही हल्ला झाला. त्यांनी मोठ्या निर्धाराने स्वत:चे रक्षण केले. थोड्याच वेळात अफझलखानाचे सर्व शरीरसंरक्षक आणि त्याचा वकील हे जखमी तरी झाले अगर मारले गेले. महाराज किल्ल्यावर निघून गेले.

महाराजांनी दगा केला असे फारशी बखरी सांगतात. ते असे का म्हणतात हे समजण्यासारखे आहे. मराठी बखरीतील मजकूर नेमका याच्याविरुद्ध आहे. इतिहासकाराचा निर्णय हाच की, ''महाराजांनी सावधगिरी बाळगली आणि समयसूचकता दाखवली. अफझलखानाला मात्र आपल्या फाजील आत्मविश्वासाची किंमत मोजावी लागली.''

महाराजांचा, आधी ठरल्यामुळे इशारा मिळताच त्यांची सैन्ये अफझलखानाच्या सैन्यावर तुटून पडली. हा हल्ला अचानक होता. अफझलखानाचे सैन्य नष्ट झाले. मराठ्यांच्या हाती जी लूट लागली ती अगणित होती. महाराजांच्या कारकिर्दीच्या शेवटी सभासद हा त्यांच्या पदरी होता. महाराजांच्या मृत्यूनंतर सोळा वर्षांनी, म्हणजे इ.स. 1696 मध्ये सभासदाने महाराजांचे चरित्र लिहिले आहे.

अफझलखानवरील युद्धातील लुटीचा उल्लेख करताना तो म्हणतो:

"65 हत्ती व हत्तिणी सुमार, 400 हजार घोडे सुमार, 3,00,000 जडजवाहीर, 1,200 उंटे सुमार, 2,000 कापड वोझी, 7,00,000 नगद व मोहरा व होन सोने रूपये भांडी तोफखाना, सर्वही घेतले." कलम[1]

ह्या विजयामुळे मराठ्यांचे नीतीधैर्य खूपच वाढले. शिवाजीमहाराजांच्या एका सैन्याने सातारा आणि सांगली हे जिल्हे पादाक्रांत करून पन्हाळगड गाठले. दुसरे सैन्य कोकणात उतरले आणि कोकणाच्या दक्षिण टोकापर्यंत पसरले.[1] लहानसे पण सलग असे एक मराठी राज्य अस्तित्वात येऊ लागले होते.

---

1. पोर्तुगीजांनी शिवाजी महाराजांना विरोध केला, यासंबंधी पिसुर्लेकर आपल्या *'पोर्तुगीज-मराठे संबंध'*— ह्या ग्रंथातील पृ. 47 वर लिहितात, "सन 1659च्या जुलै महिन्यात शिवाजी महाराजांनी जंजिऱ्याच्या शिद्यांच्या विरुद्ध घोडदळ आणि पायदळ, असे सैन्य पाठविले होते. त्यावेळी चौल आणि वसई येथील पोर्तुगीज अधिकारी यांनी शिद्यांना साधनसामुग्री, रसद इत्यादीची मदत केली. महाराजांनी तक्रार केल्यावर हीच मदत ते शिद्यांना गुप्तपणे करू लागले." पिसुर्लेकर हेही म्हणतात की शिद्दी आणि शिवाजीमहाराज यांच्या दीर्घ संघर्षात शिद्यांना पोर्तुगीजांची मदत मिळत गेली.

# 3

# शिवाजीमहाराज आणि शायिस्तेखान

**शिवाजीमहाराजांनी** पन्हाळगडचा बळकट किल्ला सन 1669 **च्या** 28 नोव्हेंबर रोजी जिंकून घेतला. हा किल्ला म्हणजे विजापूर राज्याचे अभिमानाचे स्थानच होय.

विजापूरच्या दरबारात वरील घटनांनी भीतीचे वातावरण पसरले. आपल्या मदतीसाठी सैन्य पाठवावे अशी आदिलशहाने मोगलांना विनंती केली. स्वत: आदिलशहाने सैन्य जमविले, आणि रूस्तमे जमान याच्या नेतृत्वाखाली ते रवाना केले. त्याच्या हाताखाली पुढील सरदारांना काम करण्याची आज्ञा देण्यात आली. (1) फाझलखान (अफझलखानाचा मुलगा), (2) मलिक इतिबार, (3) फत्तेखान, (4) अजिजखानाचा मुलगा, (5) सर्जेराव घाटगे शिवाजीच्या सैन्यात पुढील सरदार होते. त्या माणसांना आतापर्यंतच नाव आणि कीर्ती प्राप्त झाली होती. (1) नेताजी पालकर, (2) भिमाजी, (3) हिराजी. स्वत: शिवाजीमहाराज रूस्तमे जमान याजवर चालून गेले. ही लढाई पन्हाळगडाजवळ झाली. विजापूरची सैन्ये पराजित होऊन पळून गेली. शालिवाहन शक 1582, माघ शुद्ध चतुर्दशी (सन 16 जानेवारी1660) या तारखेच्या नोंदी देताना जेधे शकावलीत थोडक्यात पुढीलप्रमाणे म्हटले आहे,[1] "रूस्तमे जमान आणि फाझलखान हे कोल्हापूरनजीक शिवाजीमहाराजांविरुद्ध लढले. शिवाजीमहाराजांनी 12 हत्ती आणि 2,000 घोडे धरले. शत्रू पळून गेला."

मराठे कोकणात पसरले. राजापूर येथे मराठ्यांचा इंग्रजांशी पहिला संबंध आला. तेथे रेव्हिंग्टन याने राजापूरच्या सुभेदाराला पळून जाण्यास मदत केली. मराठ्यांनी इंग्रजांच्या अनेक गुमास्त्यांना कैद केले, पण हे प्रकरण लवकरच समाधानकारक रीतीने मिटविण्यात आले. कोकणची मोहीम दक्षिणेत कुडाळपर्यंत पसरली होती; पण त्यामुळे कोकणचा-कायमचा ताबा मराठ्यांकडे आला असे झाले नाही.

---

1 परमानद, *शिवभारत*, अध्याय 24, श्लोक 24

घाटावर मराठ्यांनी आपली आक्रमणे बेळगाव जिल्ह्यातील अथणीपर्यंत नेली. महाराजांनी तर कोल्हापूरजवळील मिरजेपर्यंत चाल करून जाऊन तेथील किल्ल्याला वेढा घातला पण किल्ल्यातील शिबंदीने वेढ्याचा निकराने प्रतिकार केला.

## शिद्दी जौहरची चढाई

या सुमारास विजापूरने महाराजांविरूद्ध अणखी एक प्रयत्न केला. शिद्दी जौहर या विजापूरच्या सरदाराला सलाबतखान ही पदवी देण्यात आली. त्याच्या नेतृत्वाखाली एक सुसज्ज असलेले सैन्य देण्यात आले. विजापूरच्या या सैन्यात 16 ते 20 हजार घोडदळ आणि 35 ते 40 हजार पायदळ होते. या सैन्याने पन्हाळगडला वेढा घातला. या सैन्याचे लक्ष दुसरीकडे वेधावे म्हणून महाराजांनी आपले सैन्य विजापूरच्या उपनगरांकडे पाठवले आणि ती लुटली; पण ती योजना यशस्वी झाली नाही. विजापूरच्या सैन्याचा पन्हाळगडला पडलेला वेढा चालू होता, आणि महाराज वेढ्यात अडकून पडले. ही घटना सन 1660च्या मार्च महिन्यातली होय. हा वेढा सहा महिने चालू होता. वेढा उठविण्यासाठी नेताजीने असाच एक इतर भागात हल्ला चढविला. पण त्याचा उद्देश सफल झाला नाही. वेढा चालू राहिला. सन 1659 च्या जुलै महिन्यात औरंगजेबाला आपल्या गादीची शाश्वती मिळाली. त्यानी दक्षिणेच्या सुभेदारीवर शायिस्तेखानाची नेमणूक केली. सन 1659च्या 14 जुलैच्या पत्रात शिवाजीमहाराजांना त्याने आपल्या राज्यारोहणाची बातमी कळवली. पत्रांत औरंगजेबाने महाराजांना लिहिले, ''शायिस्तेखानाच्या आज्ञेप्रमाणे वागा. त्याच्या आज्ञापालनापासून कधीही ढळू नका. तुम्ही दिलेली आश्वासने उत्तम प्रकारे अमलात येतील यासाठी प्रयत्नशील राहा. म्हणजे तुमच्या विनंत्या मान्य करता येतील.''

आलमगीरनामा'नावाचे औरंगजेबाचे सरकारी चरित्र आहे. त्या ग्रंथाचा कच्चा खर्डा स्वत: औरंगजेबाने पाहिला होता. या सुमाराम औरंगजेबाचे हेतू काय होते यासंबंधी या ग्रंथात म्हटले आहे ते असे, ''बळ वाढत गेले तसे शिवाजीला विजापूरची भीती आणि पर्वा ही वाटेनाशी झाली. त्याने कोकण प्रदेशात आक्रमणे करून तो उध्वस्त करण्यास सुरूवात केली. काही वेळा संधी साधून त्याने बादशाही महालावर (परगणे) आक्रमणे केली. ही बातमी कळल्यावर बादशहाने दक्षिणेतील आपला सुभेदार अमीरूल् उमरा (शायिस्तेखान) याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली. ''भक्कम सैन्य घेऊन तुम्ही चाल करून या, त्या दुष्टाचे पारिपत्य करण्यासाठी झटा, त्याचा प्रदेश आणि किल्ले जिंकून घ्या आणि त्या प्रदेशातील सगळी बंडाळी मोडून

टाका.'' वरील आज्ञेप्रमाणे अमीरूल् उमरा याने *जमादिलावलच्या* 5 तारखेस औरंगाबाद सोडले. नांदेडचा फौजदार मुख्तारखान याची औरंगबादेचा प्रशासक म्हणून नेमणूक करण्यात आली. जमादिलावर महिन्याच्या 9 तारखेस (सन 1660, 11 फेब्रुवारी) तो अहमदनगरला पोहोचला. तेथून (25 फेब्रुवारी रोजी) तो दक्षिणेकडे जाण्यास निघाला.

शायस्तिखान हा यापूर्वीच विजापूरशी संपर्क साधून होता. विजापूर दरबारात मोगलांतर्फे मोहम्मद अमन हा वकील होता. त्याला तेथून हलविण्यात आले. त्याच्या जागेवर शायिस्तेखानाचा शिद्दी जौहरशीही पत्रव्यवहार होता.[1] शायिस्तेखान अहमदनगरहून दक्षिणेकडे सरकला. त्याच्या पुण्याच्या मार्गावर मराठ्यांनी त्याचा प्रतिकार केला. दौंड, बारामती, सुपे, शिरवळ आणि सासवड या ठिकाणी निकराचे लढे झाले. मोगल तसेच पुढे सरकत होते. शायिस्तेखान हा पुण्याला सन 1660 च्या 9 मे रोजी पोहोचला.

मोगलांनी तडफेने कोकण प्रदेशाचा ताबा घेतला. सन 1661च्या मे महिन्यात कल्याण-भिवंडी ही त्यांच्या ताब्यात आली. सलाबत खान दखनी याची तळकोकणचा फौजदार म्हणून नेमणूक करण्यात आली. प्रदेशाच्याव्यवस्थेत त्याला मदत करण्यासाठी अनेक योग्य अधिकारी देण्यात आले. घाटावर असलेला पुण्याचा प्रदेश ह्यापूर्वीच मोगलांच्या ताब्यात आला होता. शिवाजीमहाराजांच्या बरोबर कोणत्याही प्रकारच्या तहाचा प्रश्नच उद्भवत नव्हता. हा प्रदेश तांब्यात घेऊन आपल्या रास्त अंमलाखाली आणण्याचा मोगलांचा निश्चय होता. पुणे आणि कोकण हे प्रांत मोगलांनी विजापूरकडून जिंकले होते. तेथे ठाण मांडून बसण्याचाच त्यांचा निर्धार होता. शायिस्तेखानाने पुण्यातच आपले वास्तव्य केले. तो त्या प्रदेशाचा बंदोबस्त करू लागला.

मैदानी मुलुख मोगलांनी बळकटपणे आपल्या ताब्यात ठेवला; पण शिवाजीमहाराजांनी तितक्याच मजबुतीने आपले किल्ले राखले. किल्ले हातात असल्याशिवाय मोगलांचा ताबा पूर्ण झाला असे म्हणता येत नव्हते. पुण्याच्या उत्तरेस चाकण आहे. शिवाजीमहाराजांचे ते एक बळकट स्थळ होते. शायिस्तेखानाने चाकणवर स्वारी केली. चाकणचा किल्ला हा काही डोंगरी किल्ला नव्हे. भुइकोट किल्ला म्हणूनसुद्धा तो लहानसरच आहे. पण सारे मोगल सैन्य ह्या किल्ल्याभोवती

---

1. बुखारी, वाय. के., *शायिस्तेखानाची अपरिचित ऐतिहासिक पत्रे,* मध्यप्रदेश इतिहास परिषद पत्रिका, खंड 7, 1939.

गोळा झाले. या वेढ्यात प्रत्यक्ष शायिस्तेखान हजर होता.

असे असूनही मराठ्यांनी अडीच महिन्यांच्या वर किल्ला लढविला. ह्याचे श्रेय शूर किल्लेदार फिरंगोजी नरसाळा याला आहे. मोगलांच्या पक्षात मोगल अधिकाऱ्यांची प्रभावी रांगच होती. ते वेढ्यात गुंतले होते. नेतृत्व होते स्वत: शायिस्तेखानाकडे. या वेढ्यात मोगलांचे 268 सैनिक मारले गेले आणि 640 जखमी झाले. सुरूंग उडून ईशान्येकडील बुरूज कोसळला तेव्हा कोठे किल्ल्यातील शिबंदीने सन 1660 च्या 15 ऑगस्ट रोजी किल्ला सोडून देण्याचे मान्य केले. मोगलांनी त्यांना मानाची वागणूक दिली आणि त्यांना जाण्याची परवानगी दिली. एका वेढ्यात आपले इतके जबर नुकसान व्हावे, या गोष्टीने त्यांचे अवसान खचले. शिवाजीमहाराजांच्या किल्ल्यावर यापुढे हल्ले करू नयेत असे त्याने ठरविले. हा निर्णय शहाणपणाचा म्हणावा लागेल. तो पुण्यात परत आला.

सन 1660 च्या मार्च महिन्यापासून शिवाजीमहाराज हे पन्हाळगड येथे शिद्दी जौहरच्या वेढ्यात अडकले होते. वेढा कडक होता. परमानंदाने 'शिवभारता'त सुचविले आहे की मोगलांनी चाकणला वेढा घातला त्याचे आदिलशहाला समाधान वाटेल पण त्याने (आदिलशहाने) पन्हाळ्याचा वेढा चालू ठेवला. मोगल आणि विजापूर यांचे आपसात संगनमत होते, आणि त्यांच्या हालचाली सुसूत्र होत्या हे स्पष्ट आहे. आपण पन्हाळगड सोडावा आणि राजगडला परतावे असे शिवाजीमहाराजांनी ठरविले.

मोगल आणि विजापूर ह्या दोघांशी एकाच वेळी लढा देणे त्यांना शक्य नव्हते. त्यात शिवाजीमहाराजांनी मोगलांना काय सुचविले होते याबद्दल पुढीलप्रमाणे म्हटले आहे:[1]

''त्यावेळी त्याने (महाराजांनी) पन्हाळ्याचा किल्ला जिंकून घेतला होता. शिवाजी आणि आदिलखान (विजापूर) यांनी (आपापल्या परीने) मोगल दरबारशी तहाची बोलणी सुरू केली होती. राजकारणाच्या दृष्टीने शिवाजीला जर पुढे आणता आले असते तर आदिलखानावरची (विजापूर) ही मोहीम आटोक्यात आणता आली असती.''

मोगलांनी नकार दिला हे पाहून शिवाजीमहाराजांनी आदिलशहाची समजूत घातली. सन 1660 च्या सप्टेंबर महिन्यात त्यांनी पन्हाळगडचा किल्ला विजापूरला

---

1. सरकार, जगदीश नारायण, *सतराव्या शतकातील भारतीय सेनापतीची लष्करी पत्रे,* पृ. 76, सायंटिफिक बुक एजन्सी, कलकता, 1969.

परत केला. शिवाजीमहाराजांचा डोळा होता तो आदिलशहाच्या ताब्यात असलेल्या मध्य आणि दक्षिण कोकणावर. मोगलांचे दडपण सारखे वाढत होते. शिवाजीमहाराजांना युद्ध ठेवण्यासाठी हवे होते मुलुख आणि पैसे.

मोगलांशी झालेल्या सन 1657 च्या ऑगस्टच्या तहाने परांड्याचा किल्ला मोगलांना देण्यास विजापूरने मान्यता दिली होती. उत्तरेकडील राजकारणांत औरंगजेब गुंतल्यामुळे हा किल्ला देण्याचे काम विजापूरने लांबणीवर टाकले होते. शायिस्तेखानाने परांडा किल्ल्याच्या विजापुरी किल्लेदाराचे मन वळविले आणि अशा रीतीने त्याने सन 1667 च्या 20 नोव्हेंबर रोजी परांड्याचा किल्ला आपल्या ताब्यात घेतला. मोगलांनी हा किल्ला घ्यावा ही गोष्ट आदिलशहाला काही आवडली नाही.

## कोकणातील मोहीम

घाटावरील मैदानी मुलुख मोगलाच्या ताब्यात होता. शिवाजीमहाराजांच्या ताब्यात घाटाखाली (आणि वर) किल्ले होते. मोगलांच्या ताब्यात कोकणातील कल्याण-भिवंडी प्रदेशाचा काही भाग होता. या प्रदेशाच्या दक्षिणेला असलेला किल्ला रायगड हा महाराजांच्या ताब्यात होता. मोगलांनी महाराजांना त्याच्याही दक्षिणेकडे रेटण्याचा प्रयत्न केला. अशाच एका मोहिमेचे नेतृत्व शायिस्तेखानाचा अधिकारी कारतलबखान याच्याकडे होते. सन 1660 च्या अखेरीस कारतलबखान हा बरेच सैन्य घेऊन लोणावळ्याजवळील घाटावरून कोकणात उतरला. शिवाजीमहाराजांनी या सैन्याला घनदाट अरण्यात येऊ दिले. हे अरण्य 9 कि.मी. लांब होते. ह्या भागात उंबर नावाचे खेडे होते, म्हणून ह्या घाटाला उंबरखिंड म्हणतात.

कवींद्र परमानंद याने उंबरखिंडीच्या लढाईचे प्रत्ययकारी वर्णन केले. महाराजांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांनी अचानक हल्ला केला. लढा निकराचा झाला. कारतलबखान याला पुढेही जाता येईना व मागेही सरकता येईना. त्याने महाराजांपाशी दयेची याचना केली. शिवाजी महाराजांनी करतलबखानाच्या सैन्याचा सारा सरंजाम आपल्या ताब्यात घेतला आणि मगच त्याला परत जाऊ दिले.

मोगलांच्या दृष्टीने ही मोहीम यशस्वी झाली. जेधे शकावलीतील नोंदीप्रमाणे ही लढाई सन 1661 फेब्रुवारीच्या सुरूवातीस झालेली दिसते. फारशी बखरी या लढाईचा उल्लेख करीत नाहीत. मोगलांच्या एकंदर मोहिमांतून ती लढाई म्हणजे एक क्षुल्लक बाब होय असे त्यांना वाटले असावे.

महाराजांनी आपल्या सैन्याचे दोन भाग केले. एका सैन्याचे नेतृत्व नेताजी पालकर याजकडे होते आणि या सैन्याकडे मोगलांशी लढा देण्याचे काम देण्यात आले होते. दुसरे सैन्य महाराजांच्या स्वत:च्या नेतृत्वाखाली दक्षिणेकडे आदिलशाही कोकणच्या इलाख्यात चाल करून गेले.

महाराजांची दौड ही नेत्रदीपक होती. दाभोळ, पाली, संगमेश्वर, चिपळूण, राजापूर, आणि इतर महत्वाची ठिकाणे महाराजांच्या हाती पडली. तेथून मुबलक संपत्तीचाही लाभ झाला. मोगलांशी लढा चालू ठेवण्यासाठी या संपत्तीची अतिशय आवश्यकता होती. पाली आणि शृंगारपूर येथील लहान राज्ये नष्ट करण्यात आली. आणि तो प्रदेश महाराजांच्या राज्यास जोडण्यात आला. शृंगारपूर हाती आले ते सन 1661 च्या 19 एप्रिल रोजी. शिवाजीमहाराजांनी सन 1661 च्या उन्हाळा कोकणातील वर्धनगड येथे काढला.

राजापूर येथे इंग्रजांच्या हस्तक्षेप करण्याच्या वृत्तीकडे महाराजांची वक्रदृष्टी वळली. इंग्रजांचा मूर्खपणा हा की पन्हाळगड वेढ्यात त्यांनी शिद्दी जौहरला दारूगोळा पुरवला होता. यासाठी हेन्री रेव्हिंग्टन, रिचर्ड टेलर, रँडॉल्फ टेलर आणि फिलीप जिफोर्ड याना अटक करण्यात आली. त्यांना कैद करण्यात येऊन प्रथम वासोटा (जिल्हा सातारा) आणि नंतर सोनगड (कुलाबा—रायगड जिल्हा) या किल्ल्यातून ठेवण्यात आले. सन 1663 च्या फेब्रुवारीत त्यांची सुटका करण्यात आली.

शायिस्तेखान दक्षिणेत आल्यावर लौकरच घाटावरील कोकणच्या प्रांतात आक्रमण करण्यासाठी मोगल सैन्ये पाठविण्यात आली होती. मैदानी मुलुख मोगलांच्या ताब्यात आला खरा, पण कल्याण-भिवंडी लढा चालू राहिला. ही गावे मोगलांच्या ताब्यात आली ती सन 1661च्या मे मध्ये. मराठ्यांच्या ताब्यात माहुली आणि कर्नाला असे किल्ले होते. त्यांना मोगल हात लावू शकले नाहीत. मोगल दक्षिणेकडे सरकण्याचा प्रयत्न करू लागले. त्यांनी देवरीला (कुलाबा-रायगड जिल्हा) वेढा घातला. ही घटना सन 1661च्या ऑगस्ट महिन्यातील होय. पण निक़राचा लढा झाल्यावर मोगलांना माघार घ्यावी लागली.

शिवाजी महाराजांनी आदिलशाही कोकणचा बराच मोठा भाग प्रत्यक्षात आपल्या ताब्यात आणला. ही बाब आदिलशहाला दुर्लक्ष करण्यासारखी नव्हती. पण आपल्या सीमेवर मोगल आपल्या इतक्या जवळ येऊन ठेपले आहेत या घटनेने आदिलशहा सचिंत होऊ लागला. महाराजांनी कोकण ताब्यात घेतलाच होता. प्राप्त परिस्थितीशी जुळवून घेणे आणि तेही शक्य तितका गोडवा राखून, त्याला भागच

होते. महाराजांचा सुभेदार पिलाजी नीळकंठ याचे सन 1661च्या 3 ऑगस्टचे पत्र उपलब्ध आहे. त्या पत्रात कोकणावरील शिवाजीमहाराजांच्या हक्कांना मान्यता दिल्याचा उल्लेख आहे. राजापुराहून इंग्रजांनी सन 1662 च्या फेब्रुवारीत सुरतेला पत्रे लिहिली आहेत. त्यात ते म्हणतात, "एक गोष्ट निश्चित आहे, की बादशहाने आपल्या ताब्यातील राजापूर वगैरे स्थळे शिवाजीस दिली आहेत. त्याचे फर्मान" (आज्ञापत्र) बादशहाने दिले आहे. कारण त्या भागाचा तो अद्याप बादशहा आहे आणि शिवाजी त्याचा प्रजाजन आहे."

सन 1662 मध्ये मोगलांच्या प्रत्यक्ष अंमलाखाली मैदानी मुलूख होता तर महाराज हे किल्ले बंदोबस्ताने राखून होते. शायिस्तेखानाचे मुख्य ठाणे म्हणजे पुणे. आणि पुण्याहून जवळच असलेले पुरंदर, सिंहगड, तोरण, आणि लोहगड हे जबरदस्त किल्ले महाराजांच्या ताब्यात होते. याप्रमाणे मैदानात मोगल आणि किल्ल्यावर शिवाजी, यात बदल होण्याची चिन्हे दिसेनात. जितके झटावयास हवे तितके शायिस्तेखानाकडून होत नव्हते हे उघड आहे. यामुळे बादशहाही (औरंगजेब) असंतुष्ट झाला. सन 1661 मध्ये शायिस्तेखानाला मदत करण्यासाठी म्हणून महाराज जसवंतसिंग (जोधपूरचा राजा) हा दक्षिणेत आला; पण परिस्थितीत काही बदल झाला नाही.

मराठ्यांच्या किल्ल्याला मोगल हात लावेनात. उलट ते निष्फळ आणि निरर्थक छापे घालीत. मन 1662 च्या 26 जानेवारीच्या अखबारमध्ये अशा प्रकारच्या हल्ल्याचे एक नमुनेदार उदाहरण आले आहे, ते असे:

"बातमी आली की पुण्यापासून 40 मैलावर लोहगड आणि इतर किल्ल्याच्या पायथ्याशी हलकट शत्रूंची खेडी वसली आहेत. सुभेदारांनी (शायिस्तेखान) 11 तारखेस गुरूवारी नामदारखान आणि इतर मनसबदार यांना या खेड्यांच्या दिशेने पाठविले. नामदारखान हा त्याच दिवशी त्या खेड्यात पोहोचला. रस्त्याच्या कडेस वसलेल्या 70-80 खेड्यांना त्याने आगी लावल्या. धान्याचे साठे आणि इतर सामग्री त्याने नष्ट केली. त्यानंतर तो तिकोणा किल्ल्याच्या पायथ्याशी थांबला. खेड्यातील माणसे आपली गुरेढोरे आणि सामान घेऊन डोंगरावर गेली होती. नामदारखान हा दुसऱ्या दिवशीही तेथे थांबला. त्याने आपल्या सोबत्यांना खेडूतांचा पाठलाग करण्यासाठी पाठविले. ते डोंगरावर गेले आणि त्यांनी 1,000 गुरेढोरे आणि 300 स्त्री-पुरूष धरले. तिसऱ्या दिवशी नामदारखान तेथून निघाला. त्याने तिकोणा, लोहगड, इसापूर, आणि तुंग या किल्ल्यांच्या मध्ये असलेल्या खेड्यांना आगी लावल्या. त्यानंतर तो परत फिरला."

महाराजांनी मोगलांच्याबरोबर सतत लढा चालू ठेवला. मोगलांच्या कडून आपल्या जनतेचे रक्षण करण्यासाठी ते किती सावधगिरी बाळगीत होते. हे सन 1662 च्या 23 ऑक्टोबरच्या पुढील पत्रावरून दिसून येईल:

*"रा. सिवाजी राजे-सर्जाराऊ जेधे देशमुख ता रोहिरखोरे तपियात धावणीस येताती म्हणौन जासुदांनी समाचार आणिला आहे. तरी तुम्हास रोखा अहडताच तुम्ही तमाम आपले तपियात गावचा गाव ताकिदी करून माणसे लेकरेबाळे समत (समेत) तमाम रयेती लोकांस घाटाखाले बांका जागा असेल तेथे पाठवणे. जेथे गनिमाचा आदार पहुचेना ऐशा जागियासि ज्यासि पाठविणे. ये कामास हैगै न करणे-रोखा अहडताच सदरहू लिहिलेप्रमाणे अंमल करणे-ऐसियासी तुम्हापासून अंतर पडलियावरी मोगल जे बांद धरून नेतील त्याचे पाप तुमचे माथा बैसेल. ऐसे समजोन गावचा गाव हिंडोनु रातीचा दिवस करून लोकाची माणसे घाटाखाले जागा असेल तेथे पाठविणे. या कामास एक घडीचा दिरंग न करणे. तुम्ही आपले जागा हुषार असणें, गावगनाहि सडेकडील सेतपोत जतन करावया जे असतील त्यासाहि तुम्ही सांगणे की, डोंगरवर असिरा कुबल जागा आसरे ऐस त्यासि सांगणे व गनीम दुरून नजरेस पडताच त्याचे धावणीची वाट चुकवुनु पलोन जाणे. तुम्ही आपले जागा हुषार असणे."*

*इंग्लिश रेकॉर्डस्* या ग्रंथातून शिवाजीमहाराजांची कोकणावर किती पकड बसली होती याची माहिती आपणाला मिळते, "दंडराजपुरी (रायगड जिल्ह्यातील जंजिरा) पासून त्याची सत्ता आहे. दक्षिणेकडील खारेपाटणला त्याने शह दिला आहे. पुढील वर्षी गोव्यापर्यंत सत्ता वाढविण्याचा त्याने निश्चय केला आहे."

आपल्या सरहद्दीवर मोगलांचे एवढे प्रचंड सैन्य असावे या गोष्टीने विजापूरला स्वस्थ वाटत नव्हते. या विषयी आपल्याला बरेच पुरावे आढळतात. सन 1663 च्या 30 मार्च या तारखेखाली *इंग्लिश रेकॉर्डस्* या ग्रंथात एक घटना नोंदली गेली आहे. शिवाजीमहाराजांचा सेनापती नेताजी पालकर याचा पाठलाग मोगलांनी चालविला होता. पाठलाग करीत हे मोगल विजापूरपासून काही कि. मी. अंतरावर आले. या घटनेने आदिलशहा घाबरला, आणि तो बंकापूरकडे चालता झाला (धारवाड जिल्हा). रूस्तम जमाने मोगलांचे मन वळविले; आणि त्यांना परत जाण्यास लावले. याचा परिणाम असा झाला की नेताजी पालकरला सुरक्षित स्थळी निघून जाता आले. नेताजी पालकरच्या हालचलींकडे विजापूरचे बारीक लक्ष असावे. महाराज हे मोगलांशी निर्धाराने लढत होते. त्याबद्दल विजापूरला आतून बरीच सहानुभूती वाटत असावी हे उघड आहे.

आपल्या प्रदेशांतील मराठ्यांचे किल्ले घेण्यात शायिस्तेखान अयशस्वी ठरला; ही त्याची मोठी घोडचूक होय. पैशाच्या बळावर महाराजांचे अनुयायी फोडून आपल्याकडे मिळवता येतील असे त्याला वाटत होते. पण त्याचा अंदाज चुकीचा ठरला. त्याच्या प्रयत्नांना म्हणावे तितके यश आले नाही. एकंदरीत पहाता पेशवे मोरोपंतांपासून सामान्य सैनिकापर्यंत मराठे शिवाजीमहाराजांशी निष्ठेने चाकरी बजावीत होते. काही माणसे फुटून निघाली. पण अशी माणसे फारच थोडी होती.

प्रशासक म्हणून लागणारे उत्कृष्ट गुण शायिस्तेखानापाशी होते. तो दयाळू, दानशूर, उदात्त विचाराचा आणि लोकांच्या कल्याणासाठी झटणारा मनुष्य होता. भीमसेन सक्सेना हा एक समकालीन लेखक, त्याचा बाप त्या काळी औरंगाबाद येथील मोगलांच्या तोफखान्यात हिशेबखात्यावर होता. आपल्या *तारीखे दिलकुशा* या आत्मचरित्रात तो म्हणतो:

''शायिस्तेखान हा पुण्यात राहत असे. त्या प्रदेशात शांतता स्थापन व्हावी आणि तो प्रदेश पुन्हा आबाद व्हावा म्हणून त्याने प्रयत्न केले. त्या भागात धान्य आणि इतर वस्तू कमालीच्या स्वस्त होत्या. गव्हाचे प्रमाण तर एका रुपयाला दोन शहाजहानी मण, असे होते. शिपाई काय आणि रयत काय मोठ्या सुखासमाधानाने राहत. शायिस्तेखानाचे अधिकारी जर इतके सत्शील होते तर खुद्द शायिस्तेखानाच्या गुणांची कल्पना केलेली बरी...''

या सुमारास शायिस्तेखानाची मुलगी परीबेगम हिचे लग्न शायिस्तेखानाचा भाचा कामगारखान याच्याशी करावयाचे ठरले. कामगारखान हा जाफरखानाचा (औरंजेबाचा मुख्य प्रधान) मुलगा. हे लग्न पुण्यात मोठ्या थाटात पार पडले. लग्नसमारंभानंतर जाफरखान हा पुण्याहून निघाला. शायिस्तेखान त्याला म्हणाला: 'औरंगाबाद येथे तेथील तोफखान्याचा मुश्‌रफ (हिशेबखात्याचा प्रमुख, भीमसेनचे वडील) याने सैन्य जमवले आहे. तुम्ही त्याची पाहणी करा आणि ते सैन्य पुण्याकडे रवाना करा...' शायिस्तेखान हा पुण्यात होता. तेथे त्याने आपल्यासाठी वाडा बांधला. शिवाजीच्या बुद्धिमत्तेची, चातुर्याची आणि योजनांची शायिस्तेखानाला अजिबात कल्पना नव्हती. तो दुर्लक्ष करीत राहिला. शिवाजीची साधने मर्यादित होती तरीही त्याने मोगलांशी लढा चालू ठेवला होता. मर्यादित साधने असूनही त्याचे हल्ले मात्र धाडसी असत. आपल्या हेरांकरवी शिवाजीने शायिस्तेखानाच्या छावणीचा बाजार आणि तेथील रस्ते आणि गल्लीबोळ यांची इत्थंभूत माहिती मिळवली होती.

शायिस्तेखान आणि त्याचा आघाडीचा सरदार व दुसरा भाचा (कामगारखानाचा भाऊ नामदारखान) यांच्यातील संभाषणाची हकीकत भीमसेनने आपल्या चरित्रात दिली आहे. ती माहिती त्याला अधिकृत सूत्रांकडून मिळाली असली पाहिजे; कारण भीमसेन याचा स्वत:चा परिचय पुढे नामदारखान आणि जसवंतसिंग यांच्याशी झाला. भीमसेनने दिलेली हकीकत अशी आहे.

औरंगजेबाचा मंत्री जाफरखान याचा मुलगा नामदारखान हा शायिस्तेखानाचा आघाडीचा सरदार होता. तो शायिस्तेखानाला म्हणाला, 'आमचे सैन्य मेटाकुटीला यावे इतके काही मोठे सैन्य शिवाजीपाशी नाही; हे निश्चित आहे. माझ्या हाताखाली मुबलक सैन्य द्या, मी शिवाजीचा पाडाव करून आणतो.'

यावर शायिस्तेखान म्हणाला, 'शिवाजीविरुद्ध चालवलेली मोहीम मी जर का संपवली तर बादशहासमोर (औरंगजेब) फक्त कंधारची मोहीम शिल्लक राहते. त्या मोहिमेवर तू जाण्यास तयार असशील तर शिवाजीवरची ही मोहीम संपविण्यास माझी काही हरकत नाही. पण कंधारच्या विरूद्ध मोहीम काढण्याचा बादशहाचा बेत नसला तर त्याचा एकच परिणाम होईल, आणि तो म्हणजे सैन्य बरखास्त (कमी) करावे लागेल. जी जबाबदारी आम्ही का म्हणून पत्करावी? आपल्या लोकांचे कल्याण व्हावे असा आमचा उद्देश नाही काय? यासाठी शिवाजीविरूद्ध चाललेली मोहीम लांबवावी आणि बढतीची आशा बाळगून राहावे हेच बरे. आपले सगळे प्रयत्न याच दिशेने झाले पाहिजेत.'

वरील संभाषणावर काही भाष्य करणे निरर्थक होय.

शिवाजीमहाराजांची परिस्थितीही काही विशेष समाधानकारक नव्हती. त्यांच्यासमोर दोन पर्याय होते. एक म्हणजे पुणे प्रांतातून मोगलांना हाकलून लावणे किंवा त्यांच्याबरोबर तडजोड करून त्या प्रांतातील किल्ले सोडून देणे आणि दक्षिण कोकणात आपला तळ उभा करणे, पण लढा दिल्याशिवाय महाराज हा दुसरा पर्याय स्वीकारतील हे शक्यच नव्हते. शिवाजीमहाराजांच्या अनुयायांत फितुरी आणि त्यांना महाराजांच्या चाकरीतून फोडून आपल्याकडे वळवणे या गोष्टींना मोगल सारखी चिथावणी देत होते. सिंहगडावर असलेल्या मराठा शिबंदीची एक तुकडी मोगलांच्या प्रभावाखाली आलेली होती. याचा पुरावा (महाराजांना) मिळाला. याचा परिणाम असा झाला की नामदारखान हा कोकणात आक्रमण करून येऊ लागला तेव्हा त्याच्या प्रतिकारार्थ महाराज कोकणात जाणार होते तो बेत त्यांना लांबणीवर टाकावा लागला.

## धाडसी हल्ला

यावेळी गरज होती मोगलांना गोंधळात पाडणाऱ्या एखाद्या अद्‌भुत कृत्याची. सन 1663 च्या 5 एप्रिलच्या रात्री शिवाजीमहाराजांनी शायिस्तेखानाच्या छावणीवर धाडसी हल्ला चढवला. तो यशस्वी झाला. शायिस्तेखानाच्या जिवावर बेतले होते पण त्याची बोटं कापली गेली, त्यावरच ते निभावले. त्याचा मुलगा अबुल्फतह हा मारला गेला. या हल्ल्यातील मृत आणि जखमी यांची संख्या पन्नासवर गेली. शिवाजीमहाराजांच्या अनुयायांची फार थोडी हानी झाली. महाराजांनी शायिस्तेखानाची छावणी सोडली आणि ते सुखरूपपणे परत आले.

या धाडसी हल्ल्याचा सबंध देशावर जबरदस्त प्रभाव पडला. *आलमगीर* या फारशी सरकारी बखरीत महाराजांच्या या रात्रीच्या छाप्याचा आणि शायिस्तेखानाने सावधगिरी बाळगण्यात कुचराई केली याबद्दल बादशहाला (औरंगजेब) झालेल्या रोषाचा उल्लेख आहे. भीमसेन सक्सेना याचा काका शामदास हा शायिस्तेखानाच्या बक्षीचा कारकून. तो हल्ल्याच्या दिवशी शायिस्तेखानाच्या छावणीत हजर होता. भीमसेनचा बाप हा औरंगाबादेत अधिकारी होता. दुसरा इतिहासकार खाफीखान हा म्हणतो, ''माझ्या वडिलांनी सांगितलेली हकीकत मी देत आहे.'' खाफीखानचा बाप त्यावेळी पुण्यात हजर होता की नाही याबद्दल संशय आहे. पण खाफीखानाने दिलेली हकीकत भीमसेनच्या हकीकतीशी बऱ्याच अंशी जुळते. मराठी साधनात जेधे शकावली आणि सभासदाची बखर ही आपले लक्ष वेधून घेतात. बाकीची साधने अतिशयोक्तीने भरलेली आहेत. युरोपियन लोकांच्या नोंदी ऐकीव माहितीवर आधारलेल्या आहेत.

आपल्या आत्मचरित्रात भीमसेन म्हणतो, ''एके दिवशी (5 एप्रिल 1663), शिवाजीने पायी 40 मैलांची मजल मारली. त्याच्या बरोबर 200 कसलेले सैनिक होते. तो छावणीजवळ रात्रीच्या वेळी आला. तो जसवंतसिंगच्या छावणीच्या बाजारातून गेला; आणि शायिस्तेखानाचा-मुदपाकखाना होता तेथे आला. खानच्या अंत:पुरातील इमारतीची भिंत त्याने फोडली. त्याचे दोन किंवा तीन सोबती इमारतीत घुसले. पाठोपाठ शिवाजी आत शिरला. त्याच्या मागोमाग दहाजण आत गेले. दासींने शायिस्तेखानाला कळविले की काही माणसे भिंत फोडून इमारतीत घुसली आहेत. शायिस्तेखान हा आपल्या शय्यागृहातून निघून वऱ्हांड्यात आला. ती रात्र अंधारी होती. आत कोण घुसले हे सांगता येणे शक्य नव्हते. आत घुसलेल्यांनी शायिस्तेखानावर हल्ला केला. त्याला दोन जखमा झाल्या. जवळच्या दिवाणखान्यात दिवे जळत होते. तेथे शायिस्तेखानाचा मुलगा अबुल्फतह हा

झोपला होता. त्यालाच शायिस्तेखान समजून हल्लेखोरांची टोळी त्याच्यावर तुटून पडली, आणि तिने त्या तरूण माणसाला ठार केले. त्या टोळीने अबुल्‌फतहचे डोके कापले आणि तिने ते डोके आपल्याबरोबर नेले.

"या सुमारास गोंधळलेल्या मन:स्थितीत शायिस्तेखान हा दिवाणखान्याच्या अंगणात आला. त्याने इमारतीच्या आत काही सैनिकांना पाठवले, थोडीशी मारामारी झाली. शिवाजी सुरक्षितपणे निघून गेला."

भीमसेन पुढे म्हणतो, "आजपर्यंत कोणीही राजा कोणत्याही सेनापतीविरूद्ध अशा प्रकारे लढला नव्हता, असे धाडस दाखविले नव्हते." महाराजांच्या ह्या धाडसाचा भीमसेनने अभावितपणे का होईना एका परीने गौरवच केला. देशातील सर्वसामान्य मत असेच असले पाहिजे हे निश्चित म्हणता येईल.

यानंतर पुढे काही काळपर्यंत भीमसेन हा महाराज जसवंतसिंग ह्याच्या चाकरीत होता. वरील प्रकरणी जसवंतसिंग ह्याच्या भूमिकेबद्दल लिहिताना भीमसेनने सावधगिरी बाळगली आहे ती का हेही समजण्यासारखे आहे. तो काय म्हणतो हे उल्लेखनीय आहे. त्याचे म्हणणे असे:

"लोकांचे मत असे की, शिवाजीने हे जे धाडस केले ते जसवंतसिंगच्या चिथावणीनेच (*तरगींब*) केले असले पाहिजे. लोकांचे असे मत होण्यास कारणे होती ती अशी, शायिस्तेखान हा शहाजहानच्या दरबारात होता. त्यावेळपासून तो दरबारातील घडामोडींच्या खबरा औरंगजेबाकडे पाठवित होता. ज्या परिस्थितीमुळे औरंगजेबाला राज्य मिळाले ती परिस्थिती शायिस्तेखानानेच घडून आणली होती. या उलट जसवंतसिंग हा स्वत:ला शहाजहानचा हितचिंतक समजत असे. या कारणे आणि स्वत:च्या स्वभावामुळे त्याने शायिस्तेखानाची दुर्दशा घडवून आणली."

भीमसेन हा विवेकबुद्धी दाखवून म्हणतो, "खरे काय ते परमेश्वर जाणे."

जसवंतसिंग आणि शिवाजीमहाराज यांचे संबंध पाहता त्यांचे आपसात संगनमत होते किंवा एकाने दुसऱ्याला चिथावणी दिली, या दोन्ही गोष्टी विचारात देखील घेता येणे शक्य नाही; पण छावणीच्या सुरक्षिततेसंबंधी जसवंतसिंगाने अगदी अक्षम्य असे दुर्लक्ष केले याबद्दल त्याला दोषी ठरवता येण्यासारखे आहे.

शायिस्तेखान हा औरंगाबादेस परतला. पण जसवंतसिंगाच्या नेतृत्वाखाली मोगलांचे सैन्य पुण्यातच राहिले. शिवाजी महाराजांनी दणदणीत विजय मिळविला होता. सन 1663 च्या एप्रिलच्या मध्यात ते दक्षिण कोकणावर चाल करुन गेले. मेच्या सुरूवातीस त्यांनी कुडाळ जिंकून घेतले होते. डच साधनांवरून या मोहिमेत

त्यांच्यापाशी चार हजाराचे घोडदळ आणि दहा हजाराचे पायदळ असे सैन्य होते असे दिसते. विजापूरचे अधिकारी दक्षिण कोकणात फोंडा येथे होते. शिवाजीमहाराजांनी कुडाळ तर घेतले होतेच त्याशिवाय वाडीच्या सावंतांच्या ताब्यातील भोवतालचा मुलुखही घेतला होता. दोन्ही प्रदेशांतून महाराजांना काढून लावण्यासाठी विजापूरच्या अधिकाऱ्यांनी स्थानिक सरदारांची मदत घेतली. पण त्यांच्या प्रयत्नांना यश आले नाही. जूनच्या शेवटी महाराज हे आपली राजधानी राजगड येथे परत आले.

शिवाजीमहाराजांचा मोगलांशी हा शौर्याचा लढा चालू होता. हे पाहून त्यांच्या शेजारील राज्यावर प्रभाव पडू लागला. पोर्तुगीजांना वाटू लागले की शिवाजीमहाराजांशी चांगले संबंध ठेवणे हेच उचित होईल. गोव्याच्या व्हॉइसरॉयने आपल्या उत्तर कोकणातील प्रशासकाला (गव्हर्नर) सन 1663 च्या 5 मे रोजी जे पत्र पाठविले ते सूचक आहे. पत्रात म्हटले आहे:

''काही दिवसांपूर्वी मला राजे शिवाजी यांचे पत्र आले. त्यात त्यांनी पुढील प्रमाणे म्हटले आहे, तुमच्या राज्यांशी आणि तुमच्या राज्याच्या उत्तर भागांतील किल्ल्यांशी माझे संबंध चांगले राहतील असे मी आश्वासन देतो. मात्र तुम्ही आपल्या अधिकाऱ्यांना सूचना दिली पाहिजे. मोगल साम्राज्याच्या लोकांना त्यांनी कोणत्याही प्रकारची रसद अगर सामुग्री पुरविता कामा नये.

वरील कारणांमुळे मला असे वाटले की तुम्हाला पुढील प्रमाणे आज्ञा करावी, आपल्याशी संबंध ठेवण्याचे आश्वासन जसे शिवाजीने दिले आहे तसेच संबंध आपण शिवाजी आणि त्यांचे लोक यांच्याशी ठेवले पाहिजेत. मोगलांच्या छावणीकडे कोणत्याही प्रकारची रसद जाण्याचे धूर्तपणे आणि या ना त्या सबबीवर थांबवावे हे आवश्यक आहे. म्हणजे रसदेवाचून मोगल या परिसरांतून निघून जातील. आणि शत्रूला हानी पोहोचविण्याचा शिवाजीचा जो हेतू आहे तो पूर्ण करण्याची त्याला संधी मिळेल. मोगल हे बलिष्ठ आहेत. ते अगदी जवळचे शेजारी म्हणून नकोत. ते जितके लांब राहतील तितके बरे.''

## मोगलांची सिंहगडावर स्वारी

सन 1663 च्या नोव्हेंबरमध्ये जसवंतसिंगाच्या नेतृत्वाखाली मोगलांनी सिंहगडावर हल्ला चढविला. ह्यात त्यांची फजिती होऊन त्यांना माघार घ्यावी लागली. भीमसेन म्हणतो, ''जसवंतसिंगाने कोंडाण्याच्या किल्ल्याचा वेढा घातला. मोगलांनी किल्ल्याच्या तटावर सरळ हल्ला करण्याचा प्रयत्न केला. या हल्ल्यात

अनेक मोगल आणि रजपूत ठार झाले. दारूच्या स्फोटांमुळे अनेक माणसे जाया झाली. किल्ला जिंकून घेणे अशक्य आहे असे दिसले. यशाबद्दल निराश होऊन महाराजा जसवंतसिंग आणि रावभाऊसिंग हाडा यांनी सन 1664 च्या 28 मे रोजी कोंडाणा किल्ल्याचा वेढा उठविला आणि ते औरंगाबादेस परतले.''

*आलमगीर नामा* ह्या ग्रंथाने दु:खित अंत:करणाने पुढीलप्रमाणे नोंद केली आहे; ''एकही किल्ला जिंकून घेता आला नाही. शिवाजीच्या विरूद्ध चाललेल्या मोहिमेत अनेक अडचणी उद्‌भविल्या, ती मोहीम कशीबशी चालत होती.''[1]

शिवाजीमहाराजांनी मोगल अधिकाऱ्यांना या सुमारास जे पत्र लिहिले ते अतिशय गाजले आहे. या पत्रावरून महाराजांची शक्ती, दृढनिश्चय आणि उत्साह हे उत्कृष्ट रीतीने व्यक्त होतात. आपल्या पत्रात महाराज म्हणतात,:[2]

''दूरदर्शी लोकांना हे माहीत आहे की गेल्या तीन वर्षापासून बादशाहाकडून या भागात प्रसिद्ध सेनापती आणि अनुभवी अधिकारी येत आहेत. बादशाहानी त्यांना माझे किल्ले आणि प्रदेश जिंकून घेण्याची आज्ञा केली होती. बादशहाला पाठवीत असलेल्या आपल्या वृत्तांतात ते (सेनापती आणि अधिकारी) लिहीत जातात की 'आपण किल्ले आणि प्रदेश लवकरच जिंकून घेऊ. कल्पनाशक्तीचा वारूही माझ्या या प्रदेशात फिरकू शकणार नाही. (तर खऱ्या घोड्यासंबंधी बोलणेच नको.) हा प्रदेश जिंकून घेणे अत्यंत अवघड आहे. त्यांना (सेनापती आणि अधिकारी यांना) हे माहीत नाही. बादशहाकडे खोटे वृत्तांत सादर करण्यात त्यांना शरम वाटत नाही. माझ्या देशात कल्याणी आणि बिदर यासारखी स्थळे नाहीत. ती स्थळे मैदानात आहेत. आणि हल्ले करून ती घेता येतात. माझा देश पर्वतांच्या रांगांनी भरला आहे. या प्रदेशात साठ किल्ले आहेत. त्यापैकी काही समुद्रकिनाऱ्यावर आहेत. अफझलखान हा प्रबळ सैन्य घेऊन आला, पण येथे तो अगतिक बनला. आणि त्याचा नाश झाला.

''अफझलखानाचा मृत्यू झाला, त्यानंतर अमीरूल् उमरा शायिस्तेखान हा उंच डोंगरांनी आणि खोल दऱ्यांनी व्याप्त असलेल्या माझ्या प्रदेशात चालून आला. तीन वर्षापर्यंत त्याने प्रयत्यांची शिकस्त केली. आपण माझा (शिवाजी) प्रदेश थोड्याच काळात जिंकू असे त्याने बादशहाला कळविले. अशा खोट्या वृत्तीचा जो परिणाम व्हावयाचा तोच झाला. त्याला फजिती पत्करावी लागली आणि निघून जावे लागले.

---

1. काजिम्, मिर्जा मुहम्मद, *आलमगीरनामा.*
2. *खुतूते शिवाजी,* मुंबईच्या सरकारी दफ्तरखान्यांत याची हस्तलिखीत प्रत आहे.

माझ्या देशाचे रक्षण करणे हे माझे कर्तव्य आहे. आपली प्रतिष्ठा कायम राखण्यासाठी तुम्ही बादशहाकडे खोटे वृत्तांत पाठवित असता. पण माझ्यावर परमेश्वराची कृपा आहे. या देशावर आक्रमण करणाऱ्याला, मग तो कोणी का असेना, कधीच यश आले नाही.''

## सुरतेवरील हल्ला आणि लूट

दक्षिणेच्या सुभेदारीवर शायिस्तेखानाच्या जागी बादशहाचा (औरंगजेब) मुलगा राजपुत्र मुअज्जम याची नेमणूक करण्यात आली. अधिकाऱ्यांची ही अदलाबदली होत असता शिवाजीमहाराजांनी लागोपाठ आणखी एक प्रचंड यश मिळविले. हाही हल्ला धाडसीच होता. तो म्हणजे सुरतच्या गजबजलेल्या आणि समृद्ध बंदरावरील हल्ला आणि लूट ही होय.

सुरतेकडे जाण्यासाठी शिवाजीमहाराज नारदुर्ग, माहुली, कोहज (कोकण) आणि आपल्या शेजारच्या जमिनदारांच्या मुलखातून आणि रामनगरच्या इलाख्यातून पार झाले. कल्याण भिवंडी येथील मोगल अधिकारी हे अतिशय गाफील राहिले. हा गाफीलपणा झाकण्यासाठी कल्याणचा अधिकारी लोदीखान याने पोर्तुगीजांच्या इलाख्यावर हल्ला केला. पोर्तुगीजांनी पुढील शब्दात आपला कडक निषेध नोंदविला:

''त्याने (लोदीखान) शिवाजीला सुरतेकडे जाऊ दिले यात त्याच्या प्रयत्नांत कसूर झाली की त्याने योग्य काळजी घेतली नाही (हे सांगता येत नाही.) आता त्याने जे काही केले ते जगापासून लपविण्यासाठी तो आमच्यावर आक्रमण करीत आहे. जणू काय असे केल्याने त्याची कृत्ये जगापासून राहतील असे त्याला वाटते. ज्या घटना घडल्या त्यांत पोर्तुगीजांचा काय दोष असू शकतो?''

सुरत हे तापी नदीवर वसले असून समुद्रापासून काही किलोमीटर अंतरावर आहे. सुरतेस एक चांगला भुईकोट किल्ला आहे. पण शहरात रक्षण असे काही नव्हते. शिवाजी महाराजांचे सैन्य जवळ येत असलेले पाहून सुरतेचा प्रशासक (गव्हर्नर) हा किल्ल्यात पळाला. शहर मराठ्यांच्या हाती पडले. ब्रिटिश आणि डच यांनी आपल्या स्वतःच्या वखारींचे रक्षण केले.

शिवाजीमहाराजांजवळ सुमारे दहा हजारांचे सैन्य होते. सुरत शहरांतील पण धनाढ्य अशा व्यापाऱ्यांशी त्यांना बोलणी करावयाची होती; पण त्यांना प्रतिसाद मिळाला नाही, त्यामुळे त्यांची सैन्ये शहरात घुसली, आणि त्यांनी शहर लुटले. किल्ल्यात असलेल्या मोगल शिबंदीने किल्ल्यातून गोळ्यांचा वर्षाव केला; पण जो

परिणाम झाला तो एवढाच की त्यामुळे शहरात ठिकठिकाणी आगी लागल्या आणि शेकडो घरे भस्मसात झाली.

सन 1664 च्या 6 पासून 9 जानेवारीपर्यंत शिवाजीमहाराज हे स्वस्थपणे सुरत लुटीत होते. रोकड आणि मालमत्ता ह्या दोन्ही रुपाने त्यांनी सुरतेहून जी लूट नेली ती जवळजवळ एक कोटी रूपयांची असली पाहिजे.

शहरातील लूट हस्तगत करण्यासाठी महाराजांनी अतिशय कडक उपाय योजले. पण फ्रेंच प्रवासी बर्नियर याने पुढील प्रसंग नोंदवून ठेवला आहे. तो म्हणतो:

"साधुतुल्य शिवाजीने कांपूचियन मिशनरी फादर अँब्रोस याच्या घराचे आणि इतर वस्तूंचे मोठ्या आदराने रक्षण केले. त्याने (शिवाजीने) म्हटले, 'फ्रेंच पाद्री ही माणसे चांगली आहेत आणि त्यांना उपसर्ग लागता कामा नये'. डच लोकांचा एक हिंदू दलाल होता. तो वारला होता पण तो अतिशय दानशूर होता असे शिवाजीना सांगण्यात आले. हे ऐकून शिवाजीने त्या दलालाचे घर वाचविले."

महाराजांच्या सुरतेवरील स्वारीनंतर दोन वर्षांनी, म्हणजे सन 1966 च्या 10 जानेवरी रोजी थेवेना हा एक फ्रेंच प्रवासी सुरतेत होता. त्याने ऐकीव माहितीवरुन महाराजांचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे, 'उंची मध्यम, बांधा चपळ, तीक्ष्ण आणि तेजस्वी डोळे.'

एस्कॅलीओट हा इंग्रज म्हणतो, 'ज्यांनी शिवाजीला पाहिले आहे ते मला असे सांगतात की तो मध्यम बांध्याचा आहे. मी उभा राहिलो तर जितका दिसेन त्याहून थोडा कमी. पण त्याचे शरीरसौष्ठव उत्कृष्ट आहे. तो व्यायामपटू आहे. तो जेव्हा बोलतो तेव्हा तो स्मितहास्य करीत आहे असेच वाटते. त्याची दृष्टी तीव्र आणि तीक्ष्ण आहे. आपल्या स्वत:च्या लोकांत तो उठून दिसण्याइतका गोरा आहे.'

शिवाजी महाराजांनी 10 जानेवारी (1664) रोजी सुरत सोडले. त्यानंतर बरोबर सात दिवसांनी मोगल सैन्ये सुरतेला आली; तेव्हा कुठे सुरतेचा गव्हर्नर (प्रशासक) किल्ल्यांतून बाहेर पडला. "तो किल्ल्यातून बाहेर पडला तेव्हा लोकांनी त्याची छी: थू केली आणि त्याच्या अंगावर घाण फेकली."[1]

गव्हर्नरने आपला विश्वासघात केला अशी जनतेची बालंबाल खात्री असावी. महाराज सुरतेहून परतले. या सुमारास आपले वडील दक्षिणेत मृत्यू पावले ही बातमी त्यांना कळली. शहाजीराजांची पिढी पाहाता त्या पिढींत शहाजीराजांची

---

1. *इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी.*

कामगिरी उल्लेखनीयच म्हणावी लागेल. ते एक वीर पुरूष होते. निजामशाही घरण्यातील एखाद्या व्यक्तीला गादीवर बसविण्याची त्यांना धमक होती. त्यांनी मोगलांशी अतिशय निकराचा सामना दिला. शहाजी राजांनी केलेल्या लढ्यांचा महाराजांवर प्रभाव पडला हे नि:संशय. मोगल हे अजिंक्य नाहीत ही खूणगाठ महाराजांनी मनाशी बांधली. पण शिवाजीमहाराजांनी राष्ट्र निर्माण करण्यात आणि स्वतंत्र राज्य स्थापन करण्यात यश मिळविले. या गोष्टी महाराजांच्या स्वत:च्या प्रेंरणेतून आणि प्रयत्नातून झाल्या आहेत. या चळवळीत शहाजीराजांचा काही भाग नव्हता.

महाराजांनी सुरत लुटली ही गोष्ट औरंगजेबाच्या काळजाला भिडली. शिवाजीमहाराजांविरूद्ध नवीन मोहीम उघडावयाची होती. या मोहिमेचे नेतृत्व मात्र अधिक कार्यक्षम, कुशल आणि कसलेल्या सेनापतीकडे द्यावयाचे होते. तो निर्णय घ्यावयाचा होता. या सुमारास शिवाजीमहाराजांविरूद्ध लढा पुकारावा असे औरंगजेबाने विजापूरला सांगितले. विजापूराकडून येणाऱ्या खंडणीमध्ये 30 हजार होनाची (सुमारे 1,2000,0 रूपये) सूट देण्यास आपण तयार आहोत असेही त्याने (औरंगजेब) विजापूरला कळविले. महाराजांनी विजापूरशी तडजोडीचा पवित्रा घेतला. पण विजापूरवरील मोगलांचे दडपण वाढले. विजापूरचा सेनापती अजीजखान हा कोकणात उतरला आणि त्याने कुडाळ घेतले. महाराजांनी सन 1664 च्या ऑक्टोबर महिन्यात विजापूरच्या ताब्यातील वेंगुर्ले या गावावर हल्ला करून ते लुटले.

मराठ्यांनी खवासखानावर हल्ला चढविला. निकराची लढाई होऊन मराठा सैन्याला माघार घ्यावी लागली.

या सुमारास विजापूरचा मराठा सरदार, बाजी घोरपडे हा खवासखानाच्या मदतीस धावला. महाराजांनी बाजी घोरपडेवर हल्ला केला. शहाजीराजे आणि बाजी घोरपडे यांच्यात नेहमी स्पर्धा आणि वितुष्ट असे; पुन्हा सांगण्याची गरज नाही. सन 1648 मध्ये जिंजीजवळ शहाजीराजांना अटक करण्यात आली. त्या कारस्थानांतील एक सूत्रधार म्हणजे मुधोळचे घोरपडे होत. महाराजांच्या हल्ल्यानंतर झालेल्या निकराच्या युद्धात बाजी घोरपडे हा ठार झाला. त्याच्यापाशी खवासखानाच्या सैन्यात वाटप करण्यासाठी म्हणून बरीच रक्कम होती. तो सर्व खजिना महाराजांच्या हातात पडला.

बाजी घोरपडेच्या मृत्यूने खवासखानाचे अवसान गळाले. मराठ्यांचे दडपणही प्रचंड होते. सन 1664 च्या नोव्हेंबर मध्ये खवासखान हा घाईघाईने कोकण सोडून

निघून गेला. शिवाजीमहाराज ताबडतोब कुडाळवर चाल करून गेले आणि त्यानी तो प्रदेश आपल्या ताब्यात आणला. तेथील सरदार (त्यांना देसाई म्हणत.) हे विजापूरला मिळाले होते. ते आश्रयासाठी पोर्तुगीजांच्या प्रदेशात पळून गेले. महाराजांनी पोर्तुगीज हद्दीपर्यंत पाठलाग केला. या सुमारास त्यांनी विजापूरपर्यंत ही आक्रमणे केली. अशा रीतीने महाराजांनी दक्षिण कोकणात आपली सत्ता पुन्हा स्थापन केली. यानंतर मात्र तो भाग मराठ्यांच्या सत्तेखालीच राहिला.

## शिवाजी महाराजाचे आरमार

सन 1664 च्या 5 डिसेंबर रोजी शिवाजी महाराजांनी समुद्रकिनाऱ्यावर मालवण नजिक सिंधुदुर्ग या जलदुर्गाचा पाया घातला. घेरिया (विजयदुर्ग), सुवर्णदुर्ग आणि किनाऱ्यावरील इतर दुर्गांचीही मजबुती करण्यात आली. हे किल्ले बांधण्यात महाराजांचा हेतू म्हणजे महाराजांच्या आरमाराला संरक्षण मिळावे आणि जंजिऱ्याचे शिद्दी, पोर्तुगीज, आणि इतर सत्ता यांच्यावर वचक राहावा हा होता.

महाराजांचे आरमार लहान असले तरी त्यांच्या संरक्षण यंत्रणेतील ते एक मोठे उपयुक्त अंग होते. समकालीन बखरीवरून असे दिसते की या आरमारात लहान मोठी अशी चार-पाचशे जहाजे होती. ती विविध जातीची होती. गुराबा, तारवें, गलबतें, शिबाडें, पगार, अशी ही नाना जातीय जहाजे. महाराजांच्या पायदळ आणि घोडदळाप्रमाणेच आरंमारही त्याच दर्जाचे होतें. ''दर्यासारंग म्हणोन मुसलमान सुभेदार व मायनाईक म्हणोन भंडारी असे दोघे सुभेदार करून, दोनशे जहाजे एक सुभा, असे आरमार सजले.'' दर्यावर्दी आणि लढाऊ माणसे, कोळी आणि सैनिक व दर्यावरील लढवय्ये, अशी माणसे सुभेदारांच्या हाताखाली काम करीत होती.

शिवाजी महाराजांच्या आरमारी हालचालींचे उल्लेख अनेक पोर्तुगीज, डच आणि ब्रिटिश या साधनांतून आढळतात. त्यांचे कायमचे प्रतिस्पर्धी म्हणजे जंजिऱ्याचे शिद्दी, त्यांच्याशी त्यांचे सतत लढे चालू असत.

सन 1664 च्या फेब्रुवारीत शिवाजी महाराजांनी समुद्राच्या मार्गे बसरुर या बंदरावर स्वतः आरमाराचे नेतृत्व पत्करून मोहीम काढली. आरमारात पन्नास गलबते, तीन लहान जहाजे आणि कांही लहान आकाराची गलबते होती. त्यावर एकंदर चार हजार सैनिक होते. शिवाजी महाराज हे मालंड बंदरांतून (रत्नगिरी आता सिंधुदुर्ग) निघाले ते सन 1665 च्या 13 फेब्रुवारी रोजी बसरूर बंदरात पोहोचले. बसरूरचा उच्चार युरोपीयन लोक बारसिलोर असा करीत. हे बंदर समुद्रकिनाऱ्यावर असून ते बिदनूरच्या राज्यात मोडत होते. गाव लुटण्यात आले.

डचांच्या मते लुटीची रक्कम 3 लाख गिल्डर्स अशी होती. हा अंदाज खरा असावा. मराठी बखरीत लुटीची रक्कम दोन कोटी होन म्हणजे आठ कोटी रुपये सांगतात. त्यावर विश्वास ठेवता येत नाही.

परत येताना शिवाजी महाराज हे काही काळ गोकर्ण महाबळेश्वर या मोठ्या महत्वाच्या तीर्थक्षेत्रात आणि कारवार येथे थांबले. सन 1665 च्या मार्चच्या तिसऱ्या आठवड्यात ते घाईघाईने खुष्कीच्या मार्गवरून राजगडला परत आले.

शिवाजी महाराजांविरुद्ध मोहिमेचे नेतृत्व पत्करून त्यांच्यावर चालून आलेला आणि औरंगजेबाचा कसलेला सेनापती मिर्झा राजा जयसिंग हा सन 1664 च्या 3 मार्च रोजी पुण्याला पोहोचला होता.

# 4

# शिवाजीमहाराज आणि जयसिंग

**जयसिंगाने** शिवाजीमहाराजांविरुद्ध जी मोहीम केली तिची संपूर्ण माहिती उपलब्ध आहे. औरंगजेबाचे सरकारी चरित्र *आलमगीरनामा,* जयसिंगाचा औरंगजेबाशी पत्रव्यवहार-*हफ्तअंजुमन,* जयसिंगाचे रजपूत अधिकारी यांचा पत्रव्यवहार-*राजस्थानी पत्रे,* मराठी, इंग्रजी, पोर्तुगीज साधने, ही सर्व पाहाता एकंदरीत मोहिमेचे स्वच्छ चित्र आपल्यासमोर उभे राहाते. निकोलाओ मनुची हा या सुमारास जयसिंगाच्या हाताखाली तोफखान्याचा अधिकारी म्हणून होता. त्याचे 'मोगलांची कथा' हे एक मोठे बहुमूल्य साधन आहे. जयसिंग हा कसलेला सेनापती होता. तो म्हणजे शायिस्तेखान नव्हे. त्याने शिवाजीमहाराजांना तुच्छ लेखिले नाही. त्याची योजना अशी होती, महाराजांविरुद्ध उघडलेली मोहीम ही अल्पकाळात आणि तडकाफडकी पार पाडली पाहिजे. शिवाजीमहाराज आणि त्यांचे शेजारी म्हणजे विजापूरचा आदिलशहा आणि पोर्तुगीज यांचे संबंध तोडले पाहिजेत. कल्याण, लोहगड आणि पुणे अशा मर्मस्थळी जबर लष्करी पथके ठेवण्यात यावीत, म्हणजे शिवाजीमहाराजांना आपल्या स्वतःच्या राज्यातून बाहेर पडता येऊ नये हा त्याचा बेत होता. याबरोबरच महाराजांच्या राज्यात हल्ले करून प्रदेश उध्वस्त करून सर्वांना दे माय धरणी ठाय केले की मोगलांना शरण येण्याशिवाय महाराजांना गत्यंतर रहाणार नाही असा त्याचा अंदाज होता.

जयसिंगाने औरंगजेब बादशहाला पत्र लिहून पुढीलप्रमाणे मागण्या केल्या.

1. मोहिमेच्या संबंधी सर्व सत्ता आपल्या हाती एकवटली पाहिजे.
2. सैन्यावरील प्रशासकीय सत्ता आपल्याकडे असावी. औरंगाबाद येथे राजपुत्र मुअज्जम याचेकडे असता कामा नये.
3. अहमदनगर आणि परांडा सारख्या बादशाही किल्ल्यांवरच्या किल्लेदारावर आपले नियंत्रण राहावे.
4. शिवाजीची माणसे फोडून आणण्यासाठी पैसा लागेल. तो औरंगाबादच्या बादशाही खजिन्यांतून काढण्याची परवानगी असावी.

जयसिंगाच्या सगळ्या मागण्या मान्य करण्यात आल्या. औरंगजेबाने एक सूचना केली होती ती अशी की जयसिंगाने तळकोकणात आपली छावणी घालावी. जयसिंगाला ही सूचना पटणे शक्य नव्हते. लढाई घाटावर अन् छावणी कोकणात ? पण जयसिंगाने औरंगजेबाची ही सूचना मोठ्या खुबीने टाळली. त्याने सांगितले की आपण असे केले तर शिवाजी आणि आदिलशहा, हे दोघे एक होण्याची शक्यता आहे.

जयसिंगाची मोहिमेची कल्पना जितकी विलक्षण तितकीच तिची यशस्वी सांगताही तडफेने झाली. पोर्तुगीजांनी मोगलांना आवर्जून सांगितले की, 'आपण शिवाजीला कधीच मदत केली नाही. उदा. शिवाजीची सुरतेवरील स्वारी, पुढेही मोगलांना आपल्याबद्दल संशय येण्याचे कारण नाही.'

वरील पत्रव्यवहारावरून एक गोष्ट दिसून येते. ती ही की या प्रकरणात पोर्तुगीज हे निश्चितपणे हातचे काही राखून ठेवत होते. उत्तर कोकणच्या गव्हर्नरला पोर्तुगीज पत्रे लिहितात. त्यातील एक उतारा पुढे पहा, ''ते काही असले तरी आपण मदत करीत आहोत असा संशय येण्याचा धोका उद्‌वत नसेल तर अशा परिस्थितीत तुम्ही शिवाजीला दारूगोळा आणि रसद याद्वारे मदत करू शकत असला तर अशी मदत पैशाच्या मोबदल्यात अवश्य करावी. कारण शिवाजीला या मुलुखातून जावे लागावे आणि मोगलांनी येथे सत्ता ग्रहण करावी हे आवडणारे नाही.''

विजापूरचा आदिलशहा हाही मोगलांच्या दडपणासमोर नरम पडला. दक्षिण कोकणात उतरण्याचे त्याने थोडेसे प्रयत्न केले; पण त्यामुळे मोगलांचा संशय काही दूर झाला नाही. स्वतंत्र राज्य म्हणून विजापूरचा संपूर्ण निकाल लावण्याची मोगलांची दीर्घ योजना होती हे स्पष्टच आहे.

शिवाजीमहाराजांना एकटे पाडण्याचे जयसिंगाचे प्रयत्न यशस्वी झाले. जव्हार आणि रामनगरसारख्या लहान राज्यांचे राजे, ज्यांच्या जहागिरी आणि वतने गेल्यामुळे जावळीच्या मोऱ्यासारखे असंतुष्ट जमीनदार आणि चाकरीच्या मागे लागलेले विजापूरचे अधिकारी अशी माणसे जयसिंगाच्या झंड्याभोवती गोळा झाली. याबाबतीत जयसिंगाला मोठे यश मिळाले. विजापूरचा मातब्बर सरदार मुल्ला अहमद हा विजापूर सोडून मोगलांना मिळाला. जंजिऱ्याचे शिद्दी हेही चटकन मोगलांच्या चाकरीत शिरले.

## पुरंदरचा वेढा

पुण्यात आल्यावर जयसिंग हा पुरंदरच्या किल्ल्याकडे निघाला. पुणे प्रांतावर इहतिशामखान याची आणि त्याच्या मृत्यूनंतर कुबादखान याची नेमणूक करण्यात

आली. त्यांच्याबरोबर चार हजार घोडेस्वार देण्यात आले. सन 1665 च्या 14 मार्च रोजी जयसिंगाने पुणे सोडले तो 29 मार्च रोजी पुरंदरच्या बळकट किल्ल्याच्या लगत असलेल्या सासवड गावी पोहोचला. त्याचा दुय्यम सेनापती दिलेरखान हा आघाडीची सैन्ये आणि मजबूत तोफखाना घेऊन यापूर्वीच पुढे गेला होता.

सन 1665 च्या 30 मार्च रोजी पुरंदरचा वेढा सुरू झाला. मराठे हे जोरदार हल्ले करीत होते. तरीपण पुरंदर आणि रूद्रमाळ या दोन किल्ल्यांच्या मध्ये ठाण मांडून राहाण्यात मोगलांना यश मिळाले. मोगलांची फिरती सैन्ये महाराजांच्या राज्यात सतत संचार करीत होती, आणि दिसेल ते उध्वस्त करीत होती. मराठ्यांनी निकराचे लढे दिले. नेताजी पालकरने परांड्याच्या प्रदेशावर आक्रमण केले. ते आकस्मात हल्ले करीत. हे हल्ले रात्री होत. ते रस्ते बंद पाडीत आणि दुर्घट स्थळे ताब्यात घेऊन लढवीत. ते जंगलांतून आगी लावीत. त्यांच्या ह्या हल्ल्यांच्या मुळे इस्लामच्या सैन्याची परिस्थिती मोठी बिकट झाली. सैन्यातील अनेक जनावरे जायबंदी झाली.

मोगलांच्या फिरत्या सैन्यासाठी जयसिंगाने खानदेशचा सुभेदार दाउदखान याची सेनापती म्हणून नेमणूक केली. त्याच्याबरोबर सात हजार स्वारांचे सैन्य देण्यात आले. राजा रायसिंग, शर्जाखान, अमरसिंग चंद्रावत, मुहंम्मद सालेह, ही काही नावे. मराठ्यांचा मुलुख त्यांनी कसा उध्वस्त केला त्याच्या पुढील उदाहरणांवरून त्यांच्या मोहिमांचे स्वरूप कळून येईल. '27 एप्रिल रोजी दाउदखान, राजा रार्जासिंग आणि इतर मोगल अधिकारी हे रोहिडा किल्ल्याच्या परिसरात पोहोचले. त्यांनी पन्नास खेड्यांना आगी लावल्या. डोंगरात असलेली चार खेडी जमीनदोस्त करण्यात आली. तेथील अनेक रहिवाशांना कैद करण्यात आले. गुरेढोरे आणि इतर सामानही ताब्यात घेण्यात आले. 2 मे रोजी कोंडाण्याच्या परिसरातील खेडी उध्वस्त करण्यात आली....कुतुबुद्दिनखान हा कुंवारी किल्ल्याकडे चाल करून गेला होता. त्या भागातील खेडी जाळून टाकली. 5 मे रोजी मोगलांनी लोहगडच्या पायथ्याशी असलेली समृद्ध खेडी जाळली.'

खेडी जाळणे, स्त्रीपुरुष आणि गुरेढोरे ताब्यात घेणे हा मोगलांच्या हल्ल्याचा एक ठराविक साचाच बनून गेला.

जयसिंगाचा पत्रसंग्रह, *हत्फ अंजुमन* यामध्ये पुरंदरच्या वेढ्यांचे तपशीलवार वर्णन आले आहे. किल्ल्यावर मोगलांचे निकराचे हल्ले आणि मराठ्यांचा तितकाच निकराचा प्रतिकारही या पत्र संग्रहावरून उत्कृष्टपणे दिसून येतो. मराठे पुनःपुन्हा किल्ल्यांतून बाहेर पडत आणि मोगलांच्या मोर्च्यांवर तुटून पडत. हातघाईच्या

लढाया तर रोजच होत. अशाच एका लढाईत पुरंदरचा शूर मराठा किल्लेदार मुरारबाजी याने आपले प्राण अर्पण केले. मराठ्यांच्या इतिहासात मुरारबाजी हे नाव अमर झाले आहे.

मोगलांनी 14 एप्रिल रोजी रूद्रमाळ जिंकून घेतला. त्यामुळे पुरंदर किल्ल्याचा खालचा भाग हा ताबडतोब मोगलांच्या वेढ्यात आला. मोगलांचे मोर्चे किल्ल्याच्या ईशान्य दिशेच्या खडकाला बुरजाकडे सरकले. मोगलांनी मोठे *दमदमे* (लाकडी ओटे-प्लॅटफॉर्म) उभे केले. त्यांच्यावर तोफा चढविण्यात आल्या. हे दमदमे उध्वस्त करण्याचा मराठ्यांनी प्रयत्न केला. पण निकराच्या लढाईनंतर त्यांना माघार घ्यावी लागली. मोगलांनी किल्ल्याचे पाच बुरुज हस्तगत केले. मराठे हे किल्ल्याच्या आतील तटबंदीकडे आश्रयासाठी वळले. मराठ्यांची शिबंदी अतिशय अडचणीत होती, पण तिने निर्धाराची पराकाष्ठा केली सन 1665 च्या मेच्या अखेरीस वरीलप्रमाणे परिस्थिती होती. या युद्धाने आपल्या मुलखाचा नाशच होत आहे हे पाहून महाराजांनी हे युद्ध संपविण्याचा बेत केला. त्यांनी जयसिंगाला एकाहून अधिक पत्रे लिहिली. त्यांत त्यांनी पुढील मोगल-विजापूर संघर्षात आपण मोगलांना सहकार्य देऊ असे सांगितले. जयसिंगाच्या पत्रव्यवहारात ही गोष्ट स्पष्ट झाली आहे. पण शिवाजीमहाराजांची ही सूचना तडकाफडकी फेटाळण्यात आली. जयसिंगाला हवी होती संपूर्ण शरणागती.

पुरंदर हा अल्प काळातच गमावावा लागेल हे महाराजांना दिसू लागले. महाराज हे एकाकी पडले होते. त्यांनी मनाशी ठरविले की आपण ज्या पेचप्रसंगात सापडलो आहोत त्यातून बाहेर पडण्याचा एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे जयसिंगाची गाठ घेणे; आणि शस्त्रसंधीची विनंती करणे.

जयसिंगाने बादशहाला (औरंगजेब) जो वृत्तांत सादर केला तो असा आहे, ''*जिलहम्ज* महिन्याच्या 7 तारखेस रविवारी, (सन 1665, 11 जून) दिवसाचा एक प्रहर झाला असता, (सकाळचे 9 वाजले असता) मी दरबारात बसलो होतो. दूताने बातमी आणली की शिवाजी हा जवळ आला आहे. त्याच्याबरोबर सहा ब्राह्मण आणि काही कहार (पालखी वहाणारे) आहेत. मी उदयराज मुन्शी आणि उग्रसेन कछवाहा यांना त्याला भेटण्यासाठी पाठविले. मी त्यांना पुढीलप्रमाणे सूचना दिली की, त्यांनी शिवाजीला सांगावे की, ''तुम्ही आपले सर्व किल्ले बादशहांना देण्यास तयार असलात तरच यावे; नाही तर तुम्ही परत जावे.'' हा निरोप ऐकून शिवाजी म्हणाला, 'मी बादशहाची चाकरी पत्करली आहे, माझे अनेक किल्ले बादशहाच्या राज्यास जोडले जातील.' असे म्हणून तो मी पाठविलेल्या इसमाबरोबर आला.

शिवाजीला घेऊन येण्यासाठी मी जानी बेग बक्षी याला दारापर्यन्त पाठविले.''

पुरंदर जिंकून घेण्याची मोगलांची केव्हाही तयारी होती; पण शिवाजीमहाराजांच्या खास विनंतीवरुन मराठ्यांनी आपणहून किल्ला मोगलांच्या ताब्यात द्यावा आणि किल्ल्यांतील मराठा शिबंदीने किल्ला रिकामा करुन द्यावा या गोष्टींना परवानगी देण्यात आली. आलमगीरनाम्यातील नोंदीप्रमाणे किल्ल्यात स्त्रीपुरुष मिळून एकंदरीत सात हजार माणसे होती. त्यापैकी चार हजार लढवय्ये सैनिक होते.

पुरंदरचा वेढा हा एक गाजलेला वेढा होय.

यानंतर उभय पक्षांत तहाच्या ज्या वाटाघाटी झाल्या त्या अटीतटीच्याच म्हणाव्या लागतील. जयसिंगाला महाराजांचे सर्व किल्ले हवे होते, उलट जयसिंगाकडून सवलतीच्या अटी मिळाव्या म्हणून त्याने विजापूरच्या मोहिमेकडे वळावे असा प्रयत्न महाराज करीत होते.

जयसिंगाने या गोष्टींना नकार दिला पण महाराजांचा अगदीच कोंडमारा करणे हेही योग्य होणार नाही असे त्याने मनाशी ठरविले. असे झाल्यास निरूपाय होऊन शिवाजीमहाराज हे विजापूरला मिळतील आणि मोगलांशी शेवटच्या क्षणापर्यंत लढत राहातील या गोष्टीची शक्यता होती. हे टाळणेही आवश्यक होते. विजापूरने शिवाजीमहाराजांशी तहाची बोलणी करून काही आश्वासने दिली होती, पण तोपर्यंत फारच उशीर झाला होता. मोगलांशी आपण लढत असताना विजापूरने आपल्याला पाठिंबा दिला नाही यामुळे महाराजांच्या मनात जी कटू भावना निर्माण झाली होती ती विजापूरच्या वरील आश्वासनाने दूर होणे शक्य नव्हते. महाराजांनी मोगलांच्या विरुद्ध जो लढा चालू केला होता, त्यात विजापूरने त्यांच्याशी हातमिळवणी केली असती तर जयसिंगाच्या मोहिमेचे काय झाले असते याचा केवळ तर्क करता येणे शक्य आहे.

शेवटी तहाच्या अटी ठरल्या त्या अशा:

1. चार लाख होन (सुमारे सोळा लाख रुपये) उत्पन्नाचे शिवाजीमहाराजांचे लहान मोठे असे तेवीस किल्ले मोगल साम्राज्याला जोडण्यात यावेत.
2. राजगड धरून बारा किल्ले, एक लाख होन (सुमारे चार लाख रुपये) उत्पन्नाचे हे महाराजांकडे राहतील. पण अट ही की त्याने बादशहाची चाकरी करावी आणि बादशहाबद्दल निष्ठा बाळगावी.
3. महाराजांचा मुलगा संभाजी यांस पाच हजाराची मनसब देण्यात येईल.
4. स्वत:संबंधी शिवाजी महाराजांनी विनंती केली की ''मनसब आणि चाकरी यातून मला वगळण्यात यावे, तुमच्या दक्षिणेच्या मोहिमांत

कोणतीही कामगिरी बजावण्यास कोठेही माझी नेमणूक झाली तर मी कोणतीही दिरंगाई न करता ती कामगिरी पार पाडीन.''

5. विजापूरच्या इलाख्याबद्दल महाराज म्हणाले, ''त्या राज्यातील चार लाख होन उत्पन्नाचा तळकोकणचा भाग माझ्या ताब्यात आहे. विजापूर राज्यातील बालाघाटावर असलेले (सांगली, कोल्हापूर इत्यादी) पाच लाख होनाचे महाल आहेत हे इलाखे मला देण्यात यावेत त्याविषयीचे फर्मान मला मिळावे. फर्मानात असा स्पष्ट उल्लेख असावा की पुढे विजापूरचे राज्य जिंकून घेण्यासाठी बादशाही सैन्ये निघतील त्यावेळी वर उल्लेखिलेले तालुके माझ्याकडे ठेवण्यात येतील. या अटीवर मी दरवर्षी तीन लाख होन या हिशेबाने बादशहांना 40 लाख होनाची खंडणी देण्यास तयार आहे.''

मोगलांनी महाराजांकडून जे किल्ले घेतले त्यांत पुरंदर, कोंडाणा (सिंहगड), रोहिडा, लोहगड आणि माहुली असे बळकट किल्ले होते. महाराजांच्याकडे ठेवण्यात आलेल्या बारा किल्ल्यांत दोनच किल्ले काय ते नाव घेण्यासारखे होते. एक राजगड आणि दुसरा तोरणा. पुण्याचा मैदानी मुलुख आणि कल्याण-भिवंडीची कल्याणपटी ही मोगलांच्या ताब्यात दिली होती.

महाराजांच्याकडे काय राहिले होते ? त्यांच्या वडिलार्जित पुणे प्रांतापैकी चार लाख रुपये उत्पन्नाचा एक लहानसा प्रदेश. मध्य आणि दक्षिण कोकण हा प्रांत त्यानी विजापूरकडून जिंकून घेतला होता. याला जोडून सध्याच्या सातारा जिल्ह्यात मोडणारे प्रतापगड आणि जावळीचा तालुका.

आजच्या परिभाषेत बोलावयाचे तर महाराजांचे राज्य दोन जिल्ह्यांइतके लहान झाले होते. मोगलांनी जंजिऱ्याच्या शिद्यांना आपल्या चाकरीत घेऊन जंजिऱ्यापर्यंत आपला ताबा वाढविला होता. वास्तविक पाहाता जंजिरा हा कोकणात, महाराजांच्या कार्यक्षेत्रातील मुलुख. मोगलांचे हे वागणे महाराजांना अजिबात आवडले नाही. पण महाराजांनी ही कडू गोळी गिळली. महाराजांनी हा पाणउतारा अतिशय दृढपणे आणि संयमाने सहन केला; यातच त्यांचे मोठेपण आहे. ते झुंझण्यासाठी शिल्लक राहिले; आणि झुंज यशस्वी करून दाखविली; त्यांत सर्वकाही आले.

'मोगलांची कथा' *('स्टोरिया द मोगोर')* चा लेखक निकोलाओ मनुची हा जयसिंगाच्या या मोहिमेत त्याच्या हाताखाली काम करीत होता. त्याची आणि शिवाजीमहाराजांची गाठ पडली. त्याची त्याने थोडक्यात हकीकत लिहून ठेवली आहे. तो म्हणतो:

''जयसिंगाच्या छावणीत मी आल्यानंतर थोड्याच दिवसांनी शिवाजी हा शरण आला आणि आमच्या छावणीत तो आला. मी रात्रीच्या वेळी जयसिंगाची मर्जी असेल त्याप्रमाणे त्याच्याशी गप्पा मारण्यासाठी आणि खेळ (गंजिफा) खेळण्यासाठी त्याच्याकडे (जयसिंगाकडे) जात असे. त्या काळात एके रात्री राजा (जयसिंग), त्याचा ब्राह्मण कारभारी आणि मी असे तिघे खेळत बसलो असता शिवाजी आत आला.... यामुळे पुढे त्याच्याबरोबर अनेक वेळा बोलण्याची संधी मिळाली. विशेष म्हणजे छावणीतील इतराप्रमाणे मला फारसी आणि हिंदुस्थानी या भाषा येत होत्या. युरोपियन राजांच्या श्रेष्ठत्वाबद्दल मी त्याला माहिती दिली. शिवाजीचे मत असे दिसले की युरोपमध्ये पोर्तुगालच्या राजाशिवाय दुसरा कोणी राजा नाही. मी आपल्या धर्माबद्दलही त्याला माहिती दिली.''

तहाच्या अटीबद्दल औरंगजेबाला विशेष उत्साह वाटला नाही. शिवाजीचे सर्व किल्ले काढून घ्यावे अशी त्याची इच्छा होती. *हत्फ अंजूमनमधील* पत्रांवरून जयसिंगाने याबाबतीत मांडलेले विचार हे भक्कम आणि मुद्देसूद वाटतात. औरंगजेबाने मान्यता दिली खरी, पण ती मोकळ्या मनाने दिली असे वाटत नाही. आग्रा येथे शिवाजीमहाराजांना त्याने जी वागणूक दिली त्यावरून हे स्पष्ट होते.

जयसिंगाची पत्रे पाहाता तो आपण मांडलेल्या मुद्यावर वाजवीपेक्षा जास्त वेळा भर देतो असा सहज ग्रह होतो. शिवाजीमहाराज आणि विजापूर हे दोघे एक होतील आणि त्यामुळे मोगलांना अडचणी निर्माण होतील हा धोका होताच. मोगलांना जय मिळाल्यामुळे शिवाजीमहाराजांचा प्रभाव कमी झाला असला तरी विजापूरच्या मोहिमेत आमच्याबरोबर रहा म्हणून मोगलांनी त्यांचे मन वळविले. शिवाजी हा केवळ जमीनदार आहे, तो अधिकारी वर्गातून निर्माण झालेला आहे. विजापूर आणि गोवळकोंडा येथील वंशपरंपरेने चालत आलेल्या राजासारखा तो नव्हे. शिवाजीची शक्ती दहा वर्षांच्या वर टिकेल असे वाटत नाही. विजापूरच्या विरुद्ध जी मोहीम होईल त्या मोहिमेत आम्ही प्रथम शिवाजीचा उपयोग करून घेऊ. दक्षिणेतील समस्येत मोगल, आदिलशाहा, कुतुबशाहा आणि मराठे हे गुंतले आहेत. ही समस्या सोडविण्यासाठी करावयाची पहिली आणि आवश्यक गोष्ट म्हणजे शिवाजीला विजापूरच्या मोहिमेत ओढणे ही होय.

वरील सर्व मुद्दे हे जयसिंगाच्या पत्रात आढळतात. पत्रे बारकाईने वाचली तर मनाचा एक ग्रह झाल्याशिवाय राहात नाही. तो म्हणजे असा की शिवाजीमहाराजांबद्दल जयसिंगाला सहानुभूतीची भावना दिसते. पण मोगलांचा एकनिष्ठ सेवक या नात्याने त्याने आपले विचार आपल्यापुरतेच ठेवलेले दिसतात.

औरंगजेबाला लिहिलेल्या पत्रात त्याने शिवाजीमहाराजांसंबंधी हेटाळणीचे आणि अनुदार उद्गार काढले आहेत. पण हे सगळे केवळ औरंगजेबासाठी असले पाहिजेत.

तहाच्या अटी शिवाजीमहाराजांच्या दृष्टीने कठोरच होत्या; पण जयसिंगाचे मुद्दे आड आले नसते तर या अटी आणखी कितीतरी कठोर झाल्या असत्या.

शिवाजीमहाराजांच्यावर जयसिंगाने विजय मिळविला. आता मोगलांनी विजापूरची मोहीम हाती घेतली. ही मोहीम औरंगजेबाच्या खास हुकमावरूनच काढण्यात आली होती. हे जयसिंगाच्या पुढील वाक्यावरून स्पष्ट आहे. 'त्या कामांची (मोहिमेची) योजना माझी नव्हती.' या मोहिमेत जयसिंगापाशी प्रभावी तोफखाना नव्हता. मोहिमेस लागणारी वाहतुकीची साधनेही नव्हती. या मोहिमेत शिवाजीमहाराजांनी मोगलांना बहुमूल्य मदत केली. फलटण, ताथिवडे आणि मंगळवेढे ही स्थळे मोगलांनी काबीज केली. ती हस्तगत करण्यात प्रामुख्याने मराठ्यांनी कामगिरी केली.

पण विजापूर शहरावर चाल करून जाताना मोगलांना जो प्रतिकार झाला तो जितका अनपेक्षित तितकाच निकराचा होता. सन 1665 च्या 25 आणि 28 डिसेंबर रोजी प्रखर युद्धे झाली. जयसिंग हा विजापूर शहरापासून 16 किलोमीटर अंतरावर शहराच्या परिसरात पोहोचला. विजापूरच्या सैन्याने भोवतालचा प्रदेश बेचिराख केला होता. विजापूरच्या किल्ल्याची संरक्षण व्यवस्था उत्कृष्ट करण्यात आली होती. किल्ल्याचे संरक्षण करण्यास 30 हजार सैनिकांचे कर्नाटकी पायदळ किल्ल्यात जमले होते. गोवळकोंड्याने पाठवलेली मदत ही विजापूरला दाखल येऊन झाली.

जयसिंगाला शत्रूशी सतत युद्धे करावी लागली. शेवटी त्याला माघार घेणे प्राप्त झाले. सन 1666 च्या 5 जानेवारी रोजी जयसिंगाने विजापूर शहरापासून माघार घेतली. 11 जानेवारी रोजी तो भिमा नदीच्या काठावर पोहोचला. यामधील सहा दिवसांत विजापूरच्या सैन्याने रात्रंदिवस त्याचा पिच्छा पुरवला.

## जयसिंगाचा निरोप

यावेळी शिवाजीमहाराजांनी जयसिंगाचा निरोप घेतला. विजापूर राज्यावर पश्चिमेकडून हल्ला करणे आणि पन्हाळागड काबीज करणे, ही कामे त्यांनी करावयाची होती. जयसिंगाने ही कामगिरी त्यांच्याकडे सोपविली होती. मनुची हा त्यावेळी जयसिंगाच्या छावणीत होता. त्याने पुढील विलक्षण गोष्ट सांगितली आहे. तो म्हणतो, ''दिलेरखान याची प्रवृत्ती दगाबाजी करण्याकडे असे. शिवाजीला ठार

मारावे असे त्याला अनेक वेळा वाटे. त्या हेतूने तो राजा जयसिंग याला म्हणे, 'तुम्ही शिवाजीला ठार मारा किंवा त्याला ठार मारण्याची मला परवानगी द्या. शिवाजीच्या मृत्यूची सगळी जबाबदारी मी आपल्या अंगावर घेईन. तुमच्यावर काहीही दोष येणार नाही; याची मी संपूर्ण काळजी घेईन. असे घडले तर (शिवाजीचा मृत्यू) बादशहाला (औरंगजेब) आनंद देईल कारण शिवाजीचे शौर्य आणि साहस ही मोगलांना कधी स्वस्थ बसू देणार नाही.' राजा जयसिंग याने शिवाजीला आणाशपथा वाहिल्या होत्या. अशा खुनाला तो परवानगी कशी देईल ? उलट त्याची इच्छा अशी होती की बादशहाने शिवाजीला आदराने आणि सन्मानाने वागवावे. त्याने दिलेरखानाचे म्हणणे मुळीच ऐकले नाही.''

सन 1666 च्या 16 जानेवारी रोजी शिवाजीमहाराज पन्हाळ्याला पोहोचले आणि त्यांनी किल्ल्यावर हल्ला चढविला. त्यांचा सेनापती नेताजी पालकर हा वेळेवर न आल्यामुळे हल्ला यशस्वी झाला नाही. महाराजांनी नेताजीची चांगलीच कानउघडणी केली. नेताजीला मोगलांकडून मनसब मिळाली होती. तीही अपुरी आहे असे त्याला वाटत होते. नेताजीने महाराजांची सोबत सोडली; आणि तो जाऊन विजापूरला (अदिलशहाला) मिळाला. मोगलांनी त्याला बढतीची मनसब देऊ करून आपल्या चाकरीत पुन्हा वळवून आणले.

महाराजांपासून नेताजी फुटून निघाला या घटनेवरून एक गोष्ट स्पष्ट होते. शिवाजीमहाराजांच्या अगदी निकट असलेल्या अधिकाऱ्यांनासुद्धा महाराज चालवित असलेल्या लढ्याचे मर्म आणि महत्व, ही उमगली नाहीत. महाराजांनी विजापूरविरुद्ध चालविलेल्या मोहिमेचा एक भाग म्हणून ते कोकणात उतरले आणि त्यांनी फोंड्याला (गोव्यातील पणजीजवळ) वेढा घातला. किल्ल्यातील विजापूरच्या शिबंदीला पोर्तुगीजांची गुप्त मदत मिळाली. त्यांनी वेढ्याचा निकराचा प्रतिकार केला. महाराजांना वेढा उठवावा लागला. विजापूरच्या ताब्यात फोंड्याच्या उत्तरेकडील प्रदेश आला.

विजापूरच्या मोहिमेत जयसिंगाची दुर्दशा झाली. बरोबर पुरेसा तोफखाना नाही, असे असूनही बादशहाच्या (औरंगजेब) आज्ञेने त्याला विजापूरवर मोहीम करावी लागली. आणि आता तर त्याला माघार घ्यावी लागली होती. या अपयशाचे खापर औरंगजेबाने जयसिंगाच्या डोक्यावर फोडले.

इतक्यावरच भागले नाही, जयसिंगाला आणखी एक भीती वाटू लागली की विजापूरवरील मोगलांच्या मोहिमेचा फजितवाडा झाला होता, याचा परिणाम शिवाजीवर होऊन त्याने विजापूरशी हातमिळवणी केली तर आणि तहाने

शिवाजीमहाराजांना बादशहाने बोलावून घ्यावे असे सुचविणारा जयसिंगच. त्याने बादशहाला लिहिले, ''आदिलशहा आणि कुतुबशहा यांची आपल्याविरुद्ध युती झाली आहे, शिवाजीचे मन आपल्याकडे हरप्रकारे वळवून घेणे हे आवश्यक आहे. त्याला आपल्या हुजुरात हजर होण्यासाठी उत्तर भारतात पाठविणे याची जरूर आहे.''

महाराजांनी आग्रा येथे जावे यासाठी त्यांचे मन वळविण्यात जयसिंगाने आपले सारे कौशल्य पणास लावले असले पाहिजे. महाराजांना काही इलाखे परत मिळतील अशी आशा तर तो दाखवू शकत नव्हता. मन वळविण्याचे काम वरकरणी अतिशय गोडव्याने आणि शिष्टाचाराने चाललेले असावे पण अंत:स्थ दडपण तितकेच जबरदस्त असले पाहिजे. दरबारात जाण्याचे टाळणे महाराजांना शक्य नव्हते. कदाचित त्यांना असेही वाटत असावे की मित्र म्हणून औरंगजेबाला आपले महत्व कळून येईल आणि आपला वडिलार्जित मुलूख आपल्याला परत मिळण्याचा एखादा मार्ग सापडेल.

# 5

# महाराजांची आग्रा-भेट आणि सुटका

सन 1666 च्या 5 मार्च रोजी शिवाजीमहाराज हे आग्रा येथे जाण्यासाठी निघाले. वाटेत ते औरंगाबादेस एक आठवड्यासाठी थांबले होते. औरंगजेबाने त्यांना पुढीलप्रमाणे लिहिले होते; "तुम्ही स्वस्थ चित्ताने आणि माझ्या कृपेवर संपूर्ण विश्वास ठेवून अविलंबे करून यावे. माझ्या हुजुरात तुम्ही आल्यानंतर तुमच्यावर अनेक प्रकारे कृपा करण्यात येऊन तुमचा मान वाढविण्यात येईल आणि तुम्हाला स्वदेशी परत जाण्याची परवानगी देण्यात येईल."

सन 1666 च्या 12 मे रोजी महाराज आग्रा येथे पोहोचले. शिवाजी महाराजांचे उत्कृष्ट वर्णन आणि त्यांच्या लवाजम्याची माहिती आपल्याला जयसिंगाचा मुलगा रामसिंग याच्या रजपूत अधिकाऱ्यांच्या पत्रांतून मिळते. ही पत्रे *राजस्थानी रेकॉर्डस* या ग्रंथात समाविष्ट आहेत. पत्रात म्हटले आहे: [1]

"शिवाजी हा फक्त शंभर सोबत्यांना घेऊन आला आहे. त्याचे रक्षक, यांची संख्या दोनशेपासून अडीशेपर्यंत होती. शिवाजी जेव्हा पालखीत स्वार होऊन निघतो तेव्हा त्याचे पायदळ सैनिक तुर्कांच्या पद्धतीने मोठ्या संख्येने पुढे चालतात. त्याचा झेंडा (निशाण) नारिंगी, शेंदरी रंगाचा असून आणि सोनेरी छाप असलेला आहे...दिसण्यात शिवाजी हा बांध्याने किरकोळ आहे. *(अर सेवोजी डीलसो हकीर छोटोसोही देखता दिसजी)* पण स्वरूपाने विलक्षण गोरा आहे. *(अर सूरती बहुत अजाअिब गोरो रंग)* त्याच्याकडे पाहाताच कुणालाही असे वाटावे की हा राजाच असला पाहिजे. *(अपुछो राजवी दिसौ जी)* तो अतिशय हिमतीचा आणि मर्द माणूस दिसतो. शिवाजीला दाढी आहे. त्याचा मुलगा नऊ वर्षाचा आहे. .तोही विलक्षण स्वरूपवान आणि गोऱ्या वर्णाचा आहे."

शिवाजी महाराजांनी औरंगजेबाची भेट घेतली. हा प्रसंग ज्यांनी प्रत्यक्ष पाहिला ती हकीकत आपल्या राजस्थानी साधनांतून पाहाण्यास मिळते.

---

1. सरकार आणि रघुबीरसिंग, *'राजस्थानी रेकॉर्डस् :'* आग्रा येथे शिवाजी औरंगजेबाशी भेट, कलकत्ता 1963.

मोगल-मराठा संबंधाच्या इतिहासाला कलाटणी देणारा असा तो संस्मरणीय प्रसंग होता. त्याचे वर्णन पुढील शब्दात केले आहे:

"कुमार (रामसिंग) आणि मुखलिसखान हे शिवाजीला घेऊन दरबारात येत होते. याचवेळी बादशहाने (औरंगजेब) दिवाणे-आम सोडले आणि तो गुसलखाना उर्फ दिवाणे-खास मधे बसला होता. दिवाणे-खासमध्ये निवडक लोकांनाच बादशहाच्या भेटीचा मान लाभत असे. शिवाजी हा दिवाणे-खासमधे गेला. बादशहाने असदखान बक्षी याला आज्ञा केली की; 'शिवाजीला घेऊन या, आणि हुजूरांत हजर करा.' असदखानाने शिवाजीला बादशहापाशी आणले. शिवाजीने बादशहाला नजर म्हणून एक हजार मोहरा आणि दोन हजार रुपये आणि निसार म्हणून पाच हजार रुपये अर्पण केले.

शिवाजीचा मुलगा संभाजी याला यानंतर बादशहापुढे आणण्यात आले. त्याने बादशहाला नजर म्हणून पाचशे मोहरा आणि एक हजार रुपये व निसार म्हणून दोन हजार रुपये अर्पण केले. त्यांना (शिवाजी व संभाजी) ताहिरखानाच्या [1] जागी राजा रायसिंगच्या समोर उभे करण्यात आले.

तो दिवस म्हणजे बादशहाचा (औरंगजेबाचा) वाढदिवस होय. शहाजादे आणि अमीर उमराव यांना पानविडे देण्यात आले. शिवाजीलाही विडा देण्यात आला. यानंतर त्या प्रसंगास अनुसरून खिलतीची वस्त्रे शहजादे जाफरखान आणि राजा जसवंतसिंग यांना देण्यात आली. या घटनेने शिवाजीला धक्का बसला; त्याला अतिशय राग आला, तो इतका की डोळ्यात मावेनासा झाला. हे बादशहाच्या (औरंगजेब) नजरेस आले. त्याने रामसिंगला म्हटले, 'शिवाजीला काय होत आहे, हे त्याला विचारा.'

मग कुमार (रामसिंग) हा शिवाजीजवळ आला. शिवाजीने त्याला म्हटले, 'मी कसा मनुष्य आहे हे तुम्ही पाहिलेत, तुमच्या वडिलांनी पाहिले आणि तुमच्या बादशहाने पाहिले; आणि मला मुद्दाम गैरवाजवी रीतीने उभे करण्यात आले. मी तुमची मनसद सोडली. मला उभेच करावयाचे होते तर ते रीतसर तरी करायचे होते.' यानंतर तो (शिवाजी) तेथून पाठ फिरवून निघाला. तेव्हा कुमारने (रामसिंग) त्याचा हात धरला. शिवाजीने हात सोडवून घेतला. आणि (दिवाणखान्याच्या) एका बाजूस येऊन बसला. कुमार (रामसिंग) तेथे गेला आणि

1. या भेटीच्या फक्त एक पंधरवड्यापूर्वी त्याला पाच हजारी मनसबदार म्हणून बढती देण्यात

तो शिवाजीची समजूत घालू लागला. शिवाजी ऐकेना. तो म्हणाला, 'माझे मरण आले आहे. एक तर तुम्ही मला मारा नाहीतर मी स्वतःच आत्महत्या करीन. माझे डोके कापून घ्यायचे असेल तर घेऊन जा. मी बादशहाच्या हुजुरात येणार नाही.'

काही केल्या शिवाजीची समजूत पटेना. तेव्हा महाराज कुमार (रामसिंग) याने बादशहापाशी जाऊन ही गोष्ट कळवली. तेव्हा बादशहाने मुल्तफतखान, आकिलखान, मुखलिसख़ान यांना पुढीलप्रमाणे आज्ञा केली. 'शिवा (जी) स दिलासा द्या. त्याला *सरोपाव* (शिरोप्याची वस्त्रे) द्या. आणि त्याची समजूत घालून त्याला घेऊन या. ते तिघे उमराव शिवाजीपाशी आले, ते म्हणाले,'सरोपाव परिधान करा.' त्यावर शिवाजी म्हणाला, 'मी सरोपाव घेणार नाही. मला बादशहाने गैरवाजवीपणे जयवंतसिंगाच्या मागे उभे केले. मी हा असा मनुष्य आणि मला अशा गैरपद्धतीने उभे करण्यांत आले? मी बादशहाची मनसब घेणार नाही. मी त्याचा चाकर म्हणून राहाणार नाही. मला मारावयाचे असल्यास मारा, कैद करावयाचे असल्यास कैद करा, मी काही सरोपाव घालणार नाही.'

यानंतर ते तिघे परतले आणि त्यांनी बादशहांना हकीकत सांगितली. यावर बादशहाने रामसिंगला म्हटले, 'कंवर (रामसिंग), तू शिवाजीला आपल्याबरोबर घेऊन जा त्याला तंबूत घेऊन जाऊन त्याची समजूत घाल.' कुमार (रामसिंग) हा शिवाजीला आपल्याबरोबर तंबूत घेऊन आला. एकांतात ते बसले. त्याने शिवाजीशी चर्चा केली, पण शिवाजीने त्याचे ऐकले नाही. वर दिलेली हकीकत ही राजस्थानी साधनांतील होय. याहून वेगळी हकीकत आपल्याला मुहम्मद काझम याने लिहिलेल्या आलमगीरनाम्यात आढळून येते. त्या ग्रंथातील मजकूर पहा.

''वाढदिवसाच्या उत्सवाच्या दिवशी बादशहाने आज्ञा केली की कुमार (रामसिंग) आणि मुखलिसखान यांनी त्याचे (शिवाजीचे) स्वागत करावे आणि त्याला दरबारात आणावे. शिवाजी दरबारात पोहोचला आणि त्याने मुजरे केले. तो बादशहाच्या जवळ आला. बादशहाचे जे निकटवर्ती होते अशा लोकांच्या जागेत आणि अशा लोकांच्या बरोबर तो उभा राहिला. त्या दिवशी बादशहाने ठरविले होते की शिवाजीवर खूप कृपा करावी. शिवाजीने काही दिवस दरबारात येऊन शिष्टाचाराप्रमाणे मुजरे, अभिवादन इत्यादी करावे. बादशहाच्या कृपाप्रसादाचा लाभ घ्यावा. आणि देशी लवकर परतण्याची परवानगी घ्यावी. पण शिवाजी म्हणजे अज्ञानाच्या ओसाड वनातील एक जंगली जनावरच! त्याच्या डोक्यात भलभलते विचार खेळत होते. बादशाही दरबारातील शिष्टाचाराची त्याला काहीही माहिती नव्हती. त्याच्या डोक्यात असमंजस अपेक्षा, अवास्तव उद्देश व वेडगळ कल्पनाही

भरलेली होती. *(तवक्कोआति बेजा, व मकासिद् दूर अज कार, व ख्यालाति खाम)* तो आपल्या जागी उभा राहिला. बादशहाने त्याच्यावर कृपा केली असताही तो निर्बुद्ध असल्यामुळे त्याच्या तोडून वेडगळ आणि मूर्खपणाची बडबड सुरू झाली. तो एका कोपऱ्यात गेला आणि आपल्या क्षोभाचे प्रदर्शन करू लागला. त्याने अनुचित तक्रारी आणि अयोग्य विचार बोलून दाखविले. त्याचा मूर्खपणा अशा रीतीने उघड झाला. त्याच्या डोक्यातून त्याचा हा सततचा ध्यास बाहेर पडला, आणि त्याने (शिवाजीने) एकच गोंधळ उडविला.

"असे दिसून आले तेव्हा बादशहाने ठरविले की हा मनुष्य (शिवाजी) दरबारात आपल्यासमोर हजर राहाण्याच्या योग्यतेचा नाही. त्याने त्याला आपल्या तळाकडे परत जाण्याची आज्ञा केली. त्या दिवशी शिवाजीला बक्षिसे देण्यात येणार होती; त्याच्यावर कृपा करण्यात येणार होती, पण वरील कारणामुळे ते काही घडू शकले नाही. तो दुष्ट आणि मूर्ख मनुष्य (शिवाजी) बादशहाच्या कृपादृष्टीपासून वंचित झाला. बादशहाने आज्ञा केली की यापुढे त्याने दरबारात येता कामा नये."

वरील घटनेचे हे सरकारी भाष्य पाहिले तर एक गोष्ट जाणवते. शिवाजीमहाराजांना ज्या प्रकारच्या वागणुकीची अपेक्षा होती आणि जशी वागणूक देण्यास हवी तशी देण्याकडे अक्षम्य दुर्लक्ष करण्यात आले. अशी ही घटना आहे. तिची सारवासारव करण्याचा हा सरकारी भाष्याचा केविलवाणा प्रयत्न आहे. या घटनेने आग्रा येथे जी खळबळ उडाली त्याची थोडीशी कल्पना आपल्याला *राजस्थानी पत्रांवरून* येते. सन 1666 च्या 29 मे च्या पत्रात म्हटले आहे,[1] 'यापूर्वी शिवाजीची मर्दुमकी आणि मत याची लोक तारीफच करीत होते. आणि आता तो बादशहाच्या हुजुरात आला, त्याने अतिशय कडकपणा दाखविला; आणि बादशहाला करडा जबाब सुनावला. *(सख्ती करी करडा जबाब कह्या)* त्यामुळे सामान्य जनता *(खलक)* शिवाजीच्या मर्दुमकीची खूपच प्रशंसा करीत आहेत. *(तीथे खलक सेवाजीकी मरदानगी ने बहुत सराहो छो जी.)*'

दिवाणे-खासमधील शिवाजीमहाराजांची वागणूक म्हणजे मोगल सरदारांना आयतीच चालून आलेली एक संधी होती. जाफरखान आणि इतर सरदार यांनी बादशहापाशी शिवाजीमहाराजांच्या विरुद्ध आपला जोरदार निषेध व्यक्त केला. *राजस्थानी पत्रांतून* या सरदारांचे म्हणणे पुढीलप्रमाणे दिले आहे, "हा कोण शिवा आहे? त्याने आपल्या हुजुरात अशी बेअदबी करावी! आणि अशा उद्धटपणे

---

1. *राजस्थानी पत्रे,* 15-16 मे 1666, पृ. 36

वागावे! आणि *(हुजुर)* बादशहा तर अशा कृत्याकडे काणाडोळा करतात. असा प्रकार झाला तर अनेक *(भूमीये)* जमीनदार इथे येतील आणि असेच उद्धटपणे वागतील, अशा परिस्थितीत राज्याचा कारभार कसा चालावा? सर्व देशांत ही बातमी पसरेल, एका हिंदूने बेडरपणाने सर्व प्रकारे बेअदबी केली. सर्वजण असेच वागू लागतील. तेव्हा बादशहाने विचार केला की, *(तीसै श्री पातशाहजीका दिलमे आयी)*, किंवा असे ठरले की, *(या मसलहती हुयी)* शिवाजीला मारण्यात यावे किंवा किल्ल्यात बंदिस्त करण्यात यावे किंवा कैदेत ठेवावे. *(जुइके तायी मारा या गढी चढांवा या इसके तायी कैदमे करा.)* सिद्दी फोलाद याला आज्ञा करण्यात आली की त्याने शिवाजीला आग्रा किल्ल्याचा अधिकारी राद संदाजखान याच्या हवेलीला *(वाडा)* घेऊन जावे असे औरंगजेबाने सांगितले.''

## महाराजांच्या प्राणावर संकट

रामसिंगाच्या छावणीजवळ शिवाजीमहाराजांचे वास्तव्य होते. तेथून त्याला हलविण्याची योजना म्हणजे महाराजांच्या जिवाला मोठाच धोका होता. जयसिंगाने आपला मुलगा रामसिंग यास निक्षून बजावले होते की शिवाजीमहाराजांच्या आग्रा येथील वास्तव्यात त्यांना काहीही अपाय होता कामा नये. महाराजांना हलविण्याचा अप्रिय निर्णय थांबविण्यासाठी त्याने ताबडतोब पावले उचलली. बादशहांचा बक्षी मोहंमद अमीनखान याच्याकडे तो धावतच गेला. तो अमीनखानाला म्हणाला, 'शिवाजीला ठार मारावे असा बादशहाचा विचार आहे. *(पातिशाहा जी सेवा ने मारबा को बिचारे करो छो)* पण शिवाजी हा (माझ्या वडिलांकडून) कौल मिळाल्यानंतरच येथे आला आहे. त्यामुळे बादशहाने प्रथम मला मारावे नंतर माझ्या मुलाला बोलावून आणून त्याला मारावे आणि आम्हाला मारल्यानंतर त्याला (शिवाजीला) मारावे अगर त्याचे काय वाटेल ते करावे.'

बादशहाने विचारले, 'शिवाजीबद्दल रामसिंग हा जामीन होण्यास तयार आहे का?' रामसिंगाने शिवाजीमहाराजांशी सल्लामसलत केली. त्यांनतर त्याने (रामसिंग) जामीनगिरीचा कागद लिहून दिला.

मोठा धोका उद्‌भवला होता तो तूर्त तरी टळला. पण 16 मे च्या त्याच पत्रावरून आपल्याला आणखी एक माहिती मिळते. बादशहाने रामसिंगाला काबूल येथे तैनात केले. त्याने शिवाजीला आपल्याबरोबर घेऊन जावे अशी आज्ञा होती. रामसिंगाच्या पथकाच्या *करावल* म्हणजे आघाडीवर राद अंदाजखान याची नेमणूक करण्यात आली ही गोष्ट मोठी सूचक आहे. टोळीवाल्यांच्या मुलखात

शिवाजीमहाराजांचा आपण निकाल लावायचा ह्याहून सोपी गोष्ट कोणती असू शकेल? आणि मग जाहीर करायचे की टोळीवाल्यांच्या आकस्मिक आणि छुप्या हल्ल्यात शिवाजी मरण पावला. पत्रात म्हटले आहे, शिवाजीला मारावे असा जेव्हा विचार चालला होता तेव्हा राद अंदाजखान याने रामसिंगाला म्हटले, 'कंवरजी, तुमच्या पथकांच्या आघाडीवर माझी नेमणूक झाली आहे.'

रामसिंगाबरोबर आपल्याला काबूलला जावे लागेल असे समजल्यावर महाराजांनी काबूलकडे जाण्यास नकार दिला. या अवधीत महाराजांनी बादशहाचा वझीर, जाफरखान याच्याशी संपर्क साधला होता. जाफरखान आणि इतर अमीरउमराव यांचा पाठिंबा मिळविण्यासाठी महाराजांनी त्यांना बऱ्याच रकमा दिल्या असाव्यात असे दिसते. 29 मेच्या *राजस्थानी पत्रात* म्हटले आहे (पृ. 36), 'असे ऐकण्यात येते की, शिवाजीने जाफरखानाला आपल्याकडे वळवून घेण्यासाठी त्याला काही द्रव्य दिले आहे. आणखी अशाच थोड्याबहुत रकमा खर्ची घातल्या आहेत.'

रामसिंग आणि शिवाजी यांना काबूलला पाठविण्याची योजना टाकून देण्यात आली, शिवाजीमहाराजांचा मुलगा संभाजी याला मात्र रामसिंगाच्याबरोबर दरबारात येण्याची परवानगी मिळाली.

शिवाजीमहाराजांनी महंमद अमीरखानाच्या मध्यस्थीने विनंती केली की माझे किल्ले मला परत देण्यात आले तर मी दोन कोटी रुपये देण्यास तयार आहे; याशिवाय मी दक्षिणेत बादशहाची इमाने इतबारे चाकरी बजावीन.

याला औरंगजेबाने जे उत्तर दिले ते गारठवून टाकणारे होते. तो म्हणाला, 'मी त्याच्याशी मऊपणाने वागत आहे, म्हणून त्याचे डोके फिरले आहे. त्याला देशी परत जाण्यास परवानगी कशी देता येईल? त्याला ठासून सांगा, त्याने कुणाचीही भेट घेता कामा नये.' यामुळे महाराज राहात होते त्या जागेभोवती मजबूत चौकीपहारे बसविण्यात आले.

*आलमगीरनाम्यात* म्हटले आहे, 'त्याची (शिवाजी) दुष्ट प्रवृत्ती बादशहाला दिसून आली. बादशहाला शंका आली की तो दुष्ट पळून जाण्याचा संभव आहे. पोलीसचा प्रमुख फोलादखान याला बादशहाने आज्ञा केली की त्याने आपले पोलीसदळ शिवाजीच्या तळाच्या भोवती तैनात करावे. अधिक देखरेखीसाठी आणि पहाऱ्यासाठी या पोलीसदळाला तोफखान्याच्या एका विभागाची जोड देण्यात आली.'

आलमगीरनाम्यावरून आपल्याला असेही कळते की महाराजांबद्दल

जयसिंगाकडे चौकशी करण्यात आली.

आता पुन्हा एकदा महाराजांच्या जिवाला धोका निर्माण झाला होता. 7 जून च्या राजस्थानी पत्रात म्हटले आहे, ''प्रथम बादशहाने शिवाजीला पुढीलप्रमाणे निरोप पाठविला, 'तुमचे सर्व किल्ले मला देऊन टाका, आम्ही तुम्हाला मनसब देऊ. ती तुम्ही कबूल करावी. तुम्ही आपल्या पुतण्याला येथे बोलवावे. आम्ही त्यालाही मनसब देऊ.'

यावर शिवाजीने म्हटले, 'मला मनसबीची इच्छा नाही. किल्ल्यावर माझा अधिकार नाही.' शिवाजीचे हे उत्तर ऐकून बादशहा चिडला होता. त्यात हरकऱ्याने पुढील बातमी आणली, 'रामसिंगाची पथके आपल्या देशाहून इकडे येत आहेत ती आणि शिवाजीची पथके एकत्र जमा होत आहेत.'

बादशहा अधिकच चिडला. त्याने शिद्दी फौलाद आणि तोफखाना यांना आज्ञा दिली की जा आणि शिवाजीला पकडून मारा. *(सेवाको जाओ पकडी मारौ)*

रामसिंगला पुढील निरोप पाठविण्यात आला 'आम्हाला खबर लागली आहे की तुमच्या देशांतून लोकांची ये-जा वाढली आहे आणि पथके एक होत आहेत? रामसिंगाने विनंती केली की, मला काबूलला जाण्याची आज्ञा झाली होती. यासाठी मी माझी माणसे बोलावली होती. माझी नेमणूक आता रद्द करण्यात आली आहे. मी माझ्या माणसांना आता येऊ नका म्हणून सांगितले आहे. आम्ही लोक सैन्य गोळा करावे! मी बादशहाचा बंदा आहे. शिवाजीपण बादशहाचा बंदा आहे. बादशहांना वाटले तर त्यांनी शिवाजीला कैद करावे, वाटले तर मारावे.

बडी बेगम (औरंगजेबाची बहीण) हिने अर्ज केला. ती म्हणाली, 'मिर्जा राजा (जयसिंग) हा तुमचा श्रेष्ठ सेवक आहे. त्याने दिलेल्या कौलावरून (अभयवचन) शिवाजी येथे आला आहे. आणि तो बादशहाचा चाकर झाला आहे. हजरतनी (औरंगजेब) त्याला मारले तर यापुढे हजरतांच्या कौलांवर विश्वास ठेवून कोणी त्यांना येऊन मिळणार नाही. त्यादिवशी बादशहाने बेगमजीच्या सांगण्यावरून त्या घटनेवर पुढे काहीच केले नाही.

एके दिवशी शिवाजीने रामसिंगाला म्हटले, 'मला वाटले की लोक तुमचे ऐकतात. तुम्ही माझ्याबद्दल बादशहाशी बोललात, पण ते ऐकत नाहीत. आता तुम्ही त्याला (बादशहाला) सांगावे की, माझा आणि शिवाजीचा आता संबंध नाही. बादशहाने त्याचे काय वाटेल ते करावे.' रामसिंग म्हणाला, 'मी तुझी सोबत कशी सोडू?' दोन दिवसांपूर्वी महाराज कुमारांनी (रामसिंग) शिवाजीपाशी आपले

स्वत:चे रक्षक तैनात केले.

आग्रा येथील बाजारात ज्या विलक्षण अफवा पसरत होत्या त्यांचा उल्लेख *राजस्थानी पत्रांत* आला आहे. तो वाचून मोठी गंमत वाटते. पत्रातील एक अफवा अशी, 'राजा जसवंतसिंग याने बादशहाला सांगितले की शिवाजी हा जमिनीपासून चौदा-पंधरा हात उडी मारतो. एका दमात तो चाळीस ते पन्नास कोस चालतो.' शाहजादा (मुअज्जम) हा गंभीरपणे म्हणाला, 'मी सुद्धा औरंगाबादेस ही बातमी ऐकली होती.'

महाराजांनी आपले किल्ले देऊन टाकावेत अशी तळमळ बादशहाला लागली होती. पण महाराज हे करण्यास तयार नव्हते. रामसिंगाला न गुंतवता आपण आग्रा येथून निघून जावे याचा विचार महाराज करीत असले पाहिजेत. त्यांनी विनंती केली की आपल्याला रामसिंगाच्या देखरेखीखाली ठेवण्यात येऊ नये, आणि आपल्या राहण्यासाठी एखादी जागा ठरविण्यात यावी. महाराजांच्या ह्या विनंतीकडे कुणी लक्ष दिले नाही. पण शिवाजीमहाराजांना कोणताही अपाय होऊ नये म्हणून त्यांचे रक्षण करण्यासाठी त्यांच्या देखरेखीची व्यवस्था रामसिंगाने केली, तीं त्याने तशीच चालू ठेवली.

आठ जून रोजी महाराजांनी आपल्या नोकरांना परत पाठविले. ते त्यांना म्हणाले, 'तुम्ही येथून निघून जा, माझ्याबरोबर कोणीही राहता कामा नये, मी येथे एकटाच राहीन. मला त्यांनी मारावयाचे ठरविले तर मला मरून जाऊ द्या.' रामसिंगाने त्या माणसांना आपल्या छावणीत राहाण्याची परवानगी दिली. शिवाजीमहाराजांनी बादशहाकडे निरोप पाठविला की, 'माझ्या सैनिकांना *दस्तके* (परवानगी पत्रे-पासपोर्ट) देण्यात यावीत, म्हणजे ते दक्षिणेकडे जातील.

शिवाजी महाराज सुटून जायची शक्यता आहे असे मोगल सरकारला वाटत असावे त्यासाठी ते घडू नये म्हणून खबरदारी घेण्यात येत होती. बारा जूनचे हे पत्र पहा, 'आज्ञा झाली की शिवाजी आग्रा येथून पळून मौजाबाद परगण्याच्या वाटेने आला तर तो तेथून जाऊ शकणार नाही अशी खबरदारी घेण्यात यावी.'

बादशहावर दडपण आणण्यासाठी शिवाजीने विनंती केली की, 'आपण फकीर होतो. आज्ञा व्हावी. मी बनारसला जाईन.' बादशहाने कळविले, तुम्ही फकीर होऊन प्रयागच्या किल्ल्यात रहा. तेथील सुभेदार तुमची खबरदारी घेईल.' दक्षिणेकडील विजापूरची मोहीम ही मोगलांनी आखलेल्या योजनेप्रमाणे मुळीच चालली नव्हती. जयसिंग मोठ्या पेचात असला पाहिजे. महाराजांबद्दल त्याने जे पत्र लिहिले आहे ते उद्बोधक आहे. आपला मुलगा रामसिंग याला लिहिताना जयसिंग

म्हणतो, [1] 'तुम्ही माझ्याकडून बादशहाला पुढील निरोप कळवा. मात्र हे इतर कुणालाही सांगू नका. प्रत्येक वेळेचे, त्या त्या प्रसंगीचे विशेष महत्व असते. ज्या वेळी मी बादशहाला विनंती केली की त्यांनी शिवाजीला परत पाठवावे त्यावेळच्या परिस्थितीत आणि आताच्या परिस्थितीत फरक पडत आहे. सध्याच्या परिस्थितीत त्याला (शिवाजीला) या प्रदेशात येण्याची परवानगी देणे मुळीच हितकारक होणार नाही. तुम्ही बादशहाला हेही सांगावे की शिवाजीला तेथेच ठेवण्यात यावे ते त्याच्या योग्यतेस अनुरूप अशा इतमामाने (कैदी म्हणून नव्हे). नाही तर त्याचे येथील अधिकारी शिवाजीच्या परत येण्यासंबंधी निराश होतील, त्यांना जाऊन आदिलशहाला मिळावेसे वाटेल. आणि ते आपल्याविरूद्ध बंडाळी करतील. मी सुचविलेले धोरण अंमलात आल्यास तिकडून नवीन सैन्य इकडे पाठविण्याची आवश्यकता राहाणार नाही.'

जयसिंग पुन्हा म्हणतो, [2] 'शिवाजी महाराजांची समजूत घालण्यात आली पाहिजे. त्याला आश्वासन देण्यांत यावे की, बादशहा दक्षिणेत आल्यानंतर त्याला (शिवाजी) आग्रा येथून बोलावून घेण्यात येईल. धोरण म्हणून त्याच्या (शिवाजीच्या) मुलाला बादशहापाशी राहू द्यावे, म्हणजे त्याचे (शिवाजी) अनुयायी आपल्याला एकनिष्ठ सहाय्य करतील.'

हे वरील पत्र लिहिण्याचे कारण असे की, त्यावेळी एक ग्रह पसरला होता तो असा, 'दक्षिणेची मोहीम यशस्वी रीतीने पार पाडण्यासाठी बादशहा स्वत: तिकडे जाण्याचा गंभीरपणे विचार करीत आहे.' शिवाजीला उत्तरेतच ठेवावे असे जयसिंगाला का वाटावे? तर शिवाजीने विजापूरशी हातमिळवणी केली असे घडू नये म्हणून. औरंगजेबाचा उद्देश होता, शिवाजीवर दडपण आणून त्याचे किल्ले काढून घेण्याचा. शिवाजीचे किल्ले भक्कमपणे आपल्या ताब्यात आल्याशिवाय तो (औरंगजेब) शिवाजीला जाऊ देण्यास तयार नव्हता. महाराजांवरचे हे दडपण वाढविण्यात येऊ लागले.

शिवाजीने बादशहाला विनंती केली की, 'मला दक्षिणेत जाऊ देण्यात यावे. माझे किल्ले मी बादशहांना मिळवून देईन. येथून पत्रे लिहिल्यास शिबंदी माझे ऐकेलच असे नाही.' त्यावर बादशहाने उत्तर दिले, 'शिवाजी हा तिकडे गेल्यावर त्याच्या किल्ल्यातील शिबंदी आपले किल्ले देण्यास तयार होत असली तर येथून

---

1. सरकार, *हाऊस ऑफ शिवाजी,* पृ. 166.
2. सरकार, *शिवाजी* पृ. 149

त्याने पत्र लिहिल्यावर ती का तयार होणार नाही?'

मराठी बखरकार सभासद याने आपल्याला सांगितल्याप्रमाणे महाराजांनी आग्रा येथील मुक्कामात वझीर जाफरखान आणि इतर यांच्या भेटी घेतल्या. भीमसेन सक्सेना हाही आपल्याला महाराजांच्या औदार्याच्या, दानधर्माच्या आणि सैनिक व नागरिक यांना दिलेल्या भेटीच्या अन खैरातीच्या गोष्टी सांगतो. यामुळे महाराजांना खर्चास पैसे कमी पडू लागले. त्यांनी रामसिंगाकडून 66 हजार रुपये उसने घेतले. अर्थात ही रक्कम दक्षिणेत जयसिंगाकडे रीतसरपणे परत करण्यात आली.

महाराज आग्रा येथून जाण्यापूर्वी ज्या घटना घडल्या त्यांवर 23 ऑगस्टच्या *राजस्थानी पत्रावरून* बराच प्रकाश पडतो. पत्रात म्हटले आहे, 'शिवाजी येथून जायपूर्वी चार दिवस चौकी-पहारे बरेच कडक करण्यांत आले होते. बादशहाने पुन्हा एकदा आज्ञा केली की शिवाजीला ठार मारण्यांत यावे *(और पाकीसाह जी पाछीं मारी नाखीबा कौ हुकुम कीर्या)*. नंतर बादशहांनी आज्ञा केली की, शिवाजीला राजा विठ्ठलदासच्या हवेलीत ठेवण्यात यावे... शिवाजीने ओळखले की आता आपल्यावर वाईट वेळ आली आहे; म्हणून तो तेथून निसटला.

मराठी बखरीच्या माहितीवरुन शिवाजीमहाराज आग्रा येथून सन 1666 च्या ऑगस्ट रोजी निघालेले दिसतात. *राजस्थानी पत्रावरून* ही तारीख 18 ऑगस्ट ठरते. आणि *आलमगीरनामामध्ये* महाराजांच्या जाण्याची तारीख 19 ऑगस्ट असा उल्लेख आहे. मराठी बखरीची माहिती खरी दिसते. शिवाजीमहाराज हे गेले हे आपल्याला 18 ऑगस्टला कळले असे राजपुतांनी दाखविले. मोगलांनी मात्र त्वरेने शिवाजीमहाराजांचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. त्यात यश न आल्यामुळे महाराज निघून जाण्याच्या बातमीला त्यांनी दुसऱ्या दिवशी म्हणजे 19 तारीख पक्की म्हणून दिली.

महाराजांच्या जाण्यामुळे आग्रा येथे चौकशा, आरोप आणि प्रत्यारोप यांचा गदारोळ माजला. या वादात रामसिंगाला ओढण्याचे प्रयत्न करण्यांत आले. या प्रकरणात रामसिंगाचा हात होता अशी औरंगजेबाला खात्री वाटल्याचे दिसते. पण राजस्थानी पत्रावरुन तसे दिसून येत नाही. महाराजांनी आपले बेत अत्यंत काळजीपूर्वक रीतीने आखले असले पाहिजेत. त्यांच्या भोवती असणाऱ्या रजपूतांना त्यांच्या बेताचा सुगावा लागला असणे शक्य आहे.

फोलादखानाच्या पहारेकरी सैनिकांचे हातही ह्या प्रकरणात गुंतलेले असावेत. शिवाजीमहाराजांच्या दानधर्माचा आणि भेटींचा उल्लेख भीमसेन सक्सेना यांनी केलाच आहे. ह्याचा निश्चितच प्रभाव पडला असला पाहिजे.

पण शिवाजीमहाराज हे फळांच्या मोठ्या पेटाऱ्यांतून बसून निसटले ही कथा कशी पसरली? चौकी-पहाऱ्यावरचे लोक आणि त्यांचे अधिकारी यांना जाब-झडतीपासून वाचवावे यासाठी अशी कथा प्रचलीत झाल्यासारखी दिसते. सन 1666 च्या 3 सप्टेंबरच्या पुढील पत्रावरून या ग्रहाला पुष्टी मिळते. पत्रात म्हटले आहे, दिवसाच्या चार घटका झाल्या असता शिवाजी हा पळाला ही बातमी आली. चौकी-पहाऱ्यावर एक हजार माणसे असूनही असे घडले. तो नक्की केव्हा निघून गेला अन् कोणत्या चौकी-पहाऱ्यांतून गेला हे त्या दिवशी कोणीही सांगू शकले नाही. यानंतर चर्चा झाली आणि असा निष्कर्ष काढण्यात आला की *(तेठा पाछे मनसुबो कर और या ठाहरी छै भागवा की)* तेथे पेटाऱ्यांची ये-जा होती. *(जो वेंकी पट्यारां की आमदरफ्त थी)* शिवाजी हा पेटाऱ्यातून पळाला.

ही घटना घडल्यानंतर पुऱ्या वीस दिवसांनी हे पत्र लिहिले आहे. शिवाजीमहाराज कसे निघून गेले ह्यावर परस्पर विचारविनिमय करून ठरविलेला हा एक तर्क आहे. पण या प्रकरणावरचे सरकारी भाष्य मात्र खरे दिसते. कोणत्याही प्रकरणाचा संपूर्णपणे छडा लावल्याशिवाय हे प्रकरण अर्धवट सोडून देणाऱ्यापैकी औरंगजेब नव्हता. त्याचे सरकारी चरित्र, आलमगीरनामा ह्यात स्पष्ट म्हटले आहे की शिवाजी हा वेषांतर करून निघून गेला. *(तगय्युरे वजे दादे)*

शिवाजी महाराजांचा समकालीन कवी भूषण याने आपल्या हिंदी काव्यातून शिवाजी महाराजांच्या स्तुतीपर कविता लिहिल्या आहेत. त्या कवितांतूनही महाराज हे वेषांतर करून आग्रा येथून निघाले या विधानाला पुष्टी मिळते. संस्कृतमधून रचना करणारा कवी जयराम पिण्डये यानेही असेच विधान सूचित केले आहे. पेटाऱ्यातून महाराज निसटल्याची कथा ही कपोलकल्पित समजून टाकून दिली पाहिजे. तिचा हेतू एकच दिसतो. बेपर्वा अधिकाऱ्यांची खरडपट्टी होऊ नये आणि त्यांना शिक्षा होऊ नये यासाठी ही कथा घडविण्यात आलेली दिसते. रामसिंगावर काही काळ बादशहाची इतराजी झाली होती; पण या प्रकरणात कुणालाही शिक्षा झालेली दिसत नाही.

## परतीचा मार्ग

महाराजांच्या परतीच्या मार्गाबद्दल पुढीलप्रमाणे म्हटले जाते. महाराज हे प्रथम मथुरेला गेले आणि तेथून ते दक्षिणेकडे गेले. त्यांच्या लवाजम्यातील लोकांना *दस्तके* (परवानगी पत्रे-पासपोर्ट) मिळाली होती. त्यांचाच *(दस्तकांचा)* त्यांनी उपयोग करून घेतला. ते आपल्या देशाकडे सरळ मार्गाने आले. ते 12 सप्टेंबर रोजी

देशी पोहोचले.

असे का म्हटले जाते? एका हेराच्या वृत्तांतावर वाजवीपेक्षा जास्त भर दिला जातो म्हणून. जयसिंगाच्या पत्रामुळे हेराचा वृत्तांत विश्वासनीय ठरत नाही. जयसिंगाचे पत्र 27 सप्टेंबरचे आहे. पत्रातील (फारसी शब्द न *रसीदा* म्हणजे पोहोचला नाही. या शब्दाचे *रसीदा* म्हणजे पोहोचला असे चुकीचे भाषांतर झाले आहे.)मजकूर हेराच्या वृत्तांताला विरोधी आहे. म्हणजे महाराज 12 सप्टेंबरपर्यंत देशी परतले नव्हते हे निश्चित.

या ठिकाणी आपल्याला मराठी बखरी या चांगल्या मार्गदर्शक ठरतात. 'जेधे शकावली'त म्हटले आहे की शिवाजीमहाराज हे संभाजीबरोबर सन 1666 च्या 20 नोव्हेंबर रोजी रायगडला पोहोचले. वरील शब्दांनी थोडासा गोंधळ उडाला कारण शिवाजीमहाराजांच्या आगमनानंतर थोड्या काळाने संभाजी राजे हे दक्षिणेत परत आले. 'जेधे शकावली'तील हा गोंधळ 'जेधे करीन्या'तील पुढील वाक्याने दूर झाला. 'राजश्री स्वामी राजगडला मार्गशीर्ष शुद्ध पंचमी (20 नोव्हेंबर 1666) रोजी आले. राजश्री संभाजी राजे यांना मथुरेत विश्वासराव ब्राह्मण यांचेकडे ठेवले होते. विश्वासरावने त्यांना पण आणले.'

शिवाजीमहाराजांना शोधण्यासाठी मोगलांनी कसून प्रयत्न केले. मोगल दरबारच्या बातमीपत्रात, मोगलांनी माळवा आणि दक्षिण या प्रांतांत केलेल्या अनेक धरपकडींचे उल्लेख आहेत. शिवाजीमहाराजांनी जो मार्ग स्वीकारला तो म्हणजे मोगल ठाण्यापासून जितके लांब अंतर राखता येईल तितके अंतर पाहूनच त्यांनी बहुतेक योजला असावा. हा मार्ग पूर्व भारताकडील दिसतो. मराठी बखरकार सभासद आणि मोगलांचा इतिहासकार भीमसेन सक्सेना, हे दोघेही सुचवितात की शिवाजीने घेतलेला मार्ग हा अलाहाबाद, बनारस, गया,गोंडवन असा होता. महाराज हे बनारसला गेले. तेथून ते सध्याच्या मध्य प्रदेशातील सरगुजा जिल्ह्यात गेले असले पाहिजेत. अंबिकापूर (सरगुजा जिल्ह्याचे मुख्य ठिकाण), अमरकंटक, विलासपूर नजिकचे रतनपूर, रायपूर, बस्तर आणि गोवळकांडा या मित्र राज्यांचा प्रदेश हा महाराजांचा मार्ग दिसतो.

महाराजांचा हा मार्ग संकटे आणि धोके यांनी भरला होता. एकाहून अधिक वेळ महाराज हे मोगलांच्या हाती सापडतात की काय अशी परिस्थिती निर्माण झाली होती. इतिहासकार खाफीखान याने त्या काळात सर्वतोमुखी असलेल्या कांही गोष्टी यासंबंधात आपल्या ग्रंथात दिल्या आहेत.

शिवाजीमहाराज राजगडला सुरक्षितपणे आले. मराठ्यांनी हा प्रसंग अतिशय

आनंदाने, व जल्लोषाने साजरा केला, अल्पकाळांतच संभाजीराजेही वडिलांना येऊन मिळाले. शिवाजीमहाराज एकदा राजगडला पोहोचल्यानंतर झालेली चूक दुरुस्त करणे औरंगजेबाला अशक्यच होते. औरंगजेबाने अशी चूक तरी कशी केली? त्याची दोन कारणे संभवतात. एक म्हणजे दक्षिणेतील मोहिमेत त्याला अपयश आल्यामुळे तो गोंधळलेल्या मन:स्थितीत असावा. यात भर म्हणून की काय नेमके त्याच वेळेला इराण हे हिंदुस्थानावर आक्रमण करणार अशी मोठी अफवा त्या काळी पसरली होती.

या गोष्टीला पन्नास वर्षे लोटली. अहमदनगर येथे औरंगजेब हा मृत्यूचे क्षण मोजीत होता. त्याक्षणीसुद्धा शिवाजीमहाराज हे आग्रा येथून सुटका करून घेऊन गेले या घटनेची त्याला आठवण येत होती आणि या घटनेची त्याला खंत वाटत होती. त्याने आपल्या मृत्यूपत्रात म्हटले आहे की, 'आपण क्षणभर गाफीलपणा केला. त्यामुळे शिवाजीला सुटून जाता आले. त्याचे परिणाम म्हणून कायमची डोकेदुखी आपल्यामागे लागली आहे.'

मोगलांच्या दृष्टिकोनातून पाहाता मोगलांची ही चूकच होती ह्यात संशय नाही. शिवाजीमहाराजांचे समाधान करून त्यांना आपल्याकडे मोगल हे वळवू शकले नाहीत ही त्यांची प्रचंड घोडचूक होती. मित्र म्हणून शिवाजीमहाराजांनी आपले स्वत:चे राज्य वाढविले असते खरे पण गोवळकोंडा आणि विजापूर ही राज्ये समाप्त करण्याच्या मोगलांच्या मनसुब्यात महाराजांचा मोगलांना अतिशय उपयोग झाला असता. भारतीय इतिहासातील घटनांना एक वेगळीच कलाटणी मिळाली असती. जे घडले ते असे. महाराजांनी मोगलांवर पुन्हा म्हणून विश्वास ठेवला नाही. मोगल आणि मराठे यांच्या संबंधात फार मोठी दरी निर्माण झाली. पुढे अठराव्या शतकात या घटनेचे अतिशय महत्वाचे परिणाम होणार होते.

महाराज आग्रा येथून सुटले नसते किंवा सुटल्यानंतर पुन्हा पकडले गेले असते तर त्यांचे भवितव्य काय झाले असते याची कल्पना करणे अवघड नाही. महाराजांचा सेनापती नेताजी पालकर ह्याला दग्याने पकडण्यात आले. त्याचे जबरदस्तीने धर्मांतर करण्यात आले. महाराजांचे पुत्र संभाजीराजे ह्यांना पुढे कित्येक वर्षांनी पकडण्यात आले. इतिहासकार साकी मुस्तैदखान हा वरील घटनेच्या वेळी (संभाजी राजाच्या मृत्यूच्या वेळी) औरंगजेबापाशी होता. तो संभाजीराजांचे डोळे काढण्याच्या मोगलांच्या कृत्याचे समर्थन पुढील शब्दांत करतो,[1] ''यापूर्वी त्याने

1. खान, साकी मुस्तैद, मासिरे आलमगिरी

(संभाजी) बादशाही कृपेच्या महत्वाकडे दुर्लक्ष केले होते. प्रथम तो आपल्या वडिलांच्या (शिवाजीमहाराज) बरोबर बादशहाच्या दरबारातून पळून गेला. दुसऱ्या खेपेस तो मरहूम दिलेरखान याच्यापासून पळून गेला. यामुळे त्याच रात्री त्याचे डोळे काढण्यात आले.''

महाराज सुटून गेले त्यावर औरंगजेबाची पहिली प्रतिक्रिया अशी की मोगलांची चाकरी पत्करलेल्या नेताजी पालकरला कैद करण्यात यावे अशी त्याने आज्ञा केली. असे करण्यात त्याचे हेतू काय होते ? एक तर महाराज सुटून गेले याचा त्याला राग आला होता. असे की न जाणो नेताजी हा शिवाजीमहाराजांना जाऊन मिळण्याचा संभव होता, याचीही काळजी औरंगजेबाला होती. नेताजीला आग्रा येथे आणण्यात आले, त्याला मुसलमान करण्यात आले, त्याला मुहम्मद कुलीखान हे नाव देण्यात आले आणि त्याला तीन हजाराची मनसब देण्यात आली. काबूलच्या प्रांतात त्याला तैनात करण्यात आले.

जयसिंगाने कितीही चिवटपणा दाखवला तरी विजापूरच्या मोहिमेत मोगलांना यश मिळत नव्हते. ती मोहीम ते हरतच होते. मोगलांची अब्रू कशीबशी वाचविणारा तह विजापूरशी करण्यात आला. जयसिंगाला परत बोलविण्यात आले. राजपुत्र मुअज्जम याला दक्षिणचा सुभेदार म्हणून नेमण्यात आला. मुअज्जम हा औरंगबादेस सन 1667 च्या मे महिन्यात पोहोचला. जयसिंग आग्रा येथे रवाना झाला. जयसिंग हा वाटेत आजारी पडला. त्याला मधुमेहाचा विकार होता. तो ब्ऱ्हाणपूर येथे सन 28 ऑगस्ट 1667 रोजी मरण पावला. त्याचा मृत्यू औरंगजेबाने घडवून आणला अशी जी अफवा पसरली तीत काही सत्य नाही. एवढे मात्र खरे की त्याच्या मृत्यूमुळे औरंगजेबाने सुटकेचा निश्वास टाकला असला पाहिजे. मोगल राज्यकारभारात रजपूतांचा जो प्रभाव होता त्या गोष्टीचा औरंगजेबाला मनस्वी तिटकारा होता. जयसिंग आणि जोधपूरचा जसवंतसिंग, ह्या दोन व्यक्ती त्या काळात रजपूतांच्या मध्ये अगदी प्रमुख स्थानी होत्या. जयसिंगाचा मुलगा रामसिंग याला जयपूरचे राज्य देण्यात आले खरे पण त्याला आसामच्या मोहिमेवर पाठविण्यात आले. जयपूरच्या राजघराण्याला हे जे ग्रहण लागले त्यातून त्याची सुटका झाली ती औरंगजेबाच्या मृत्यूनंतरच. जोधपूरमधेही अशाच कलाटणी देणाऱ्या घटना घडणार होत्या पण त्या दहा वर्षांनी, जसवंतसिंगाच्या मृत्यूनंतर.

इराणच्या राजाचा मृत्यू झाल्यामुळे हिंदुस्थानावर इराणच्या आक्रमणाची भीती नाहीशी झाली. पण वायव्य प्रांतातील अफगाणांच्या टोळ्यात अशांतता खदखदत होती. त्या प्रांतातील परिस्थिती म्हणजे मोगलांच्या पुढे उभा राहाणारा एक मोठा

धोकाच होता. पूर्वेकडे मोगलांनी आसामात आक्रमण केले होते. ते आक्रमण थोपवून धरण्यात आले. अशा परिस्थितीत विजापूरविरुद्ध नवीन मोहीम काढणे किंवा शिवाजीमहाराजांविरुद्ध लढा सुरू करणे, या दोन्ही गोष्टी औरंगजेबाला परवडणाऱ्या नव्हत्या. शांतताप्रिय आणि सौम्य मुअज्जम याची दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक ही याच धोरणाची दिशा दाखविते.

महाराजांनाही शांतता हवी होती. त्यांचे राज्यच लहान झाले. त्यांना आपली सत्ता स्थिर करावयाची होती आणि शक्य असल्यास विजापूर आणि इतर शेजारील राज्यांबरोबर अमलात आणावयाची नवीन धोरणे आखावयाची होती. मोगलांना तर संशय येऊ द्यावयाचा नव्हता, त्यामुळे आपण मन:पूर्वक मोगलांची चाकरी करू इच्छितो आणि त्यांची कृपा आपल्याला हवीच आहे, अशी त्यांना आपली प्रतिमा उभी करावयाची होती. मोगल आणि मराठे ह्या दोघांनीही महाराजांच्या आग्रा येथून सुटकेच्या प्रकरणाला फारसे महत्व दिले नाही. समकालीन कागदपत्रांत महाराज कसे आणि कोणत्या प्रकारे आग्रा येथून सुटले आणि दक्षिणेकडे कसे आले याबद्दल विशेष माहिती मिळत नाही, याचे हेही एक कारण आहेच.

## शांतता

सन 1667 च्या 6 मेच्या फारसी बातमीपत्रात म्हटले आहे, ''बादशहाने आपल्या मुख्य वजीराला पुढीलप्रमाणे आज्ञा केली, ''तुम्ही शिवाजीच्या वकीलाला बोलवा, त्याचे समाधान करा, त्याला आपल्या धन्याकडे (शिवाजी) पाठवा. मात्र त्याने (वकीलाने) दोन महिन्यात परत यावे. त्याने आपल्या धन्याला (शिवाजीला) आमची पुढील आज्ञा कळवावी.

1. बादशहाने तुमचे अपराध माफ केले आहेत.
2. तुमचा मुलगा (संभाजी) याची नेमणूक बादशाही मनसबदार म्हणून करण्यात आली आहे.
3. विजापूरच्या राज्यातील तुम्हाला जितका मुलुख घेता येईल तितका तुम्ही घ्यावा.
4. किंवा तुम्ही आपल्या जागी स्थिर रहावे आणि बादशहाच्या मुलाचे (मुअज्जम) आज्ञेचे पालन करावे.''

सन 1667 च्या 3 ऑक्टोबरचे हे बातमीपत्र पहा, बादशहाकडे राजपुत्र मुहम्मद मुअज्जम याचे पुढील अर्थाचे पत्र आले, शिवाजीने मला एक पत्र लिहिले आहे, पत्रात तो म्हणतो 'मी बादशहाचा पिढीजात दास आहे, पण त्याला तनखा

जहागीर मिळाली नाही. आता विनंती ही की बादशहाने या दासाच्या अपराधांची क्षमा करावी. माझ्या मुलाची मनसब बहाल करावी. आणि त्याला एक जहागीर नेमून द्यावी. आज्ञा होईल तेथे मी जातीने चाकरी बजावण्यास तयार आहे.'

त्याप्रमाणे औरंगजेबाने योग्य त्या सूचना दिल्या. सूचनांत म्हटले होते, 'संभाजीची मनसब बहाल करण्याच्या आज्ञा पाठवून द्या.'

जे किल्ले आणि मुलुख आम्हाला देण्यात आले आहे तेथे त्याला जहागीर द्या. त्याने यावे आणि राजपुत्राची (मुअज्जम) चाकरी बजावावी. छोट्या संभाजीला वऱ्हाड आणि इतर ठिकाणी जहागिरी मिळताच तो आपली पथके घेऊन मोगलांची चाकरी बजावण्यासाठी सुभेदाराचे मुख्य ठिकाण, औरंगाबाद येथे आला. सन 1667 च्या 4 नोव्हेंबर रोजी त्याने राजपुत्र मुअज्जम याची भेट घेतली. काय चमत्कारिक परिस्थिती पहा ? एक वर्षापूर्वी हाच संभाजी आणि याचे वडील यांना मोगलांचा पाठलाग टाळून वेषांतर करून दक्षिणेस पोचावे लागले होते. आणि आता, ही घटना म्हणजे एक अतिशय क्षुल्लक बाब असावी असे दाखवित सर्वजण ती विसरण्याचा दृढ निश्चय केल्यासारखे वागत होते.

संभाजी राजे फक्त दहा वर्षांचे होते. त्यामुळे राजगडला परत जाण्याची परवानगी देण्यात आली. मोगलांना आपल्याबद्दल कोणत्याही प्रकारचा संशयच राहू नये याबद्दल शिवाजीमहाराज किती प्रयत्नशील होते याची कल्पना राजपुत्र मुअज्जम याने सन 1667 च्या 9 मार्च रोजी त्यांना (महाराजांना) लिहिलेल्या पुढील पत्रावरून दिसून येईल. मुअज्जम म्हणतो, ''तुमची उत्कट इच्छा होती त्याप्रमाणे तुम्हाला राजा ही पदवी देऊन कृपाळू बादशहाने तुमचा माथा उन्नत केला आहे.''

या पत्रातील तुमची 'उत्कट इच्छा' हे शब्द अतिशय सूचक आहेत. आपल्याला ही पदवी द्यावी अशी महाराजांनी विनंती केली असे कुणालाही वाटू शकेल.

विजापूर राज्यातील जितका भाग बळकावणे शक्य आहे तितका ताब्यात घ्या अशी मोकळीक मोगलांच्या कडूनच महाराजांना मिळाली. त्यांना हव्या असलेल्या या प्रदेशाला विजापूर बालघाट म्हणत. त्यात सध्याच्या सातारा, सांगली आणि कोल्हापूर या जिल्ह्यांचा समावेश होत असे. या प्रदेशासाठी महाराजांना योग्य संधीची वाट पहावी लागली. त्यांची ताबडतोबीची काळजी होती विजापूरचा हल्ला थोपवून धरणे आणि कोकणला चिकटून रहाणे याची. विजापूरचा सेनापती रूस्तमे जमान याने सन 1666 मध्ये फोंडा आणि इतर स्थळे जिंकून घेतली होती. पण त्याने रांगण्याचा किल्ला महाराजांना परत केला होता. विजापूर राज्याने अबुल मुहम्मद

आणि इतर अधिकारी यांच्या द्वारे कोकण जिंकून घेण्याचे प्रयत्न केले होते ते प्रयत्न यशस्वी झाले नाहीत. महाराजांनी आपले सगळे प्रदेश सोडवून घेतले. फक्त फोंडा आणि जांबवली पंचमहाल हा भाग त्यांच्याकडे आला नाही.

शिवाजीमहाराजांचा प्रदेश आणि पोर्तुगीजांचा दक्षिण कोकणातील प्रदेश हे आता समांतर झाले होते.

सन 1666 च्या 17 नोव्हेंबर रोजी पोर्तुगीजांनी जयसिंगाशी एक तह केला होता. त्या तहातील एक कलम पुढीलप्रमाणे होते. ''मोगल सम्राटविरुद्ध बंड करणाऱ्या माणसांना पोर्तुगीजांनी आपल्या राज्यात थारा देऊ नये. अशा माणसांना तो पोर्तुगालच्या राजाच्या विरुद्ध बंडखोर आहे असे समजावे. पोर्तुगीजांचे हात मोगलांपाशी किती गुंतले होते हे शिवाजीमहाराजांच्या नजरेतून सुटणे शक्य नव्हते. पण त्याने पोर्तुगीजांच्या प्रदेशावर जो हल्ला चढविला त्याचे आकस्मिक कारण पुढील परिच्छेदावरून स्पष्ट होईल.''

''दक्षिण कोकणचे देसाई हे आपले प्रदेश सोडून पोर्तुगीज हद्दीत पळून गेले होते. त्यानी गोव्याला आपला तळ बनविला होता. तेथून ते महाराजांच्या राज्यात आक्रमणे करीत. लखम सावंत, केशव नाईक आणि केशव प्रभू हे ते देसाई. त्यांना पोर्तुगीजांची गुप्तपणे मदत मिळत असे. ह्या देसायांपैकी लखम सावंत आणि त्याचा पुतण्या कुडाळचा नारबा सांवत हे पोर्तुगीजाच्या बारदेशांत राहात. या शरणार्थ्यांना त्या प्रदेशांतून हुसकावून लावणे व पोर्तुगीजांना धडा शिकवणे या हेतूंनी महाराजांनी सन 1667 च्या नोव्हेंबरमध्ये गोव्यावर अकस्मात स्वारी केली.''

डच साधने पुढील माहिती देतात: शिवाजीमहाराज रांगण्याला 8 नोव्हेंबर रोजी आले. रांगण्याच्या परिसरात ते 17 नोव्हेंबरपर्यंत होते. त्यांच्याबरोबर 5 हजार पायदळ, आणि 1 हजार घोडेस्वार होते. 20 नोव्हेंबर रोजी त्यांनी बारदेश मुलखात एकाएकी आक्रमण केले. त्यादिवशी त्यांनी तीन खेडी लुटली. पोर्तुगीजांनी प्रतिकार करण्यापूर्वीच्या तीन दिवसांत महाराजांनी सगळा बारदेश पालथा घातला. महाराजांचे मुख्य हेतू म्हणजे प्रदेश लुटणे आणि पोर्तुगीजांच्या संरक्षणाखाली असलेल्या बंडखोर देसायांना पकडून घेऊन जाणे हे होते. ते देसाई हे यापूर्वीच बारदेशातून गोव्याकडे पळून गेले होते. पण महाराजांनी पोर्तुगीजांच्या इलाख्यात जो धुमाकूळ घातला तो लक्षात राहील असा होता. ही शिक्षा कडक होती आणि तडकाफडकी होती. महाराजांच्या सैन्याने लोकांचा अनविन्त छळ केला अशा विलक्षण अफवा त्या काळी पसरल्या होत्या. काही आधुनिक इतिहासकारांनी अशीही मते मांडली आहेत की महाराजांचे हे युद्ध म्हणजे एक धार्मिक संघर्ष होय.

पण पिसुर्लेंकर आणि इतर इतिहासकार यांनी विस्तृत संशोधन करून वरील विधाने खोडून काढली आहेत. हे युद्ध म्हणजे निव्वळ राजकीय लढा होय. पोर्तुगीजांना चांगलाच धडा मिळाला.

23 नोव्हेंबर रोजी महाराजांनी पोर्तुगीजांचा प्रदेश सोडून प्रयाण केले. तहाची बोलणी सुरू झाली. सन 1667 च्या 12 डिसेंबर रोजी मराठ्यांनी तहनाम्यावर सही केली.

वरील तहाचा मराठी आणि पोर्तुगीज भाषेतील मजकूर गोव्यातील दप्तरखान्यात सुरक्षित आहे. या तहातील काही कलमे अशी-कैदी, गुरेढोरे आणि मालमत्ता ही बंधमुक्त करणे. देसायांच्या चळवळींवर आम्ही बारीक लक्ष ठेवू अशी पोर्तुगीजांनी ग्वाही दिली.

गोव्यांतील सप्तकोटीश्वराचे जुने देवालय हे दिवाडी ह्या गावी होते. ते इ.स. 1540 मध्ये पोर्तुगीजांनी नष्ट केले. तेच देऊळ हिंदूंनी जवळच्या प्रदेशांत पुन्हा इ.स. 1558 मध्ये बांधून काढले. हे देऊळ भटग्राममध्ये नार्वे ह्या गावी आहे. हे देऊळ मोडकळीस आले होते. नोव्हेंबर महिन्यात शिवाजी महाराजांनी त्या देवळाचा जीर्णोद्धार केला.

सर्व धर्मांबद्दल आणि सर्व साधुसंतांबद्दल शिवाजीमहाराजांना अतिशय आदर वाटत असे ही गोष्ट जगजाहीर आहे. धार्मिक क्षेत्रांतील त्यांची कामगिरी म्हणजे त्यांनी देवळे, मशिदी, मठ, दर्गे इत्यादिंना सहाय्य केले. इतकेच करून ते थांबले नाहीत. नवीन देवळे बांधणे, जीर्णोद्धार करणे आणि नष्ट केलेल्या देवाळांची पुनर्बांधणी करणे असेही त्यांचे कार्यक्रम असत. अविचारी विध्वंसाची त्यांना मोठी चीड होती. पण त्यांच्या वागणुकीत सूडबुद्धीची भावना नव्हती.

या सुमारास शिवाजीमहाराजांनी फ्रेंच लोकांना आपल्या (महाराजांच्या) राज्यात व्यापार करण्याची परवानगी दिली. त्यांनी कोकणात राजापूर येथे एक वखार उघडली ही गोष्ट रासोआ मार्टीन याच्या डायरीत सुचविण्यात आली आहे.[1] मार्टीन हा सुरतेला जाण्याच्या वाटेवर आला. तेथे त्याला फ्रेंच लोकांनी सन 1669 च्या 17 जानेवारी रोजी कळविले की, 'आम्ही (फेअस आणि जेबुरियां) राजापूरला गेलो होतो. तेथे आम्ही राजा शिवाजी यांची भेट घेतली. त्याने आमचे चांगले स्वागत केले. आमच्या राज्यात तुम्ही व्यापार करा अशी परवानगी दिली.'

ब्रिटिश हे मुंबईत सन 1665 पासून स्थिर झाले होते. महाराजांनी फ्रेंचांना

---

1. हटाळकर, *फ्रेंच-मराठे संबंध,* (इंग्रजी)

सवलती दिल्या, हे त्यांच्या लक्षात आले. इंग्रजांची सत्ता फक्त मुंबईच्या बेटापुरती मर्यादित होती. साष्टीचे बेट (ठाणे आणि जवळचा भाग) हे पोर्तुगीजांच्या हाताखाली होते. मुंबईकर ब्रिटिशांचा देशाच्या मुख्य प्रदेशाशी संपर्क नव्हता. शिवाजीच्या राज्यातील पेण गाव आपल्याला मिळावे ह्यासाठी त्यांनी प्रयत्न केले. त्यांची भाबडी समजूत पुढील नोंदीवरून दिसते. 'हे गाव शिवाजीच्या प्रदेशात आहे हे खरे आहे. पण शिवाजी हा औरंगजेबाचा मांडलीकच झाला आहे. त्यामुळे तो बादशहा (औरंगजेब) जी आज्ञा करील ती याला पाळावी लागणारच.' ब्रिटिशांच्या प्रयत्नांना यश मिळाले नाही.

कोकणातील जंजिऱ्याच्या शिद्यांची शक्ती नष्ट करावी हा महाराजांचा कायमचा हेतू होता. किनारपट्टीवर शिद्दी म्हणजे त्यांच्या सत्तेला आव्हानच होते. प्रथम अहमदनगरचे आणि नंतर विजापूरचे अधिकारी म्हणून ते जंजिऱ्याला चिकटून राहिले. आता ते (शिद्दी) पाठिंब्यांसाठी मोगलांकडे धाव घेत होते. शिद्यांना पाठिंबा देण्यासाठी ब्रिटिश आणि पोर्तुगीज जवळपास होतेच. ही झाली वरील कारणे. याच्या जोडीला महाराजांचे विजापूर आणि मोगल यांच्याशी सतत चाललेले संघर्ष. या सर्व कारणांमुळे जंजिऱ्याचे शिद्दी हे सर्वनाशातून बचावले. महाराजांचा आणि मोगलांचा जो तह झाला त्यास अनुसरून कोकणावरील संपूर्ण ताबा मान्य करण्यात आला होता. त्या दृष्टीने पाहाता जंजिरा हे त्यांच्या अधिकारक्षेत्रात येत होते. महाराजांनी जंजिऱ्याला वेढा घातला. सन 1669 च्या ऑक्टोबरमध्ये ब्रिटिश लिहितात,[1] "शिवाजी राजांनी शिद्याला मोठ्या पेचात पकडले आहे. शिवाजीराजा हल्ला करुन किल्ला जिंकून घेऊ शकत नाही. मोगलांनी त्याला आपली सैन्ये आणि वेढा उठवून घेण्याची आज्ञा केली आहे. पण तो (शिवाजी) त्याची पर्वा करीत नाही. म्हणून शिद्याने शेवटपर्यंत वेढा लढविण्याचे ठरविले आहे. अगदी निरूपाय झाला तर तो जंजिऱ्याचा किल्ला मोगलांना देऊन टाकील. मोगलांचे सैन्य कल्याणजवळ असून त्याचे नेतृत्व लोदीखान यांजकडे आहे."

जंजिऱ्याचा किल्ला स्वत:साठी घ्यावा असा ब्रिटिशांनीही विचार चालविला. शिद्दी शिवाजीमहाराजांचा प्रतिकार करीतच होता, आणि पोर्तुगीज त्याला सक्रीय मदत करीत होते. सन 1670 च्या 10 फेब्रुवारीच्या तहाप्रमाणे पोर्तुगीजांनी महाराज आणि शिद्दी यांच्यात मध्यस्थी करण्याची तयारीही दाखविली. आपल्या प्रदेशांतील हा हस्तक्षेप महाराज कसा सहन करतील. शिवाजी महाराजांची आता एका

---

1. *इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी,* पृ. 135

गोष्टीबद्दल पक्की खात्री झाली होती: महाराजांच्या चळवळींना पायबंद घालण्याचा मोगलांनी पक्का निश्चय केला होता. आणि तो कुठे, कोणत्याही दिशेने त्यांना योग्य आणि आवश्यक वाटेल तेव्हा आणि तेथे.

जंजिऱ्याचा वेढा चालू होता त्याच वेळी मोगल आणि मराठे यांच्या युद्धाला तोंड लागले. हे युद्ध सदतीस वर्षे चालणार होते. सन 1707 मध्ये औरंगजेबाचा मृत्यू होईपर्यंत हे युद्ध चालले.

# 6

# मोगलांशी युद्ध

**इतिहासकार** भीमसेन सक्सेनाच्या मते मोगल आणि मराठे यांच्यातील संबंध तुटले याचे कारण म्हणजे औरंगजेबाने संभाजीच्या जहागिरीचे महाल (तालुके) जप्त केले; आणि मराठा पथके औरंगाबाद सोडून गेली हे होय. पण शिवाजीचा चरित्रकार सभासद हा दुसरेच कारण देतो. एक तर औरंगजेबाचा स्वभाव संशयी होता. दुसरे असे की औरंगाबादेतील मराठा पथकांतील माणसे आणि अधिकारी यांना नि:शस्त्र करावे आणि कैद करावे असा त्याने प्रयत्न चालविला होता. सभासदाच्या मते संघर्षाला हे कारण घडले.

'जेधे शकावली'तील नोंदी पाहाता असे दिसते की सन 1669 च्या 17 ऑगस्टपासून 15 सप्टेंबरपर्यंत औरंगजेबाने बनारसमध्ये धुमाकूळ घातला. त्याने देवळे फोडली. 14 डिसेंबरपासून 1670 च्या 11 जानेवारीपर्यंतच्या एका महिन्यात मोगल आणि शिवाजी यांच्यातील शांतता संपुष्टात आली. प्रतापराव आणि आनंदराव हे आपली पथके घेऊन औरंगाबाद येथे राजपुत्र मुअज्जम याच्यापाशी होते. ते राजगड येथे परत आले.

सुरत येथील ब्रिटिश प्रेसिडेंट गॅरी याच्या सन 1670 च्या 23 जानेवारीच्या पत्रात औरंगजेबाच्या धोरणाकडे लक्ष वेधण्यात आले आहे. पत्रात म्हटले आहे: ''बंडखोर शिवाजी हा पुन्हा एकदा औरंगशहा (औरंगजेब) च्या विरुद्ध बंड करून उठला आहे. औरंगजेबाने आपल्या धर्माचा भलताच अभिमान दाखवून हिंदुंची अनेक देवळे पाडून टाकली आहेत आणि अनेक हिंदुंना मुसलमान होण्यास भाग पाडले आहे.'' देवळे पाडावीत अशा अर्थाचा सामान्य हुकूम औरंगजेबाने सन 1669 च्या एप्रिल महिन्यात काढला. काशीच्या विश्वनाथाचे देऊळ हे त्याच वर्षीच्या सप्टेंबर महिन्यात जमीनदोस्त करण्यात आले.

धार्मिक बाबतीत कट्टर असलेल्या लोकांचा पाठिंबा मिळवून आपली सत्ता दृढ करण्याचे औरंगजेबाचे धोरण अत्यंत अदूरदर्शीपणाचे होते. त्याच्या प्रजेपैकी बहुसंख्येने प्रचंड असलेल्या लोकांना अतिशय दुखविणारे असे ते धोरण होते.

धार्मिक वृत्तीचे आणि उदार प्रवृत्तीचे असलेले शिवाजी महाराज यांना तर त्यामुळे कमालीचा मनस्ताप झाला.

ज्या काळात शांतता पाळावी लागत होती त्याच काळात शिवाजीमहाराज हे आपली शक्ती गाजावाजा न करता वाढवीत होते. किल्ल्यांची डागडुजी करण्यात आली आणि ते मजबूत करण्यात आले. किल्ल्यांमधून प्रबळ शिबंदी ठेवण्यात आली. सैन्याला लढण्यासाठी म्हणून सज्ज ठेवण्यात आले. महाराजांचे सैन्य खऱ्या अर्थाने राष्ट्रीय सैन्य होते. त्यात परदेशी नव्हते, भाडोत्री नव्हते. दारूगोळा, बंदुका, तोफा, इत्यादी शस्त्रांनी आपल्या सैन्याला सज्ज करण्यासाठी महाराजांनी जवळच्या आणि लांबच्या प्रदेशात प्रयत्न करून शस्त्रे पैदा केली. गोवळकोंड्याचे राज्य हे मराठ्यांच्या निकट आले होते. विजापूरने तर कोंकणवरचा ताबा कायमचा सोडून दिला होता.

मोगलांवर हल्ला करण्यासाठी महाराजांना यापेक्षा चांगली संधी चालून येणे शक्य नव्हते. दक्षिणचा सुभेदार राजपुत्र मुअज्जम हा काही लढवय्या नव्हता. तो शांतताप्रिय होता. त्या काळी दक्षिणेत कसलेले असे मोगल सेनापती नव्हते. फक्त खानदेशाचा सुभेदार दाऊदखान कुरेशी हा तेवढा तडफादार आणि कामसू होता. मोगलांवरील हा मारा त्यांना अगदी अनपेक्षित होता. त्याचवेळी औरंगजेबाला वायव्य प्रांतात आणि मथुरेजवळील जाटांच्या मुलखात बंडाळीला तोंड द्यावे लागत होते.

इ.स. 1670 मध्ये शिवाजीमहाराजांनी मोगलांच्यावर अचानक हल्ले चढविले. या हल्ल्याच्या तीव्रतेने मोगल स्तिमित झाले, दिङ्मूढ झाले. महाराजांचा पहिला हेतू मोगलांना स्वराज्यातून हाकलून लावणे हा होता. पुरंदरच्या तहाने महाराजांना 23 किल्ले आणि 4 लाख होन म्हणजे सुमारे 16 लाख उत्पन्नाचा मुलूख मोगलांना द्यावा लागला होता हे पुन्हा लक्षात घेणे भाग आहे.

किल्ल्यांवर, दऱ्याखोऱ्यांतून आणि शहराशहरांतून, जेथे मोगल सापडले तेथे तेथे महाराज त्यांच्यावर हल्ले करीतच गेले. या संघर्षाला मोठी तीव्र धार आली. महाराज किल्ल्यामागून किल्ले जिंकून घेत चालले होते. काही किल्ले घेताना मोठी रणधुमाळी झाली. एक अतिशय गाजलेली म्हणजे सन 1670 च्या 4 फेब्रुवारी रोजी मराठ्यांनी पुण्याजवळील सिंहगड घेतला त्याची ही स्फूर्तिदायक कथा आहे. किल्ल्यावर हल्ला चढवला गेला तो सुप्रसिद्ध मराठा योद्धा तानाजी मालुसरे याच्या नेतृत्वाखाली. किल्ल्याचा रजपूत किल्लेदार उदयभान यानेही अतिशय निकराने वेढा लढविला. हे दोघे योद्धे (तानाजी मालुसरे व उदयभान) परस्परांत द्वंद्वयुद्ध खेळले.

त्यात ते दोघेही ठार झाले. किल्ला मराठ्यांच्या ताब्यात आला. तानाजीसारखा शूर योद्धा खर्ची पडला याचे महाराजांना अपार दु:ख झाले. असे म्हणतात की ते शोकग्रस्त होऊन म्हणाले, 'मी किल्ला तर मिळवला पण एक सिंह गमावला.'

असाच बळकट किल्ला पुरंदर, हा सन 1670 च्या 8 मार्च रोजी मराठ्यांच्या ताब्यात आला. मोगलांचा किल्लेदार रजिउद्दीन याला कैद करण्यात आले. लोहगडच्या किल्ल्यावर मराठे तट चढून गेले; आणि त्यांनी तो जिंकून घेतला. तीच गोष्ट रोहिड्याच्या किल्ल्याची.

मोगलांमध्ये विलक्षण गोंधळ उडाला होता. दक्षिण सुभ्याच्या प्रत्येक भागात मराठे लढत होते. त्या काळचे मोगलांचे *अखबार* (बातम्या देणारी पत्रे) अशा वृत्तांतांनी भरले आहे. उदा. सन 1670 च्या 24 जानेवारीचे हे बातमीपत्र पहा: ''शिवाजीची सैन्ये वऱ्हाडचा प्रांत लुटीत आहेत. या बादशाही मुलखांतून त्यांनी 20 लाख रुपये गोळा केले आहेत.''

औशाचा किल्लेदार (उस्मानाबाद जिल्हा-आता लातूर जिल्हा मराठवाडा) बरखुर्दार खान याने लिहिले, ''शिवाजीचे 20 हजाराचे सैन्य या प्रदेशात आले आहे. मराठे हा प्रदेश लुटीत आहेत. आणि लूट गोळा करीत आहेत. त्यांनी किल्ल्यापासून दोन कोसावर आपला तळ दिला आहे. शिवाजीने माझी जहागिरी लुटली आहे. मला उपजीविकेचे साधन राहिले नाही. मला काही द्रव्यसहाय्य करण्यात यावे.'' यावर बादशहा म्हणाले,'मराठ्यांनी आपल्याला लुटले हे कारण सांगून अशी अनेक माणसे सहाय्य मागू लागतील. त्यांची गाऱ्हाणी दूर करणे कसे शक्य आहे?'

माहुलीचा किल्ला (ठाणे जिल्हा) तेथील शूर मोगल किल्लेदार मनोहरदास गोंड याने मोठ्या शर्थीने रक्षिला. मराठ्यांना परतावे लागले. परंतु किल्ल्यात शस्त्रे, दारूगोळा आणि रसद यांची वाण आहे याची तीव्र जाणीव मनोहरदासला होती. त्याने किल्लेदारीचा राजीनामा दिला. मनोहरदासने मोगल सेनापती दाऊदखान कुरेशी यास म्हटले, 'किल्ल्यात पुरेशी शिबंदी (माणसे) नाही... शस्त्रे आणि दारूगोळाही पुरेसा नाही. शत्रूंची संख्या अधिक आहे, असे असूनही मी प्रयत्नांची शिकस्त करून किल्ल्याचे रक्षण केले. आता तसेच रक्षण करीत राहाणे हे माझ्या शक्तीच्या बाहेर आहे. मी माझ्या अब्रूचे रक्षण केले तेच माझे मोठे भांडवल होय.'

मनोहरदासाने आपले विचार बदलावे म्हणून दाऊदखानाने कसोशीने प्रयत्न केला, पण काही उपयोग झाला नाही. निरुपाय होऊन दाऊदखानाने त्याच्या जागेवर किल्लेदार म्हणून अल्लवर्दीखान या अधिकाऱ्याची तात्पुरती नेमणूक केली. किल्ल्यांतील

शिबंदी 200 सैनिकांची वाढ करण्यात आली. दाऊदखान हा जुन्नरला परतला. (जुन्नर मुक्कामी समकालीन इतिहासकार भीमसेन सक्सेना याला यावेळी दाऊदखानाच्या हाताखाली नोकरी मिळाली.)

मराठे या संधीची वाटच पाहात होते. दाऊदखानाची पाठ फिरताच शिवाजीमहाराजांनी माहुलीवर हल्ला चढविला. वेढा लढविताना अल्लवर्दीखान हा मारला गेला. माहुली म्हणजे कोकणातील महत्वाचा किल्ला. सन 1670 च्या 15 जून रोजी तो मराठ्यांच्या ताब्यात आला.

यापूर्वीच मराठ्यांनी कल्याण आणि भिवंडी ही स्थळे जिंकून घेतली होती. तेथील अधिकारी उजबेकखान हा मारला गेला. दुसरा मोगल अधिकारी लोदीखान याला जबर जखमा झाल्या. तो त्या प्रदेशांतून पळाला. भीमसेन लिहितो की अनेक मोगल अधिकारी अत्यंत दुर्दशेच्या अवस्थेत औरंगाबादेस येऊन पोहोचले. त्यानंतर लवकरच माथेरानजवळील प्रभावळगडचा किल्ला मराठ्यांनी जिंकून घेतला. त्याच्याजवळ असलेला कर्नाळ्याचा किल्ला सन 1670 च्या 23 जून रोजी मराठ्यांच्या हाती पडला. जून अखेरपर्यंत मराठ्यांच्या हाती पडलेले किल्ले पुढीलप्रमाणे—सिंहगड - 4 फेब्रुवारी, पुरंदर - 8 मार्च, कल्याण -- 15 मार्च, लोहगड - 13 मे, माहुली - 16 जून, कर्नाळा - 22 जून, आणि रोहिडा - 24 जून.

## मुअज्जम आणि दिलेरखान यांचे वितुष्ट

या सुमारास दिलेरखान हा गोंडांच्या मुलखात मोहिमेवर होता. मराठ्यांच्या विरुद्ध मोहीम चालविण्यासाठी तो दक्षिणेत आला. राजपुत्र मुअज्जम व त्याचा सल्लागार महाराजा जसवंतसिंग यांचे आणि त्याचे संबंध व्यवस्थित होते. पण ते जिव्हाळ्याचे नव्हते. लवकरच त्यांच्यात वितुष्ट निर्माण झाले. दिलेरखानाला पळ काढावा लागला. मुअज्जम आणि जसवंतसिंग यांनी त्याचा पाठलाग सुरू केला. औरंगजेबाने दिलेरखानास गुजरातेत पाठविले. राजपुत्र मुअज्जम यांस त्याने परत जाण्याची आज्ञा केली. त्यानंतर थोड्याच अवधित जसवंतसिंगाचीही बदली करण्यात आली. या प्रकरणातील आश्चर्याची गोष्ट म्हणजे, दिलेरखानाच्या पाठलागात आपल्याला मदत करावी म्हणून राजपुत्र मुअज्जम याने शिवाजीमहाराजांना आवर्जून सांगितले. हे आवाहन म्हणजे महाराजांना पकडण्यासाठी रचलेला व्यूह असण्याची सहज शक्यता होती. महाराजांनी त्यात प्रवेश करण्याचे शहाणपणाने नाकारले.

सन 1670 च्या जानेवारी ते सप्टेंबरपर्यंत मोगलांचे सरकार हे पक्षाघात

झाल्याप्रमाणे जवळ जवळ निष्क्रीय झाले होते. यात आणखी एका धक्कादायक बातमीची भर पडली. शिवाजी महाराजांनी सुरतेवर आणखी एक प्राणांतिक आघात केला होता.

या मोहिमेसाठी शिवाजीमहाराजांनी दहा हजार घोडेस्वार, आणि दहा हजार पायदळ असे सैन्य आपल्याबरोबर घेतले होते. त्यांच्याबरोबर प्रतापराव गुजर, पेशवे मोरोपंत आणि इतर प्रसिद्ध सेनापती आणि अधिकारी होते. महाराज हे कल्याणहून निघाले. त्यांनी सुरतेवर पहिली स्वारी केली त्यावेळी ज्या मार्गाने ते गेले त्याच मार्गाने ते आताही गेले. हा मार्ग म्हणजे सध्याच्या ठाणे, नाशिक, आणि डांग या जिल्ह्यांतून जात होता. सन 1670 च्या 3 ऑक्टोबर रोजी महाराज हे सुरत शहराच्या तटबंदीपाशी आले. शहरातील मोगलांची शिबंदी ही किल्ल्यावरील तोफांच्या आश्रयाला धावली.

शिवाजीवरील *इंग्रजी रेकॉर्डमध्ये* म्हटले आहे [1] मराठ्यांनी सगळ्या शहराचा ताबा घेतला. तार्तार लोक (मध्य आशियाचे रहिवासी) आपल्या वाड्याचे संरक्षण करण्यास असमर्थ ठरले.

त्यांनी आपल्या राजाला रात्रीच्या वेळी किल्ल्यात नेले. मागे राहिलेले सगळे वाडे महाराजांच्या हातात आले. त्या वाड्यातून त्यांना प्रचंड खजिने मिळाले. सोने, चांदी, मूल्यवान थाळ्या, सोन्याचा पलंग आणि इतर मूल्यवान सामान (कपाटे, बैठकी वगैरे) असे त्यांना मिळाले. या अवधीत शत्रूंनी (मराठ्यांनी) शहरातील मोठमोठी घरे संथपणे अक्षरश: धुवून काढली. अशा घरातून त्यांना प्रचंड खजिने आणि मूल्यवान वस्तू मिळाल्या. त्यांनी अनेक ठिकाणी आगी लावल्या आणि जवळ जवळ निम्मे शहर जाळून नष्ट केले.

तिसऱ्या दिवशी महाराज सुरतेहून निघाले. त्यांनी सुरतेहून आपल्याबरोबर घेतलेल्या संपत्तीचे मूल्य 50 लाख रूपयांच्या वर होते. आपण सुरतेवर का हल्ला केला त्याचे स्पष्टीकरण महाराजांनी सुरतेचा प्रशासक (गव्हर्नर) आणि प्रमुख नागरिक यांना लिहिलेल्या पत्रात पुढीलप्रमाणे केले आहे, [2] "मी तिसऱ्यांदा, आणि ही शेवटची वेळ आहे, मागणी करतो की, तुमच्या राज्यव्यवस्थेखाली येणाऱ्या उत्पन्नाचा चौथाईचा भाग मिळाला पाहिजे. तुमच्या बादशहाच्या मुळे मला माझी प्रजा आणि देश यांच्या संरक्षणासाठी सैन्य ठेवावे लागत आहे, आणि म्हणून त्या

---

1. सरकार, *शिवाजी,* पृ. 173
2. सरकार, *शिवाजी,* पृ. 187

सैन्याचा खर्च बादशहाच्या प्रजेनेच दिला पाहिजे.'' ह्या शेवटच्या वाक्यावरून शिवाजीमहाराजांच्या हेतूची आणि उद्दिष्टांची कल्पना यावी.

सुरतेच्या बातमीने मोगलांना फार मोठा धक्का बसला. दक्षिणेचा सुभेदार ह्या नात्याने राजपुत्र मुअज्जम याने खानदेशाचा सुभेदार दाउदखान कुरेशी यास शिवाजी महाराजांची वाट ताबडतोब अडविण्याची आज्ञा केली.

मोगलांच्या काळात खानदेशाच्या सुभ्यात बागलाण ह्या नावाचा जिल्हा होता. त्यापैकी आज डांग जिल्हा हा गुजराथ राज्यात गेला आहे, आणि सटाणा, कळवण, सुरगाणा, आणि पेठ हे तालुके नाशिक जिल्ह्यांत आले आहेत. त्याचप्रमाणे सुभे खानेदशात धुळे आणि मनमाड यामध्ये असलेला एक जिल्हा होता. त्या जिल्ह्याला गाळणा जिल्हा म्हणत. गाळणा किल्ला हा मालेगावच्या उत्तरेस असला तरी त्या काळात खानदेश सुभ्यात मोडत असे. सध्याच्या नाशिक जिल्ह्याची विभागणी पूर्वेपासून पश्चिमेकडे चांदवड नावाच्या डोंगराच्या रांगेमुळे झाली आहे. ही रांग मनमाडजवळून सुरू होते. ती वणी येथे सप्तश्रृंगीजवळ संपते. या रांगेच्या उत्तरेला बागलाणचा जिल्हा होता. हा जिल्हा गुजरातच्या समृद्ध प्रांताच्या सरहद्दीवर होता. वर ज्या पर्वताच्या रांगेचा उल्लेख केला त्यावर जवळ जवळ दहा किल्ले होते. ते असे, चांदवड, इंद्राणी, कांचन, मांचन, धोडप, अहिवंत, अचलगिरी, हनुमंतगड, मार्कंड, आणि सप्तश्रृंगी.

सुरतेहून परत येताना शिवाजीमहाराजांनी बागलाण जिल्ह्याचे मुख्य ठिकाण मुल्हेर हे लुटले. नंतर ते दक्षिणेकडे डोंगराच्या रांगाकडे वळले. कांचन-मांचन येथे ते रांग ओलांडीत असताना त्यांची आणि मोगलांची गाठ पडली. वणी-दिंडोरी येथील मोगल-मराठा लढाईसंबंधी आपल्याला समकालीन मराठी आणि फारशी ग्रंथातून उत्कृष्ट माहिती मिळते. सभासद आणि भीमसेन सक्सेना यांनी या लढाईसंबंधी लिहिले आहे. वणी-दिंडोरीच्या ह्या लढाईला खरे पाहाता कांचन-मांचनची लढाई म्हणावी लागेल. मोगलांशी झालेल्या ज्या थोड्या लढायांतून प्रत्यक्ष शिवाजीमहाराज हजर होते त्यापैकी ही एक लढाई आहे. भीमसेन सक्सेना हा ह्या लढाईत हजर होता तो काय म्हणतो ते थोडक्यात असे आहे.

''दाउदखानाला कळले की शिवाजी हा कांचन-मांचनच्या घाटापाशी आला आहे. दाउदखान हा चांदवड येथे सन 1670 च्या ऑक्टोबरच्या रात्री पोहोचला. चांदवडचा फौजदार बाकीखान याने चांदवडच्या किल्ल्यात आश्रय घेतला होता. तो येऊन दाउदखानाला भेटला. मध्यरात्रीच्या सुमारास हरकाऱ्याने बातमी आणली की शिवाजी याने कांचन घाट ओलांडला असून तो नाशिकच्या मार्गाने जात आहे.

दाउदखानाने आपले लहानसे बाजारबुणगे हे चांदवड येथे ठेवले, आणि तो पुढे निघाला. गालिबखान, नारोजी आणि वसंतराव हे पिछाडीला होते. मागे राहिलेले सामान घेऊन ते पुढे निघाले. (इतिहासकार भीमसेन सक्सेना हा त्या सैन्यात एक अधिकारी होता तो त्यांच्या बरोबर गेला.) आघाडीच्या पथकांचे नेतृत्व इखलासखान मियाना यांजकडे होते. तो विजापूरच्या बहलोलखानाचा नातू आणि अब्दुल करीम याचा मुलगा होता. त्याला पाच हजाराची मनसब होती. आपली लहान पथके घेऊन तो रणमैदानावर पोहोचला. तो तेथे मराठे युद्धासाठी सज्ज असलेले त्याला दिसले. इखलासखान हा तापट डोक्याचा होता. त्याने उतावळेपणाने मराठ्यांच्यावर हल्ला चढविला. या हल्ल्याची दुर्दशा झाली. इखलामखानला बऱ्याच जखमा झाल्या, आणि तो घोड्यावरून खाली पडला.

''तोपर्यंत दाउदखान हा घाईघाईने त्या जागेवर पोहोचला होता. (भीममेनच्या म्हणण्याप्रमाणे मराठ्यांचे सैन्य पंधरा हजाराहून अधिक होते.) दाउदखानाने इखलासखानाच्या मदतीसाठी ताबडतोब मकरंद खत्री, स्वत:चा भाऊ शेखसफी, चंदेरीच्या राजाचा अधिकारी पुरोहित भान आणि संग्रामखान घोरी यांना पाठविले. त्यांच्या पाठोपाठ तो स्वत: जाऊन मिळाला. तेथून जवळच एक बेचिराख खेडे होते. ते खेडे एका लहान टेकडीवर होते. त्या टेकडी भोवती एक ओढा वाहात होता. त्या ठिकाणी मोगल सैन्याचे भारी सामान ठेवण्यात आले. त्याच्यावर देखरेख ठेवण्याचे काम बाकीखान आणि इब्राहीम पौनीखान यांजकडे देण्यात आले. चांदवडहून पुढे येणारे सामान आणि पिछाडीची पथके हीही तेथेच थांबविण्यात यावीत अशी सूचना देण्यात आली. (त्यामुळे पाठीमागून येणारा भीमसेन हा बाकीखानला जाऊन मिळाला.) दाउदखानाने इखलासखानाच्या मदतीला जे अधिकारी पाठविले होते ते मराठ्यांविरूद्ध लढले. ह्या लढ्यात मोगलांची अतिशय हानी झाली. अनेक माणसे मारली गेली आणि अनेक जखमी झाली. संग्रामखान, त्याची मुले आणि नातेवाईक, ही जखमी झाली. मोगल सैन्यातील बुंदेले (रजपूत) यांनीच आपल्या बंदुकांनी आणि तोफांनी मराठ्यांचा हल्ला थोपविला आणि तो वाढू दिला नाही.

''तोपर्यंत दाउदखान येऊन पोहोचला होता. त्याने इखलासखानाला रणांगणांतून उचलले. मराठ्यांनी आपले स्वत:चे युद्धतंत्र उपयोगात आणले होते. या तंत्राला बारगिरी म्हणतात. ह्याचा अर्थ म्हणजे शत्रूला सर्वच दिशांनी घेरावे आणि त्याला तिळभरही उसंत न देता सतत हल्ले करीत रहावे.

''रणांगणाच्या दुसऱ्या भागात भिमसेनचा मित्र आणि मोगल तोफखान्याचा

प्रमुख मीर अब्दुल माबूद याच्यावर मराठ्यांनी हल्ला चढविला. माबूदचा मुलगा आणि काही सैनिक हे मारले गेले. माबूद हा जबर जखमी झाला. (बासकीखान आणि भीमसेन यांनी त्याची सुटका केली आणि त्याला मोगल छावणीत आणले.)

त्यावेळी दाउदखानापाशी दोन हजाराहून अधिक सैनिक नव्हते. मराठ्यांनी संध्याकाळच्या सुमारास पुन्हा हल्ला चढविला. मोगलांनी त्याचा प्रतिकार केला. या नंतर मराठ्यांनी या लढाईतून अंग काढून घेतले, आणि सुरतेहून बरोबर आणलेला खजिना घेऊन ते निघून गेले.''

मोगलांचा हेतू काय होता ? शिवाजी महाराजांना अडविणे. आणि महाराजांचा हेतू काय होता ? मोगलांना बाजूला सारून सुरतेहून आणलेला खजिना सुरक्षितपणे आणि ताबडतोब घेऊन जाणे. या त्यांच्या योजनेत त्यांना यश मिळाले. मोगलांची मात्र माणसे आणि वित्त, या दोन्ही बाबतींत जबर हानी झाली. अब्दुल माबूद हा जखमी होऊन बेशुद्ध पडला होता. तो आता शुद्धीवर आला. आणि त्याने लेखक भीमसेन याला आपल्या कामाचा तात्पुरता सांभाळ करण्यास सांगितले. भीमसेन म्हणतो, ''मोगल हे दुसऱ्या दिवशी नाशिकला आले. लढाईत जखमी झालेली माणसे औरंगाबादेस पाठविण्यात आली. मोगलांनी नाशिक येथे जवळ जवळ मुक्काम केला. नंतर ते अहमदनगरकडे रवाना झाले.''

## मराठ्यांच्या स्वाऱ्या

नाशिकला मोगलांनी छावण्या घातल्या होत्या, ऐन त्यावेळी मराठ्यांनी पेशवे मोरोपंत यांच्या नेतृत्वाखाली त्र्यंबकच्या बळकट किल्ल्यावर (नाशिक जवळील) हल्ला चढविला आणि तो त्यांनी सन 1670 च्या 25 ऑक्टोबर रोजी जिंकून घेतला. त्याच्या पाठोपाठ त्यांनी औंढा, पट्टा, रवळा, जवळा, (सध्याच्या नाशिक जिल्ह्याचा दक्षिण भाग) हे किल्ले जिंकून घेतले.

वऱ्हाडच्या प्रांतात तर मराठ्यांनी विलक्षण धुमाकूळ घातला. सन 1670 च्या नोव्हेंबरमध्ये महाराजांनी वऱ्हाडमधील समृद्ध शहर कारंजा हे लुटले. तीन दिवसपर्यंत हे शहर लुटण्यात येत होते. गाव अक्षरश: खणून काढण्यात आले असेही म्हणता येईल.

मोगलांच्या खास बादशाही मुलखात मराठ्यांच्या धुमाकुळीचे काय परिणाम झाले त्याचे उदाहरण म्हणून माहूरचे (त्यावेळी वऱ्हाडात—आता नांदेड जिल्ह्यात) राजे उदाराम यांच्या सन 1671 च्या 13 जानेवारीच्या पुढील विनंतीअर्जाचा उल्लेख करता येईल:

"दरम्यानच्या काळात माहूर सरकार (जिल्हा) चा फौजदार (आजचा कलेक्टर) म्हणून अब्दुल्लाखान शिवाजी याची नेमणूक झाली होती.. उदाजीरामच्या जहागिरीत उंबरखेडचा परगणा होता. शत्रू (मराठे) या प्रदेशात आला आहे. तो प्रत्येक परगण्यातून चौथाई रकमेची मागणी करीत आहे. उदाजीरामाची सगळी जहागीर उध्वस्त होऊन गेली आहे."

मोगलांच्या मुलखातील महाराजांची आक्रमणे ही पूर्वेकडील वऱ्हाडातील उमरखेडपासून पश्चिमेकडील खानदेशातील नंदूरबारपर्यंत पसरलेली होती. मराठ्यांच्या पुढील इतिहासात चौथ प्रकाराने केवढी निर्णायक भूमिका बजावली हे सांगणे नकोच. या चौथाईचा- उल्लेख सन 1670 पासून मोगल आणि मराठे कागदपत्रांमध्ये आढळू लागतो.

महाराज हे मोगलांना उसंतच देत नव्हते हे उघड आहे. त्यामुळ मोगलांची सारखी धावपळ चालू होती. महाराजांनी त्यांना स्वराज्यातून म्हणजे कोकण आणि भीमेच्या दक्षिण मुलखातून हाकलून लावले. मोगलांच्या हल्ल्यापासून त्यांनी हा प्रदेश सुरक्षित ठेवला. या प्रदेशाचे रक्षण करण्याचा सर्वात उत्तम मार्ग म्हणजे मोगलांच्या इलाख्यात युद्ध चालू ठेवावे. आणि शत्रूला त्यात गुंतवावे. महाराजांचे धोरण पुढीलप्रमाणे होते. औरंगाबाद, नांदेड, आणि वऱ्हाड, या तिन्ही प्रांतांत फार मोठ्या प्रमाणात दंगल उडवून द्यावी; ती अशी की मोगल अधिकाऱ्यांच्या जहागिरी उध्वस्त कराव्या, चौथाई वसूल करावी आणि किल्ले आणि महत्वाची स्थळे यांजवर हल्ले चढवावे. त्या प्रांतातील कोणताही प्रदेश घेऊन तो आपल्या ताब्यात कायमचा ठेवणे हा त्यांचा उद्देश नव्हता.

पण खानदेश सुभ्याच्या बागलाण जिल्ह्यात मात्र शिवाजीमहाराजांनी मोगलांचा मुलुख घेतला आणि तेथे आपली सत्ता स्थापन केली. अशा प्रदेशांना मोगल *मुल्के बादशाही* असे म्हणत. कारण हा रीतसर मोगल बंदोबस्ताखाली (सेंट्रल ॲडमिनिस्ट्रेशन) असे. महाराजांनी आतापर्यंत ताब्यात घेतलेले सगळे मुलुख विजापूर राज्यातून घेतलेले होते. बागलाणचा इलाखा मात्र महाराजांनी घेतला. म्हणजे मोगल साम्राज्याचा एक लचका त्यांनी तोडून कायमचा आपल्या ताब्यात आणला असे म्हणावे लागेल. बागलाणवर ताबा म्हणजे गुजरातेवर स्वारी करण्यासाठी हाती आलेला एक तळच होय असे म्हटले पाहिजे. खानदेशाच्या समृद्ध विभागात यामुळेही मोगलांना कायमचा धोका निर्माण झाला. पुढे अठराव्या शतकात दाभाडे आणि गायकवाड यांनी गुजरातेत कायमची सत्ता स्थापन केली. ती बागलाणच्या तळावरून सरकूनच केली.

नाशिक जिल्ह्यातील पूर्वेकडून पश्चिमेकडे जाणाऱ्या डोंगराच्या रांगांवरील उत्तरेकडे साल्हेर आणि मुल्हेर हे दोन महत्वाचे किल्ले होते. मुल्हेर हे बागलाण जिल्ह्याचे मुख्य ठिकाण होते. महाराजांचा डोळा होता तो साल्हेरच्या किल्ल्यावर. साल्हेर हाती आला तर गुजरातच्या उंबरठ्यावर पोहोचल्यासारखे होईल. आज गुजरातचा डांग जिल्हा हा साल्हेर जिल्ह्यापासून फक्त काही मीटर अंतरावर आहे.

दाउदखान कुरेशी याची छावणी मनमाडजवळ होती. शिवाजीमहाराजांचा हेतू त्याला मनमाडकडून हालवायचा होता. मराठे हे खानदेशाची राजधानी बऱ्हाणपूर यावर चाल करून गेले. दाउदखानाने आपला मुलगा हमीदखान याला बऱ्हाणपूर येथे अधिकारी म्हणून ठेवले होते. मराठ्यांनी बऱ्हाणपूरचे उपनगर बहादूरपुरा हे लुटले. हमीदखानाने आपल्या बापाकडे तातडीने मदतीची मागणी केली. त्यामुळे दाउदखान हा बऱ्हाणपूरकडे घाईघाईने निघाला. मराठे या संधीची वाट पहात होते. ते चटकन् साल्हेरकडे वळले आणि त्यांनी त्या किल्ल्याला वेढा घातला. दाउदखान घाईघाईने त्यांच्यामागे निघाला. मुल्हेरपासून साल्हेरचा किल्ला 22 कि.मी. अंतरावर आहे. दाउदखान हा मुल्हेरहून निघून साल्हेरच्या वाटेला लागला. पण तो तेथे पोहोचण्यापूर्वीच त्याला कळले की मराठ्यांनी साल्हेरचा किल्ला जिंकून घेतला असून मोगला किल्लेदार हा वेढा लढवित असताना सन 1671 च्या 5 जानेवारी रोजी मारला गेला आहे. साल्हेरचा किल्ला म्हणजे शिवाजीमहाराजांच्या राज्याचे उत्तरेकडचे टोक होय.

भीमसेन सक्सेना याला आलेला रोचक अनुभव पाहाता एकंदरीत संघर्ष हा धार्मिक रेषा बाजूला सारून चालला होता असे दिसते. भीमसेन हा दाउदखानाच्या पाठोपाठ साल्हेरकडे चालला होता. तो मागे रेंगाळल्यामुळे त्याची (भीमसेनची) वाट चुकली. भीमसेन म्हणतो, ''दाउदखानाने हुकूम सोडला होता की भारी सामान मुल्हेरमध्ये ठेवण्यात यावे. साल्हेर किल्ल्याचा उपराळा करण्यासाठी सैन्याने भल्या पहाटे मुल्हेरहून निघावे. दाउदखान हा स्वत: लवकर निघाला. मला उशीर लागला. माझ्याबरोबर थोडे पायदळ होते. ते घेऊन मी मुख्य सैनिकांकडे निघालो. तोपर्यंत दाउदखान आणि मुख्य सैन्य हे बरेच लांब निघून गेले होते.

''मी एका निर्जन खेड्यापाशी पोहोचलो. हे खेडे साल्हेर आणि मुल्हेरच्या मध्ये आहे. जवळच एक लहान टेकडी होती. मी त्या टेकडीवर होतो. मी पाहिले की काही सैनिक टेकडीकडे येत आहेत. ते मराठे होते. ते टेकडीच्या पायथ्यापर्यंत आले. मी मोठ्या घोटाळ्यात पडलो. एक घोडेस्वार माझ्याकडे येत होता. तो आपल्या सोबत्यांच्याकडे वळून म्हणाला, 'तुम्ही येथेच थांबा. मला वाटते मी या

घोडेस्वाराला (भीमसेन) ओळखतो.' या नंतर तो घोडेस्वार आणखी दोन स्वारांबरोबर माझ्याजवळ आला. त्याने मला नावाने हाक मारली. तो म्हणाला, 'तू येथे एकटाच कसा?'

"मी अतिशय घाबरलो होतो. मी त्या माणसाला ओळखले नाही. तो म्हणाला, 'मी नूरखान आहे.' या नंतर तो आपल्याबरोबर आलेल्या घोडेस्वारांना म्हणाला, 'तुम्ही आपल्या कामावर परत जा. नंतर तो माझ्याकडे वळून म्हणाला, 'मी तुम्हाला तुमच्या छावणीत पोहोचवून परतेन. आपली गाठ पडली हे फार बरे झाले, नाही तर आज तुमचा जीव गेला असता.'

"माझे वडील औरंगाबादेस होते तेव्हा नूरखानाची आणि त्यांची ओळख झाली होती. पुढे नूरखानाची नौकरी गेली आणि तो अडचणीत आला. त्याने काही घोडेस्वार जमविले आणि शिवाजीच्या हाताखाली चाकरी घेतली. बागलाण प्रदेशांत त्याची नेमणूक करण्यात आली. नूरखान हा दाउदखानाच्या छावणीपर्यंत मला सोडण्यास आला. मी त्याचा पाहुणचार केला. मी त्याला काही भेटी आणि काही रक्कमही देऊ केली. पण ती तो घेईना. त्याने दुपारी माझा निरोप घेतला."

नूरखान हा शिवाजीमहाराजांच्या नौकरीत आणि भीमसेन हा मोगलांच्या नौकरीत. आणि हे दोघे एकमेकांना मदत करतात! सगळेच चमत्कारिक आहे. याचा अर्थ हा की मोगल-मराठा हा संघर्ष हा मुळातच राजकीय संघर्ष होता. तो म्हणजे उठाव होता भूमीपुत्रांचा; एतद्देशियांचा, आणि कुणाविरुद्ध? तर, तर परकीय सत्ता आणि परकीय नोकरशाही यांजविरुद्ध.

शिवाजीमहाराजांच्या विरुद्ध मोहीम लढविण्यासाठी औरंगजेबाने काबूलचा सुभेदार महाबतखान याची नेमणूक केली. महाबतखान हा शहाजहानच्या काळात सुप्रसिद्ध सेनापती होऊन गेला. त्याने सन 1633 मध्ये दौलताबादेचा किल्ला जिंकून घेतला होता. त्यातूनच अहमदनगरची निजामशाही समाप्त झाली. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे काबूलचा सुभेदार महाबतखान हा सन 1671 च्या 3 जानेवारी रोजी बऱ्हाणपूरला आला. सन 1671 च्या 10 जानेवारी रोजी त्याने औरंगाबाद येथे राजपुत्र मुअज्जम याची भेट घेतली. महाबतखानाच्या सैन्यात आघाडीचा अधिकारी म्हणून दाउदखान याची नेमणूक करण्यात आली. त्यांनी अहिवंत, मार्कंड, जवळा अन अचलगिरी हे किल्ले एप्रिल आणि मे या महिन्यात घेतले. दाउदखानाने मराठ्यांशी बरेच निकराचे लढे दिले. पण मराठ्यांनी बागलाणवरची आपली पकड सोडली नाही.

मोगलांतर्फे लढणाऱ्यांमध्ये तत्पर आणि तडफदार असा एकमेव अधिकारी

म्हणजे खानदेशाचा सुभेदार दाउदखान कुरेशी हा होय. त्याचे आळशी व अहंमन्य असलेल्या महाबतखानाशी मुळीच पटेना. शेवटी चीड येऊन दाउदखानाने दक्षिणेतून आपली बदली करून घेतली. सन 1671 च्या जूनमध्ये तो दक्षिणेतून निघून गेला. भीमसेन हा दाउदखानाच्या छावणीत होता, तो मात्र दक्षिणेतच राहिला. नंतर त्याने महाबतखानाच्या छावणीत नोकरी धरली.

पावसाळ्यात मोहीम करण्यास मोगल अत्यंत नाखूष असत. महाबतखान त्याला कसा अपवाद ठरेल? पावसाळा आल्याबरोबर त्याने पारनेर (अहमदनगरजवळ) येथे आपली छावणी केली. तेथे तो मौजमजा करीत आळसात वेळ घालवू लागला, आणि ऐन याच वेळी मराठे हे दक्षिणेच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत धुमाकूळ घालीत होते.

महाबतखानाच्या पारनेरच्या छावणीत भीमसेन हजर होता. छावणीतील परिस्थितीसंबंधी तो पुढील गमतीदार माहिती देतो. तो म्हणतो:[1]

"महाबतखानाची छावणी पारनेर येथे होती. त्यावर्षी सपाटून पाऊस पडला. साथीच्या रोगराईमुळे अनेक माणसे आणि गुरेढोरे मरण पावली. पारनेरला मात्र महाबतखान हा ऐषआरामात दिवस घालवीत होता. रोज कुणा न् कुणा अमीरउमरावाच्या तळावर मेजवान्या आणि नाचगाणी इत्यादींचे कार्यक्रम असायचेच. महाबतखानाच्या छावणीत काबूल आणि लाहोर येथील 400 नर्तिका होत्या. त्यांच्यावर बक्षिसांची वृष्टी करण्यात येत असे. कुणीतरी बादशहाला (औरंगजेब) सांगितले की महाबतखान आणि शिवाजी यांच्यात गुप्त संगनमत झाले आहे आणि त्यामुळे शिवाजीचे पारिपत्य करण्याच्या कामांत महाबतखान हा मन:पूर्वक झटतच नाही."

औरंगजेबाने महाबतखानाला दक्षिणेतून परत बोलाविले आणि गुजरातचा सुभेदार बहादूरखान याची महाबतखानाच्या जागेवर नेमणूक केली. महाबतखानाची बदली सप्टेंबर 1671 ची आहे. बहादूरखानाच्या बरोबर दिलेरखान, कुतुबुद्दीनखान असे कसलेले योद्धे होते.

## साल्हेरची लढाई

बहादूरखानाने आपल्या मोहिमेची सुरुवात मोठ्या तडफेने केली. महाराजांच्या प्रदेशात मोगलांनी अनेक आक्रमणे केली. पुष्कळ चकमकी आणि लढाया झाल्या.

---

1. सक्सेना भीमसेन, *तारीखे दिल्कुशा*

पण मोगलांची सगळ्यात मोठी दुर्दशा झाली ती सन 1672 च्या सुरूवातीस, साल्हेरच्या युद्धात त्यांचा पराजय झाला त्यामुळे. मोगलांनी साल्हेरच्या किल्ल्याला वेढा घातला होता. तो जिंकून घेणे हा त्यांच्या प्रतिष्ठेचा प्रश्न बनला होता. मोगलांना वेढा उठवायला लावणे हा महाराजांचा निर्धारही तितकाच दृढ होता.

शिवाजी महाराजांचा चरित्रकार सभासद याने ह्या युद्धाचे मोठे रोचक वर्णन केले आहे. मराठ्यांच्या सैन्यात पेशवे, मोरोपंत, सेनापती प्रतापराव गुजर आणि इतर, असे कसलेले योद्धे होते. युद्ध मोठे निकराचे झाले. मोगलांचा संपूर्ण पराजय होऊन त्यांचा सगळा सरंजाम नाहीसा झाला.

भीमसेनही म्हणतो, "त्या लढाईत इखलासखानमियां आणि मुहकमसिंग हे जखमी होऊन मराठ्यांच्या कैदेत सापडले. मुहकमसिंगचा बाप राव अमरसिंग चंद्रावत हा या लढाईत मारला गेला. मोगलांचा सगळा सरंजाम मराठ्यांनी आपल्या ताब्यात घेतला. बहादूरखान हा साल्हेरकडे त्वरेने रवाना झाला. पण तो बागलाणात पोहोचेपर्यंत मराठे कोकणात उतरले होते मोगलांकडून मिळालेली सगळी लूट ते आपल्या बरोबर घेऊन गेले."

साल्हेरच्या युद्धाची वर्णने आपल्या मराठी बखरीतून आणि पोवाड्यातून केलेली प्रामुख्याने आढळतात. हिंदी कवी भूषण याने या लढाईच्या वर्णनात अनेक प्रभावी श्लोक रचले आहेत.

त्यावेळी औरंगजेब अत्यंत प्रतिकूल परिस्थितीतून मार्ग काढीत होता. सरहद्दीवरील टोळ्या ह्या उघड उघड बंड करून उठल्या होत्या. औरंगजेबाने आपला दिवंगत मुख्य प्रधान मीरजुमला याचा मुलगा मुहम्मद अमीनखान याची काबूल प्रांतात सुभेदार म्हणून नेमणूक केली. अमीनखान हा खैबर घाटातून जात असता अफगाण बंडखोरांनी त्याच्यावर हल्ला केला. मोगल सैन्यात एकच हाहा:कार उडाला. मुहम्मद अमनखान याचा मुलगा मारला गेला. अमीनखानाची बायको, माणसे पकडली गेली. अमीनखान हा कसाबसा निसटून पेशावरला पोहोचला. औरंगजेबाने फियाझखान यास पेशावरला पाठविले. महाबतखान याची नेमणूक काबूलच्या सुभेदारीवर करण्यात आली. महाबतखान हा काबूल येथे सन 1672 च्या डिसेंबरपासून, 1673 च्या डिसेंबरपर्यंत होता.

मेवात जिल्ह्यातील (दिल्लीजवळ) सतनामी याचे बंड सन 1672 मध्ये उद्भवले. औरंगजेबाची ही आणखी एक डोकेदुखी. हे बंड मोठे तीव्र स्वरूपाचे होते. मोठ्या कष्टाने त्या बंडाचा मोड करण्यात आला.

बहादूरखानाच्या नेतृत्वाखाली मोगल हे शिवाजीमहाराजांशी जोरदारपणे लढत

होते. महाराजांचे किनारपट्टीवरील जे प्रदेश होते त्यांच्यावर आक्रमणे करण्यासाठी त्यांनी जंजिऱ्याच्या शिद्यांना चिथावले. शिद्यांची साधने वाढावीत म्हणून मोगलांनी सुरतेहून आपले तुटपुंजे आरमार शिद्यांच्याकडे पाठविले.

ब्रिटिशांचे धोरण महाराजांसंबंधी काय होते? ब्रिटिश हे समजत की कायद्याने स्थापन झालेल्या औरंगजेबाच्या सत्तेविरूद्ध लढणारा शिवाजी हा एक बंडखोर आहे. त्यांच्या मते शिवाजी म्हणजे एक कटकट होती (*नुइसन्स*). पण महाराजांना मोगलांच्याविरुद्ध यशस्वी झुंज देता येऊ लागली हे त्यांना दिसू लागले. तेव्हापासून ब्रिटिशांची भाषा त्यांच्यासंबंधी (महाराजांसंबंधी) बदलू लागली. पुढील काही पत्रांवरून ही गोष्ट स्पष्ट होते.

30 मार्च 1670. ''शिवाजीच्या हालचालीमुळे आमचे हे मत विचारात घेण्यासारखे आहे. कारण आता शिवाजी जेव्हा मोहिमेवर बाहेर पडतो तेव्हा ती गोष्ट पूर्वीसारखी राहात नाही. पूर्वी तो चोरासारखा बाहेर पडत असे. पण आता 30 हजाराचे सैन्य घेऊन तो बाहेर पडतो आणि वाटेतील प्रदेश जिंकीत जातो. मोगल राजपुत्र जवळच छावणी घालून असला तरी तो विचलित होत नाही.''[1]

30 ऑगस्ट 1670 ''आपण बेटातील (मुंबई) माणसे. प्रत्येक गोष्टीसाठी आपल्याला समोर असलेल्या मुख्य प्रदेशावर अवलंबून राहावे लागते; आणि तो प्रदेश तर शिवाजीच्या ताब्यात आहे. त्याचे हेर सर्वत्र पसरले आहेत, त्याच्या शत्रूंना रसदेचा साठा कुठून मिळतो हे त्याचे हेर त्याला केव्हाही सांगू शकतात.''[2]

22 फेब्रुवारी 1671.''शिवाजीचा उल्लेख आला म्हणून आम्ही सांगतो. आमचे मत असे आहे की तुम्ही जसे हिंदुस्थानातील इतर राजे लोकांशी योग्य तो पत्रव्यवहार करता तसाच शिवाजीशी करावा. शिवाजी आता सत्तेवर आहे. हा पत्रव्यवहार तुम्ही मुंबईहून रीतसर करू शकता.''[3]

शिवाजीमहाराज अडचणीत आहेत असे वाटून त्यांना अधिक अडचणी निर्माण करण्याचा विजापूर राज्याला अतिशय मोह झाला. पण महाराजांच्या स्वत:च्याही काही योजना होत्या. ते फक्त संधीची वाट पहात होते.

---

1. *इंग्लिश रेकॉर्डस ऑन शिवाजी,* पृ. 144
2. कित्ता: पृ. 159
3. कित्ता: पृ. 190

## गोवळकोंड्याचा कलह

दक्षिणेतील अहमदनगर, विजापूर, आणि गोवळकोंडा या तीन राज्यांपैकी अहमदनगरचे राज्य मोगलांनी समाप्त केले होते. उरलेली विजापूर आणि गोवळकोंडा ही राज्ये मोगल साम्राज्यात विलीन करण्याचा आपला हेतू आहे हे मोगलांनी कधीच लपवून ठेवले नव्हते. सन 1635 च्या तहाने गोवळकोंड्याने खंडणी देणे कबूल केले आणि आपण मांडलिक आहोत ही भूमिकाही स्वीकारली. विजापूरला मात्र मोगलांनी वेगळी वागणूक दिली. कारण अहमदनगर राज्याच्या समाप्तीमध्ये विजापूरने मोगलांशी सहकार्य केले होते. आणि त्याचा मोबदला विजापूरला हवा होता.

दक्षिणच्या ह्या दोन राज्यांशी मोगलांचे शांततेचे संबंध वीस वर्षे टिकले. पुढे मात्र महत्वाकांक्षी औरंगजेब हा दक्षिणचा सुभेदार होऊन आला. त्याने सन 1656 मध्ये गोवळकोंड्यावर हल्ला चढविला आणि त्या दुबळ्या झालेल्या राज्यावर त्याने अतिशय कडक अशा अटी लादल्या. यानंतर औरंगजेबाने सन 1657 मध्ये विजापूरवर आक्रमण केले. शहाजहानचा आजार आणि त्यानंतर उद्‌भवलेले अंत:कलह, ह्यामुळे औरंगजेबाला उत्तरेकडे जावे लागले. मोगलांचे विजापूरवरील दुसरे आक्रमण सन 1665 मधील होय. ह्याखेपेस मोगलांचे नेतृत्व जयसिंगाकडे होते. हे आक्रमण यशस्वी झाले नाही. दक्षिणेतील ही राज्ये सतत धास्तावलेली असत. असे असले तरी मोगलांशी लढण्यासाठी ही राज्ये एक होऊ शकली नाहीत; कारण मोगलांशी सहकार्य करावे असे म्हणणारे घटक या दोन्ही राज्यांतून मोठे सक्रीय असलेले आढळून येत.

मोगलांशी युद्ध करताना आपल्या योजनांचा पाया विशाल असावा असा महाराजांचा हेतू असे. विजापूरच्या राज्यात एकीकडे पठाण आणि दुसरीकडे दक्षिणी मुसलमान आणि शिद्दी अशी सत्तास्पर्धा चालली होती. पण गोवळकोंड्याच्या राज्यात महाराजांना एक संधी चालून आली. आणि त्या संधीचा त्यांनी पुरेपूर फायदा घेतला.

गोवळकोंड्याचा बादशहा अबदुल्ला कुतुबशहा हा सन 1672 च्या 21 एप्रिल रोजी वारला. त्याच्या मागून त्याचा जावई, अबुल हसन हा गादीवर बसला. गोवळकोंड्याच्या कुतुबशाही राजघराण्यातील हा शेवटचा बादशहा होय. जेधे शकावलीत शिवाजी महाराज आणि गोवळकोंडा यांच्यातील तहाचे थोडक्यात वर्णन दिले आहे. ''शिवाजीमहाराजांचे वकील निराजीपंत हे भागानगरला गेले. एक लाख होनाचा सल्ला केला, आणि महाराजांकडे परत येताना आपल्याबरोबर ते 66 हजार होन घेऊन आले.''

मोगलांशी लढण्यासाठी दक्षिणी राज्यांच्या बरोबर युती ही होऊ घातली होती. ही युती हा राजकीय संघर्षाचा भाग होय. त्याला धर्माचे बंधन नव्हते.

## छत्रसालाची भेट

मोगलांच्या विरुद्ध जितक्यांना उठवता येईल तितके करण्याचा महाराजांनी ठाम निर्धारच केला होता. त्यावेळी तरूण बुंदेला रजपूत सरदार छत्रसाल हा मोगलांच्या हाताखाली एक अधिकारी म्हणून काम करीत होता. त्याने शिवाजीमहाराजांची गाठ घेतली. त्या भेटीचे मोठे प्रत्ययकारी वर्णन छत्रसालचा राजकवी, लालकवी याने आपल्या *'छत्रप्रकाश'* [1] या चरित्रकाव्यांत केले आहे. सन 1672 मध्ये छत्रसालने मोगलांना सोडले. तो पुण्याला गेला. तो शिवाजीमहाराजांपाशी बरेच दिवस होता. तेथे त्याने शस्त्रास्त्रांचे शिक्षण घेतले. महाराजांनी त्याला सल्ला दिला की, ''तुम्ही बुंदेलखंडात जा. मोगलांच्या विरुद्ध तुम्ही तेथे प्रतिकाराची संघटना उभी करा आणि मातृभूमीला स्वतंत्र करा.'' महाराजांनी छत्रसालाच्या कमरेला तलवार बांधली आणि त्याला आशीर्वाद दिला. त्यानंतर त्याला बुंदेलखंडाकडे परत जाऊन मोगलांशी लढण्यासाठी जाण्याचा त्यांनी निरोप दिला.

महाराजांनी छत्रसालाला काय सांगितले त्या शब्दांचे भाषांतर पुढे दिले आहे:

''हे राजन, आम्ही तुमच्यापासून कधीच वेगळे नाहीत. तुम्ही आपल्या देशी त्वरेने परत जा. आणि दिल्लीच्या मोगल सैन्याचा संहार करा. तुम्ही तुर्कांची तमा बाळगू नका. तुर्क हे हत्ती असले तर तुम्ही सिंह आहात हे लक्षात ठेवा. तुर्कांच्यात विवेक नाही, त्यांनी आम्हाला झिडकारले. देवी भवानीने आमचे सहाय्य केले. मोगलांना आपल्या मनासारखे वागता येईना. आम्ही युक्तीने आमच्या देशी परत आलो. मोगलांनी आपले सेनापती आमच्यावर पाठविले. आम्ही तुर्कांच्यावर तलवार उपसली. आम्ही त्यांच्यावर हल्ले करू, आणि त्यांचा नाश करु. तुम्ही आपल्या देशी जा, आपली तलवार चालवा. सैन्य गोळा करा आणि तुर्कांचा नाश करा. [2] तुम्ही आपल्या हृदयात प्रभू वृजनाथ याचे सदैव स्मरण ठेवा आणि हातात तलवार सदैव सज्ज ठेवा. आणि याची खात्री बाळगा की ही दोन्ही (प्रभूचे स्मरण आणि हातात

---

1 प्रतापसिंग, *छत्रप्रकाश*, संपा., डॉ. महेंद्र, श्रीपाताळ प्रकाशन, नवी दिल्ली, 1973 पृ 88.89

2 शत्रूच्या वंशाचा उल्लेख तुर्क म्हणून वरील काव्यात आला आहे, धर्माचा मुसलमान म्हणून आला नाही. ही गोष्ट मोठी सूचक आहे. उल्लेख वांशिक आहे, धार्मिक नाही. लढ्याचे स्वरूप यावरुन लक्षात यावे

तलवार) तुमचे सदैव रक्षण करील. मी जर तुम्हाला येथे ठेवले तर मिळणारे सगळे सुयश माझ्या नावावर मोडेल. यासाठी तुम्ही आपल्या देशी परतावे, मोगल सैन्याचा नाश करावा, तुम्हाला मिळणारे सुयश आमच्या कानी पडावे ही आमची इच्छा आहे.'' असे म्हणून शिवाजी महाराजांनी तलवार मागवली आणि छत्रसालाच्या कमरेस बांधली. त्यानंतर त्याने छत्रसालाला मोठ्या आदराने निरोप दिला. शिवाजी महाराजांना या सर्व प्रकाराने अत्यंत आनंद झाला. पुष्कळ वर्षांनी छत्रसालाने आपल्या वृद्धावस्थेत आपल्या मुलाला पुण्याच्या आपल्या भेटीची आठवण काढून पत्र लिहिले. त्यात तो म्हणतो, पुण्याला गेलो. मी शिवाजीला भेटलो. मी शिवाजीपाशी पुष्कळ दिवस होतो. मी शिवाजीपाशी विद्या शिकलो. धनुर्विद्या शिकलो. [1] *(शिवाजीके पास पूना गये थाओ, शिवाजीके पास हम बहोत दिन रहे. विद्या सीखी, बाण चलाना वगैरे.)*

छत्रसालचे पुढील चरित्र प्रसिद्ध आहे, बुंदेलखंडात छत्रसाल आणि गोवळकोंड्याचे कणखर होत चाललेले धोरण यामुळे शिवाजीमहाराजांच्या प्रेरणेने मोगल-मराठा संघर्षात नवीन मार्ग सापडू लागले. औरंगजेबाच्या कर्मठ आणि कट्टर धोरणामुळे मोगल-मराठा संघर्ष, याचे स्वरूप व्यापक होऊन तो म्हणजे सहिष्णुता आणि अविचारी आक्रमण यांच्याविरुद्ध एक राष्ट्रव्यापी लढाच बनला. हा लढा धार्मिक आणि प्रांतीय भेद उल्लंघून गेला. काही विद्वान अभ्यासक असे समजतात की महाराजांनी उभा केलेला लढा हा निव्वळ प्रांतीय आहे अगर जातीय होता. पण वर दिलेले पुरावे पाहता अशा अभ्यासकांच्या समजुतीची खंत वाटू लागते.

सन 1672 मध्ये बहादूरखानाने दक्षिणेतील मोगल सैन्याचा सेनापती म्हणून काम पाहाण्यास सुरूवात केली. पण दक्षिणेचा सुभेदार म्हणून राजपुत्र मुअज्जम हाच काम पाहात होता. औरंगजेबाने आता मुअज्जमला परत बोलावून घेतले आणि त्या जागेवर बहादूरखान याची नेमणूक केली. मुअज्जम हा परत गेला आणि त्याने सन 1672 च्या 25 जुलै रोजी बादशहाची भेट घेतली.

सध्याच्या नाशिक जिल्ह्याच्या पश्चिम भागात म्हणजे बागलाणातील जंगलात मोगलांची सैन्ये गुरफटून गेली होती. शिवाजीमहाराजांच्या उत्कृष्ट लष्करी डावपेचाचा हा परिणाम होता. मोगलांनी दक्षिणेकडे आपल्या स्वराज्यात शिरू नये म्हणून महाराजांनी त्यांना बागलाणच्या घनदाट अरण्यात लढण्यात गुंतवून ठेवले. महाराजांनी तेथे आपली पकड ढिली होऊ दिली नाही. त्याबरोबरच त्यांनी

1. प्रतापसिंग, *ऐतिहासिक प्रमाणावली और छत्रसाल,* संपा. डॉ. महेंद्र, श्री पाताळ प्रकाशन, 1975, पृ. 120

मराठ्यांचा पाठलाग करण्यासाठी म्हणून मोगलांना पूर्वेकडे गोवळकोंड्याच्या सरहद्दीपर्यंत आणि उत्तरेकडे वऱ्हाड आणि खानदेश ह्या प्रांतांच्या दिशेने धावपळ करण्यास लावले. मोगल हे मधून मधून पुण्यापर्यंत चाल करून जात.

बहादूरखानाने भीमा नदीच्या काठावर पेडगाव येथे आपली छावणी केली. पेडगाव हे अहमदनगरच्या दक्षिणेस 93 कि.मी. अंतरावर आहे. बहादूरखानाने तेथे किल्ला बांधला. त्या किल्ल्याचे नाव बहादूरगड ठेवण्यात आले. सन 1689 मध्ये संभाजीराजांचा मृत्यू होईपर्यंत बहादूरगड म्हणजे मोगलांचा आघाडीचा तळ होता.

शिवाजीमहाराजांनी युद्ध करून नाशिक जिल्ह्याचा बराच भाग बळकावला. त्यांनी दक्षिण सुभ्यात बरीच आक्रमणे केली. त्यामुळे स्वराज्याला हवे ते संरक्षण मिळाले. नाशिक जिल्ह्यातून मराठ्यांना काढून लावणे आणि कोकणात स्वारी करणे या गोष्टी घडवून आणण्यास मोगल सेनापती आणि नंतर औरंगजेब यांना एकोणीस वर्षे झटावे लागले. याचा अर्थच असा की शिवाजीमहाराजांनी मोगल आक्रमणापासून स्वराज्याचे संरक्षण तर केलेच पण आपल्या मुलाच्या हयातीतही असे आक्रमण होणार नाही याची व्यवस्था केली. संभाजीराजे वारले तेव्हा कोठे मोगल एकीकडे कोकणात उतरू शकले, आणि दुसरीकडे पुणे आणि भोवतालचे किल्ले यांजवर चाल करून जाऊ शकले.

शिवाजीमहाराज हे किती मोठे सेनापती आणि युद्धाच्या व्यूहरचनेत किती कुशल होते हे वरील युद्धातील डावपेचावरून दिसून येईल. आजही शिवाजीमहाराजांच्या युद्धविषयक हालचालींचा खोलवर अभ्यास करणे हे सर्वार्थाने योग्य आहे. महाराजांचे राजकारण आणि युद्धकारण, ही दोन्ही पाहाता पद्धती, यंत्रणा आणि समयोचितता या सर्वच बाबतीत या लोकोत्तर पुरुषाने मोगलांच्यावर बाजी मारून नेली यात काही संशय नाही.

अठरा पगड जातींनी भरलेले मोगलांचे सैन्य, त्यांतही काही तणाव नव्हते असे नाही. अशा गोष्टीवर विदारक प्रकाश पाडणारी एक घटना इतिहासकार भीमसेन हा आपल्या आत्मचरित्रात देतो, "बहादूरखानाने भीमा नदीच्या काठावर छावणी घातलेली होती. दिलेरखानाचे अफगाण सैनिक हे दुष्ट आणि उद्धट होते. ते वाटसरूना लुबाडीत. अशा प्रसंगी एक वाटसरू मारला गेला. बहादूरखानाच्या मुलाने त्या प्रकरणाची चौकशी केली. अफगाणांच्या वर वचक बसावा म्हणून बहादूरखानाने आपला तोफखाना तयार ठेवला. रोहिल्यांनी (अफगाणांनी) त्याच्या तोफखान्याची पर्वा केली नाही. ते चाल करून पुढे आले. बहादूरखानाने तोफा चालविण्याची आज्ञा केली. थोड्याच काळात सहाशे रोहिले मारले गेले."

# 7

# सन 1673 मधील युद्ध

**मोगलांशी** युद्ध चालूच होते. या सुमारास, म्हणजे सन 1672 च्या 24 नोव्हेंबर रोजी विजापूरचा अली आदिलशहा हा मरण पावला. ह्या घटनेमुळे नवीन क्षितिजे महाराजांच्या दृष्टिपथात आली. मोगलांच्यावर हल्ला करण्याचा मुख्य हेतू म्हणजे त्यांना स्वराज्यातून हाकलून लावणे आणि त्यांच्या आक्रमणापासून स्वराज्याचे रक्षण करणे, हा होता. महाराजांनी मोगलांच्या प्रदेशात आक्रमणे केली आणि सध्याच्या नाशिक जिल्ह्यातील किल्ले आणि काही प्रदेश आपल्या ताब्यात घेतले. हा त्यांच्या युद्धविषयक हालचालींचा एक भाग होता. मोगलांनी दक्षिणेत येऊ नये, त्यांनी पूर्वेकडे वळावे, आणि गुजरातची वाट आपण हाती घ्यावी आणि तिच्यावर आपली पक्की पकड असावी ही त्यांची योजना होती. नि:संशयपणे मोगलांचा असलेला हा इलाखा म्हणजे नाशिक जिल्ह्याचा पश्चिम भाग आणि तेथील किल्ले हे महाराजांनी घेतले. मोगल साम्राज्यातून घेतलेला हाच एक भाग होता. स्वराज्याच्या सुरक्षिततेसाठी म्हणून या भागाचा ताबा आपल्याकडे ठेवणे हा त्यांचा उद्देश होता.

मोगल साम्राज्याचा हा एक मोठा भाग आपण तोडून आपल्या राज्याला आपण जोडला, याचे परिणाम काय होतील याची महाराजांना पूर्ण जाणीव होती. मोगलांची सत्ता हिंदुस्थानभर पसरली होती. आपल्या साम्राज्याचा एक भाग तोडला जात आहे हे पाहात असता कोणतीही सत्ता स्वस्थ बसू शकेल हे कसे शक्य होते ? महाराजांना हे माहीत होते की मराठ्यांना नाशिक जिल्ह्यातून काढून लावण्यासाठी मोगल हे निकराने लढतीलच. महाराजांच्या प्रतिभेचा विशेषज्ञ असा की त्यांनी मोगलांना एकोणीस वर्षे लढण्यास लावले; तेव्हा कोठे ते स्वराज्यात शिरू शकले. स्वराज्यावरील हे आक्रमण सन 1689 मध्ये झाले. म्हणजे महाराजांच्या मृत्यूनंतर नऊ वर्षांनी आणि औरंगजेब दक्षिणेत आल्यानंतर आठ वर्षांनी.

विजापूरची गोष्ट अगदी निराळी होती. एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती ही की शिवाजीमहाराजांचे बहुतेक राज्य (नाशिक जिल्ह्यातील लहानसा मोगल

प्रदेश वगळता) विजापूर राज्यातूनच निर्माण झाले होते. महाराजांच्या ताब्यात पुणे आणि कोकण हे प्रदेश होते. महाराजांनी मोगलांशी पुरंदर येथे जो तह केला त्या अन्वये मोगलांनी त्याला विजापूर-बालाघाटमध्ये पुढील प्रदेशांचा समावेश होता. सध्याचे सातारा, सांगली आणि कोल्हापूर हे जिल्हे आणि बेळगाव, कारवार व धारवाड यांचे काही भाग.

अली आदिलशहाच्या मृत्यूमुळे विजापूरचे राज्य पुन्हा एकदा अस्थिरतेच्या भोवऱ्यात सापडले. पुन्हा पुन्हा उद्‌भवणाऱ्या हितशत्रूंच्या कारवायांमुळे हे राज्य विघटनेच्या दिशेने निश्चितपणे चालले होते. सिंकदर आदिलशहा हा चार वर्षांचा असताना गादीवर आला. त्यामुळे सत्तेवर निरनिराळ्या सरदारांत स्पर्धा सुरू झाली. पठाण जमातीच्या लोकांना गोवळकोंड्याच्या राजकारणात काही स्थान नव्हते. पण विजापूरच्या राजकारणात त्यांचे पारडे जड होते. त्यामुळे पठाणांच्या विरुद्ध सिद्दी आणि दक्षिणी मुसलमान हे एक झाले. ह्या लढ्यातून शेवटी राज्याची जवळ जवळ छकलेच पडली.

विजापूरचा मुख्य प्रधान अब्दुल मुहंमद याने राज्याचा कारभार बारा वर्षे चालविला होता. यापुढे कारभार करावा अशी त्याची इच्छा नव्हती. राज्याचा कारभार पुढीलप्रमाणे व्हावा यासाठी त्याने आदिलशहाची संमती मिळवली होती.

1. विजापूरचा माजी मुख्य प्रधान खान मुहंम्मदखाने खानान (सन 1648 ते 1657) याचा मुलगा खवासखान याने अल्पवयीन बादशहाचा पालक आणि राज्याचा कारभारी म्हणून काम पहावे.
2. अब्दुल मुहंम्मद याने नळदुर्ग आणि गुलबर्गा हे किल्ले आपल्या ताब्यात ठेवावे आणि आवश्यक असल्यास मोगलांच्या आक्रमणापासून विजापूरचे रक्षण करावे,
3. अब्दुल करीम बहिलोलखान हा विजापूरचा प्रमुख पठाण सरदार, त्याने पन्हाळा आणि मिरज ही आपल्या ताब्यात ठेवावी आणि शिवाजीमहाराजांविरूद्ध मोहीम चालू ठेवावी.
4. मुजफ्फरखान याच्याकडे कर्नाटकचा प्रदेश देण्यात आला.

शिवाजीमहाराज अशा संधीचीच वाट पाहात होते. त्यांनी ताबडतोब विजापूरवर आघात केला. त्यांनी पन्हाळागडच्या बळकट किल्ल्यावर हल्ला चढविला आणि सन 1673 च्या 6 मार्च रोजी तो त्यांनी जिंकून घेतला. ते पन्हाळगड येथे महिनाभर राहिले तेथून त्यांनी विजापूरच्या मोहिमेचे संचालन केले. परळीचा किल्ला हा सन 1673 च्या एप्रिल मध्ये हाती (महाराजांच्या) आला. समर्थ

रामदासांचे वास्तव्यस्थान करण्यासाठी म्हणून पुढे हाच किल्ला सज्जनगड या नावाने प्रसिद्ध झाला. साताऱ्याचा किल्ला महाराजांच्या हाती 27 जुलै रोजी आला. या आक्रमणाबद्दल विजापूरची प्रतिक्रिया अतिशय तीव्र झाली हे सांगणे नकोच. पन्हाळगड जिंकून घेणे आणि उमराणीची लढाई या विषयावर समकालीन साधने दोन उपलब्ध आहेत. विजापूरचा राजकवी नुस्त्रती याने दक्षिणी उर्दूत लिहिलेले *काव्य* हे एक, आणि राधा-माधव-विलास-चंपू या सुप्रसिद्ध ग्रंथाचा लेखक जयराम पिण्डये याचे *संस्कृत आख्यान* हे दुसरे.

शिवाजीमहाराजांच्याकडून हे जे संकट निर्माण झाले होते त्याला तोंड देण्यासाठी खवासखानाने मोठी तयारी केली होती. जयराम म्हणतो, ''बादशहाचा निरोप घेऊन बहिलोलखान हा तिकोटा येथे आला. दोन दिवसांनंतर तो उमराणी येथे होता. (विजापूरच्या पश्चिमेस 58 कि.मी.) त्या सुमारास शर्जाखान आणि मुजफ्फर मलिक हे रांगण्याच्या किल्ल्यानजिक छावणी घालून होते. मुख्य प्रधान खवासखान याने बहिलोलखानाला कळविले की 'तुम्ही त्यांना आपल्या मदतीसाठी बोलवा.' विजापूरचे इतर सरदार म्हणजे अधोनीचा शिद्दी मसूद, कर्नूलचा अजीज, आणि नळदुर्गचा खिज्रखान पन्नी, हे होत. मुख्य प्रधान खवासखान याने त्यांना सांगितले, ''तुम्ही मोगल सेनापती दिलेरखान याच्याशी संपर्क साधा आणि त्याला भेटी वगैरे देऊन माणसे आणि शस्त्रे यांच्याद्वारे आपल्याला मदत करण्यासाठी त्याचे मन वळवा.''

शिवाजीमहाराजांच्यावर हल्ला करण्याची विजापूरने योजना केली. शिवाजीमहाराजांचे धोरण असे होते की आपल्याविरुद्ध ते दोन शत्रूंना कधीही एकत्र होऊ देत नसत. बहलोलखानाचे इतर सरदार त्याला येऊन मिळण्याच्या आधीच त्याने त्याच्यावर (बहलोलखान) हल्ला करण्याचे ठरविले. महाराजांच्या सूचनेप्रमाणे त्यांचा मराठा सेनापती हा बहलोलखानावर सन 1673 मार्चमध्ये चालून गेला. या युद्धाची वर्णने जयराम पिण्डये, सभासद, आणि नुस्त्रती यांनी दिली आहेत. त्यावरून लढाई घनघोर झाली असे दिसते. मराठ्यांनी बहलोलखानाच्या सैन्याला चहूंकडून कोंडले. विजापूरच्या सैन्याला जवळच्या जलाशयातून पाण्याचा पुरवठा होत होता. त्या सैन्याची तिकडची ये-जा मराठ्यांनी बंद पाडली. ही निकराची लढाई संध्याकाळपर्यंत चालली होती. उभय दलांची जबर हानी झाली. संध्याकाळच्या सुमारास बहलोलखानाच्या सैन्याने कसोशीचा प्रयत्न करून जलाशय गाठला.

त्यानंतर कदाचित एखाद्या गुप्त तडजोडीमुळे असो, रात्रीच्या वेळी मराठे

तिकडून निघून गेले. बहलोलखानाला का जाऊ दिले असे म्हणून शिवाजीमहाराजांनी आपला सेनापती प्रतापराव गुजर याला दूषणे दिली. बहलोलखानाला असे निसटून जाऊ देण्यात प्रतापराव गुजर याला कारणेही तशीच घडली असावीत. मराठ्यांच्या सैन्यात हानीही मोठी झाली असली पाहिजे. कदाचित बहिलोलखानाच्या मदतीसाठी इतर सैन्ये येत असावीत.

मराठे हे इक्षिणेकडे वळले आणि त्यांनी हुबळी शहरावर हल्ला केला. हा हल्ला एप्रिलच्या दुसऱ्या आठवड्यात झाला. शहराच्या लुटालुटीत ब्रिटिशांच्या एका वखारीचे थोडेसे नुकसान झाले. यापूर्वी राजापूरवरील हल्ल्यात त्यांच्या वखारीचे नुकसान झाले होते. त्यामुळे राजापूर आणि हुबळी येथील झालेल्या नुकसानीच्या भरपाईचे प्रकरण धसास लावण्यासाठी ब्रिटिशांनी आपल्यातर्फे थॉमस निकोल्स याला शिवाजीमहाराजांच्याकडे पाठविले. खानदेशातही ब्रिटिशांच्या वखारीचे नुकसान झाले होते.

महाराजांच्याकडे ब्रिटिशांनी पाठविलेले दूत यांच्या आणि महाराजांच्या गाठीभेटी, बोलणीचालणी या सन 1673 च्या 19 मे पासून 17 जून पर्यंत चालल्या होत्या. त्याची तपशीलवार वर्णने आपल्याला मिळतात. यापूर्वी डच लोकांनी शिवाजीमहाराजांना पुढीलप्रमाणे सुचविले होते. शिवाजीमहाराजांनी 3 हजार सैन्यानिशी मुंबईवर हल्ला करावा. त्याचवेळेला रिक्लॉफ व्हॅन गोएन्स याच्या नेतृत्वाखाली डचांचे आरमार मुंबईचे बंदर आणि मुंबईचा किल्लाही जिंकून घेईल.[1] या मोबदल्यात दंड राजपुरी (जंजिरा) जिंकून घेण्यास डचांनी महाराजांना आपली मदत देऊ केली. शिवाजीमहाराजांनी डचांची सूचना झिडकारली. त्यापूर्वी त्यांनी त्या सूचनांचा अतिशय काळजीपूर्वक विचार केला असेल यांत शंकाच नाही. वरील गोष्टी ब्रिटिशांच्या कानांवर गेल्याच असल्या पाहिजेत. आणि त्यामुळे महाराजांच्याकडे आपला एखादा दूत पाठविणे बरे असे त्यांना वाटले असले पाहिजे. निकोल्सची शिष्टाई ही एका कारणामुळे आपल्याला उद्बोधक वाटते. महाराजांच्या व्यक्तित्वावर आणि विचारसरणीवर या प्रसंगातून बराच प्रकाश पडलेला आपल्याला आढळून येतो. पण तसे पाहिले तर निकोल्सची शिष्टाई ही यशस्वी झाली असे काही म्हणता यावयाचे नाही.

परकीय लोकांशी बोलताना-वागताना आणि धोरणे व बोलणी ठरविताना शिवाजीमहाराज हे अत्यंत सावधगिरी आणि दक्षता बाळगीत. लाकूड फाटा

---

1. *इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी,* 28 मार्च 1673, पृ. 240

इत्यादीच्या निर्यातीवर करआकारणीपासून सूट अशा किरकोळ बाबी मान्य झाल्या. पण राजापूर व हुबळी येथील झालेल्या नुकसानाच्या भरपाईची प्रकरणे रेंगाळत ठेवण्यात आली.

अशा प्रकारच्या प्रकरणांत कोणीही शहाणा सत्ताधीश वागेल अशीच महाराजांची वागणूक होती. कांही झाले तरी मराठे आणि मोगल यांचे आपसात युद्ध चालू होते. मोगलांच्या इलाख्यात मराठ्यांनी केली तर नुकसान-भरपाईची मागणी मोगलांकडे करावी, मराठ्यांकडे नाही. त्यामुळे शिवाजीमहाराज हे ब्रिटिशांच्या मागण्या मान्य करतील हे शक्यच नव्हते. इ.स. 1660 मध्ये पन्हाळगडच्या वेढ्याच्या प्रसंगी ब्रिटिशांनी शिद्दी जौहरला शस्त्रे आणि दारुगोळा यांनी कशी मदत केली हे महाराज विसरले नव्हते. मराठे आणि शिद्दी यांच्या संघर्षात ब्रिटिश आणि पोर्तुगीज हे शिद्यांच्या बाजूने असत, याचीही महाराजांना जाणीव होती. आपल्या शेजारी एक प्रबळ मराठी राज्य उदयाला आले आहे याचा त्यांना (ब्रिटिश) आनंद वाटत नव्हता हे स्पष्ट आहे. शिवाजीमहाराज हे ब्रिटिशांना आपल्या राज्यात व्यापार करू देत पण त्यांचा मुख्य हेतू मराठी राज्याच्या हिताचे रक्षण करणे हाच होता हे नैसर्गिक होय.

## मोगल

मराठ्यांनी हुबळीवर हल्ला केला त्यावेळी तातडीने हुबळीला येऊन पोहोचण्याच्या ऐवजी मुजफ्फरखान याने मोठी दिरंगाई केली. या अपराधाबद्दल विजापूर राज्याने त्याला फजित केले. त्याच्या हातून सर्व सत्ता काढून घेण्यात आली. त्याचा परिणाम असा झाला की मुजफ्फरखान हा राज्याविरुद्ध बंड करून उठला. कारवारचा नायब सुभेदार मियाँसाहेब यानेही बंड केले. अशा अनावर पुंड बंडखोरांना आवर घालण्याच्या प्रयत्नात विजापूरची शक्ती खर्ची पडू लागली. बहलोलखान याने कोल्हापूरजवळ ठाण मांडले होते. तो एकटाच मराठ्यांच्या विरुद्ध धावती लढाई लढत होता. महाराजांनी कोल्हापुरात आपले पाय भक्कम रोवले होते. तेथून ते शेजारील कर्नाटकच्या जिल्ह्यातून मोहिमा करू लागले. जेधे शकावलीतील नोंदीप्रमाणे सन 1673 च्या 10 ऑक्टोबर रोजी महाराजांनी बंकापूर (धारवाड जिल्हा) लुटले.

शिवाजी महाराज हे एकट्याने विजापूर आणि मोगल ह्या दोघांशीही झुंज देत होते. मुंबईकर ब्रिटिश यांच्यावर ह्या गोष्टीचा मोठा परिणाम झालेला दिसतो. ते लिहितात, ''लोक म्हणतात तशी कांही शिवाजीमहाराजांची परिस्थिती शोचनीय

नाही. उलट तो शत्रूला तुच्छ समजतो. आपल्या सर्व शत्रूंच्या विरुद्ध तो मोठ्या मर्दुमकीने सामना देत आहे."[1]

औरंगजेबाच्या दृष्टीने वायव्य प्रांतातील प्रकरणे काही औरंगजेबाच्या मनासारखी व्यवस्थितपणे पार पडत नव्हती. काबूलचा सुभेदार मुहम्मद अमीन याची फजिती करून पठाणांनी सन 1672 च्या 6 मे रोजी त्याचा पराभव केला होता. औरंगजेबाने त्याच्या जागेवर महाबतखान याची नेमणूक केली होती. पेशावरकडे सैन्य घेऊन जाणारा दुसरा मोगल सेनापती म्हणजे राद अंदाजखान हा होय. पठाणांची बंडे मोडण्यासाठी बादशहाचे आदेश घेऊन तो सन 1673 मध्ये 17 नोव्हेंबर रोजी पेशावरकडे निघाला. पठाणांनी त्याच्यावरही हल्ला केला आणि सन 1674 च्या 24 फेब्रुवारी रोजी त्याला ठार मारले. काबूल प्रांतातील या अनिष्ट घटनांमुळे औरंगजेब मोठा चिंताग्रस्त झाला.

दक्षिणेतील मोगल सेनापती बहादूरखान याने महाराजांना अडविण्याचे आणि आवरण्याचे कसून प्रयत्न केले. तो मधून महाराजांच्या राज्यामध्ये आक्रमणेही करीत असे. अशाच एका लढ्याची हकीकत भीमसेन सक्सेना देतो. तो म्हणतो, "यावेळी बातमी आली की पुणे प्रांतात मराठ्यांचा मोठा जमाव झाला आहे. आपले भारी सामान आणि लवाजमा हो चांभारगोंदा येथे ठेवून बहादूरखान हा मराठ्यांच्या पाठलागावर निघाला. पुढे झालेल्या युद्धात शुभकर्ण बुंदेला हा मोठ्या शौर्याने लढला. मराठ्यांचा मोड झाला." साकी मुसैदखानाने लिहिलेले औरंगजेबाचे चरित्र *मासिरे आलमगिरी*,[2] यातील संदर्भावरून पाहाता ही लढाई सन 1673 च्या सप्टेंबर महिन्यात केव्हातरी झाली असावी. बहादूरखानाचा सहाय्यक सरदार नामदारखान हा बागलाणचा फौजदार होता. त्याने औरंगजेबाला पत्र लिहून आपण साल्हेरनजिक मराठ्यांचा पराजय केला अशी बढाई मारली आहे. पत्रातील अंतर्गत पुराव्यावरुन ती लढाई सन 1673 च्या 3 जून रोजी झालेली दिसते.

## नेसरीची लढाई

नेसरीच्या लढाईत शिवाजीमहाराजांचा तडफदार सेनापती प्रतापराव गुजर हा मरण पावला. महाराजांना त्याच्या मृत्यूचे मोठे दुःख झाले. उमराणीच्या लढाईत बहलोलखानाला निसटून जाऊ दिले म्हणून महाराजांनी प्रतापरावाला दोष दिला

1. *इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी*, पृ. 283
2. *मासिरे आलमगिरी*

होता. महाराजांचे शब्द प्रतापरावाच्या जिव्हारी लागले. त्यांनी अविचारी धाडस करुन नेसरीच्या मुक्कामी सन 1674 मध्ये 24 फेब्रवारी रोजी बहलोलखानाच्या छावणीवर हल्ला केला. जे घडावयाचे तेच झाले. या हल्ल्यात प्रतापराव मारला गेला.

सन 1674 च्या एप्रिलमध्ये प्रतापराव गुजरच्या जागी मराठी सैन्याचा सेनापती म्हणून हंबीरराव मोहिते याची नेमणूक झाली. यापूर्वीच प्रतापराव गुजरच्या दुय्यम सेनापतीने भोवतालच्या विजापूर प्रदेशात आक्रमण करण्यासाठी सैन्य जमविले होते. बहलोलखान हा आनंदरावाचा पाठलाग करू लागला. दिलेरखानाच्या नेतृत्वाखाली मोगलही बहलोलखानाला जाऊन मिळाले. ब्रिटिशांचा गुमास्ता नारायण शेणवी याने सन 1674 च्या 4 एप्रिल रोजी एक पत्र लिहिले आहे. त्यांत त्याने वरील घटनेचे तपशिलवार वर्णन केले आहे. आपल्या पत्रात त्याने म्हटले आहे: [1] ''दिलेरखान आणि बहलोलखान हे आनंदरावशी लढण्यासाठी त्वरेने रवाना झाले. पण असे दोन मातबर शत्रू समोर आलेले पाहून आनंदराव त्यांच्याशी लढू शकत नव्हता. त्यामुळे कर्नाटकच्या पश्चिम दिशेने (कारवार वगैरे). तो रोज 15 लीगची (सुमारे 72 कि.मी.) मजल मारी. ते दोघे सरदार (बहलोलखान, दिलेरखान) त्याचा पाठलाग करीत होते. पण पुष्कळ दिवस धावपळ करूनही त्यांना काही फळ मिळाले नाही. ते पाठलागच करीत राहिले. त्यामुळे ते सरदार परत आले. दिलेरखान हा पन्हाळ्याला पायथ्याशी गेला. पन्हाळ्याला वेढा घालावा हा त्याचा हेतू; तेथे तो फक्त पाचच दिवस राहिला आणि नंतर आपल्या पूर्वीच्या छावणीकडे परत गेला. बहलोलखान हा कोल्हापूरला गेला. आनंदराव हा प्रदेशातून संचार करीत होता. त्याने बंकापूर (धारवाड जिल्हा) पासून आठ लीग (सुमारे 40 कि.मि.) अंतरावर असलेले पेच हे गाव लुटले. पेच हे गाव बहलोलखानाच्या जहागिरीत आहे. त्या गावाची लूट तीन हजार बैलावर लादून आनंदराव हा परत येत होता. ही बातमी बहलोलखान आणि खिज्रखान यांना कळली. त्यांनी आपले सगळे सैन्य घेऊन आनंदरावाला अडविण्याचा प्रयत्न केला. उभय दळांची गांठ बंकापूरजवळ पडली. मोठी घनघोर लढाई झाली. आनंदराव विजयी झाला. या लढाईत बहलोलखानाचा भाऊबंद आणि खिज्रखानाचा भाऊ हा मारला गेला. आनंदरावने शत्रूचे सर्व सैन्य लुटले, आणि सैन्यातील लूट म्हणून पाचशे घोडे आणि दोन हत्ती हे इतर लुटीबरोबर तो घेऊन आला. बहलोलखान आणि खिज्रखान हे पळून गेले. आनंदराव परत आला. आणलेली सर्व लूट त्याने शिवाजीपाशी दिली.

1. *इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी*

आता तो आणखी गावे लुटण्यासाठी बालाघाटकडे गेला आहे.''

वरील पत्रात कोकणात उतरण्याच्या मोगल मनसुब्याचा उल्लेख पुढील शब्दांत आला आहे, ''कोकणात उतरावे असा बहादूरखानाचा निश्चितच हेतू होता, पण त्याला पुढील गोष्ट कळली. राजा शिवाजी याने घाटाचे रस्ते बंद केले आहेत. त्याने रस्ते तोडून टाकले आहेत. डोंगरांतून जाणाऱ्या वाटा नाहीशा केल्या आहेत. घाटाच्या कठीण मार्गावर कडक चौकी-पहारे बसविले आहेत. हे पाहून तो जेथून आला होता तेथे परत गेला.''

सन 1674 एप्रिलच्या नारायण शेणवीच्या वरील पत्रावरून आपल्याला मराठे आणि मोगल यांच्या एका आरमारी युद्धाचीही माहिती मिळते. हे युद्ध मोगलांच्या आरमाराचा अधिकारी शिद्दी संबूल आणि मराठा आरमाराचा अधिकारी दौलतखान यांच्यामध्ये झाले. नारायण शेणवी याला ही बातमी प्रत्यक्ष शिवाजी महाराजांनी सांगितली. ब्रिटिशांना लिहिलेल्या पत्रात त्यांचा हा गुमास्ता नारायण म्हणतो: ''शिद्दी संबूलविषयी मी जी काही बातमी ऐकली ती मी आपल्याला थोडक्यात सांगतो. त्याने दौलतखानाच्या आरमाराशी युद्ध केले हे युद्ध सांतोली (सातवली, राजापूर) नदीवर झाले. या युद्धात शिद्द्यांची शंभर माणसे मारली गेली आणि दौलतखानाची चव्वेचाळीस माणसे मारली गेली. दौलतखानाचा (मराठा आरमाराचा अधिकारी) विजय झाला, पण दौलतखानाला बाण लागल्यामुळे तो जखमी झाला. बातमी अशी आहे की, शिद्दी संबूललाही अशाच जखमा झाल्या. आणि त्याचे हात जळले आहेत. त्या नदीतील युद्धात त्याला यश न मिळाल्यामुळे तो वेशिंगजवळ हरेश्वर येथे गेला आहे. ही बातमी स्वत: शिवाजीने मला सांगितली.''

ब्रिटिश आणि शिवाजीमहाराज यांच्यातील तहाची बोलणी सन 1674 मध्ये यशस्वीपणे पार पडली. तहावर शिक्कामोर्तब करून घेण्यासाठी ब्रिटिशांनी महाराजांकडे हेन्सी ऑक्सिंडन याला पाठविण्याचे ठरविले. हे शिक्कामोर्तबीचे काम 12 जून 1674 रोजी उरकण्यात आले. राजापूरचे प्रकरण समाधानकारक रीतीने निकालात काढण्यात आले, याचा ब्रिटिशांना आनंद झाला. आपल्या राज्यात त्यांनी व्यापार करावा, अशी परवानगी महाराजांनी ब्रिटिशांना सन 1674 च्या 6 एप्रिलच्या कौलनाम्याअन्वये दिली. शांतता, एकोपा आणि मैत्रीच्या या तहनाम्यातील उभय पक्षांचे वर्णन करताना ब्रिटिश इस्ट इंडिया कंपनीला ऑनरेबल म्हणजे माननीय असे म्हटले आहे. तर शिवाजीमहाराजांना *द नोबल प्रिन्स शिवाजीराजा* (उदात्त नृपती शिवाजी राजे) असे म्हटले आहे. महाराजांच्या विषयी सुरूवातीस ते लुटारू आहेत असा ब्रिटिशांचा ग्रह होता. आणि आता

ते हेच ब्रिटिश त्यांना उदात्त नृपती म्हणू लागले. केवढे हे स्थित्यंतर! आपल्या सुरूवातीच्या भूमिकेपासून सरकत ब्रिटिशांनी किती लांब पल्ला गाठला होता! जंजिऱ्याचे शिद्दी आणि शिवाजीमहाराज यांच्यामध्ये आपण मध्यस्थी करून देऊ याची ब्रिटिशांनी तयारी दाखविली. पण शिवाजीमहाराज हे दूरदृष्टीचे मुत्सद्दी. त्यांनी ब्रिटिशांची सूचना दृढपणे नाकारली. शिद्यांना धडा शिकवावयाचाच असा निर्धारच महाराजांनी केला होता. शिद्यांपासून दूर रहा आणि त्यांना उघड अगर गुप्त मदत करण्याचे थांबवा असा इशाराही महाराजांनी ब्रिटिशांना दिला. ब्रिटिशांनी शहाणपण दाखविला. त्यांनी आपले विचार आपल्यापाशीच ठेवले. ते गप्प बसले.

विजापूर राज्यातील कारवार प्रांतांत त्या राज्याविरुद्ध बंडे उभी राहिली होती. ती बंडे मोडण्यात विजापूरची सगळी शासनयंत्रणा गुंतली होती. हे बंड सन 1674 च्या एप्रिलमध्ये संपुष्टात आले. बंडखोर सरदार मियाँखान याच्याकडून विजापूर राज्याने काद्रा, कारावार, अंकोला, आणि शिवेश्वर ही स्थाने जिंकून घेतली. या प्रदेशावर सुभेदार म्हणून रुस्तमे जमान याची नेमणूक करण्यात आली. अशा परिस्थितीत शिवाजी महाराजांविरुद्ध आक्रमक पवित्रा घेण्यासाठी विजापूरची कुवत नव्हती.

या दरम्यानच्या काळात हिंदुस्थानच्या वायव्य प्रांतातील पठाण टोळ्यांची बंडे यांनी अतिशय गंभीर स्वरूप धारण केले होते. पठाणांशी लढत असताना राद अंदाजखान (शुजातखान) हा सन 24 फेब्रुवारी 1674 मध्ये मारला गेला होता. मोगल सैन्ये वायव्य प्रदेशात तांतडीने पाठविण्यात आली. औरंगजेब स्वत: सन 1674 च्या 7 एप्रिल रोजी तिकडे जाण्यास निघाला. दक्षिणेचा मोगल सुभेदार बहादूरखान ह्याने आपले उत्तम अधिकारी उत्तरेकडे पाठविले. त्यात दिलेरखान हाही होता. मोगलांच्या हालचाली (दक्षिणेत) मंद झाल्या. गोवळकोंड्यातील राज्यक्रांतीचा परिणाम हा झाला की तेथील सत्ता आंध्रांच्या हातात आली. त्यामुळे गोवळकोंडा हे राज्य मराठ्यांच्या निकट आले. आपला नाश करण्याची योजना मोगलांनी पक्की आखली आहे ह्या भीतीने गोवळकोंड्याच्या राज्याने मराठ्यांशी घनिष्ठ असे संबंध जोडले. मोगलांच्या विरुद्ध दक्षिणेतील सत्तांची एकजूट पूर्वी कधीही नव्हती तितकीच आता अस्तित्वात येऊ लागली.

शिवाजी महाराजांचे राज्य आता सलग झाले होते. त्यांच्या हाताखाली एक कसलेले आणि सुसज्ज सैन्य उभे राहिले होते. मोगल निष्क्रीय होते. विजापुरात गोंधळ माजला होता. गोवळकोंड्यांशी स्नेह जुळला गेला होता, पोर्तुगीज दुर्बळ होते

आणि ब्रिटिश वचकून चांगले वागत होते. असे होते सन 1674 च्या दक्षिणेचे चित्र!

औरंगजेब हा दिल्लीहून निघून वायव्य प्रांताकडे चालला होता. रावळपिंडीजवळ हसन अब्दाल या मुक्कामाच्या वाटेला तो लागला होता. त्या दिवशी तारीख होती 6 जून 1674. त्या दिवशी शिवाजीमहाराजांनी राज्याभिषेक करून घेऊन आपण स्वतंत्र राजे आहोत अशी घोषणा केली.

# 8

## राज्याभिषेक आणि नंतर

**शिवाजीमहाराजांचा** राज्याभिषेक म्हणजे भारताच्या इतिहासातील एक लक्षणीय घटना आहे. मोगल सत्तेच्या काळात भारतातील मोगल साम्राज्य म्हणजेच भारतीय सरकार असे समीकरण भारतीय आणि परकीय, असे दोघेही करीत. मोगलांशी आंतरराष्ट्रीय तहनामे आणि करार जे होत ते हिंदुस्थानाशी झाले असे समजण्यात येई. श्रेष्ठ मोगल *(द ग्रेट मोगल)*, मोगल सम्राट, *(द एम्परर ऑफ इंडिया)*, भारताचे सम्राट असे शब्द त्या काळच्या आंतरराष्ट्रीय कागदपत्रांत सहजपणे वापरले जात.

भारताच्या कोनाकोपऱ्यातील म्हणजे दक्षिणेतील केरळ आणि किनारपट्टीवरील युरोपीयनांच्या लहान वसाहती सोडता हिंदुस्थानात स्वतंत्र म्हणता येईल असे एकही राज्य नव्हते. भारताच्या बव्हंश प्रदेशावर मोगल आसनाचा रास्त अंमल होता. काही राज्ये वगळण्यात आली; ती म्हणजे उत्तरेतील रजपूत राज्ये, किंवा दक्षिणेतील विजापूर आणि गोवळकोंडा ही राज्ये होत. रजपूत राज्यांची स्थिती खालावत खालावत जहागिरी किंवा जमीनदाऱ्या अशा स्वरूपाची राहिली होती. आम्ही वाडवडिलांपासून येथे आहोत, ह्या हक्कावरच तेथील राजांना गादीवर हक्क सांगता येत नव्हता. कोणी राजा मेला तर त्याच्या वारसाला मोगल सम्राटांकडून रीतसर मान्यता मिळावी लागे. कारण कुणीही राजा मेला तर त्याच्या मृत्यूबरोबर त्याचे राज्य मोगल साम्राज्यात परत गेले (लॅप्स) असे तत्वतः समजले जाई. तेच राज्य जेव्हा वारसाला परत देण्यात येई तेव्हा ते वंशपरंपरा समजले जात नसे तर ते नव्याने दिलेले राज्य असे समजले जाई. हेतू असा की कुणालाही वडिलार्जित हक्क सांगता येऊ नये. आणि हे राज्य मोगल सम्राटाच्या कृपेचे फळ आहे अशी त्याला जाणीव व्हावी. गादीवर येण्याची वारसाला मान्यता मिळाल्यावर राजाची नेमणूक एखाद्या मनसबीवर करण्यात येत असे. ही मनसब म्हणजे मोगल साम्राज्यातील नोकरीच होय. याचा अर्थ असा होई की आवश्यक असेल तेव्हा त्या राजाला आपल्या राज्याबाहेर साम्राज्यात कोठेही नोकरी करावी लागेल. त्यांच्या बदल्याही होत. ह्या

रजपूत राजांच्या बदल्या किल्ल्यांचे किल्लेदार म्हणून, कधी लष्करी ठाण्यांचे ठाणेदार म्हणून कधी दुय्यम सेनापती म्हणून तर कधी सेनापती म्हणून होत. एखादा मानसिंह ओरिसा जिंकून घेईल आणि बंगाल ताब्यात आणील; एखादा जयसिंग शिवाजीमहाराज अगर विजापूर यांच्याविरूद्ध मोहिमांचे नेतृत्व करील, एखादा जसवंतसिंग गुजरातचा सुभेदार होईल, पण ही उदाहरणे अपवादात्मक होत; नियम म्हणून नव्हे. बहुतेक राजपूत राजांच्या वाट्याला साधारणच नोकऱ्या आल्या.

वरील परंपरेला अपवाद उदयपूरचाही नव्हता. अमरसिंगाच्या काळापासून उदयपूरने मोगलांचे सार्वभौमत्व स्वीकारले होते. उदयपूरच्या महाराण्याला फक्त एक सवलत मिळाली होती; ती म्हणजे मोगल दरबारात हजर राहण्याची त्याला माफी होती. महाराण्याला मोगल सैन्यात मनसब होती. उदयपूर राजघराण्यातील राजपुत्र हे इतरांप्रमाणे मोगलांच्या हाताखाली चाकरी धरीत आणि करीत. उदयपूरच्या सैन्याची पथके दक्षिणेतील मोगल चाकरी बजावीत. रजपूत राज्यांचा उल्लेख मोगल कादगपत्रांत वतन, जहागिर असा येतो. मोगलांच्या मनसबदारी पद्धतीमुळे रजपुतांची राज्ये लहान होऊ लागली; त्यांची स्वायत्तता संकुचित होऊ लागली. आणि राजपुतांच्या निष्ठा दुभंगू लागल्या. शिवाजीमहाराजांच्या समोरही असाच पेचप्रसंग उद्‌भवत होता. संभाजीराजानी मोगलांच्या हाताखाली मनसब मिळवली. मोगलांच्या सत्ताधारी वर्गातील बहुसंख्य लोक मध्य आशिया आणि इराणमधील होते. ज्यांना भारतीय म्हणू असे लोक फार थोडे होते. मनसबदारांत भारतीय म्हणू असे लोक फार थोडे होते. मनसबदारांत भारतीय मुसलमानांची संख्यासुद्धा शेकडा फार कमी होती. मोगल सत्ताधाऱ्यांना आपण तुर्क वंशाचे आहोत याची जाणीव असे. शहाजहानच्या काळात त्यांनी मध्य आशियामध्ये शिरकाव करून घेण्याचा प्रयत्न केला. पण त्यांचे उद्देश तडीस गेले नाहीत.

वायव्य प्रांतात, पूर्वेकडे आसामात आणि दक्षिणेत औरंगजेबाची पिछेहाट झाली होती. त्यामुळे आपल्या सत्तेचे बळ जोपासण्यासाठी त्याने उदारवादी लोकांकडे पाठ फिरविली आणि तो कर्मठ, कट्टर आणि पोथीनिष्ठ लोकांच्यावर अवलंबून राहू लागला. याचा परिणाम असा झाला की त्याने अनेक नियम, आदेश, आज्ञा भराभर काढण्यास सुरूवात केली. ज्या दिशेने त्याने पावले उचलली ती पाहून सत्ताधारी आणि प्रजा यांच्यामध्ये खोल दरी निर्माण झाली. मोगलांची बातमीपत्रे, फारसी भाषेत लिहिले गेलेले समकालीन इतिहास, बखरी आणि भारतीय भाषांतील प्रचंड वाङ्मय, ह्या सर्व साधनांतून सत्ता आणि प्रजा यांच्यातील दुराव्याचे दर्शन आपल्याला घडते. पठाण, शीख, जाट, बुंदेले, आणि मराठे हे सत्तेच्या विरूद्ध ठाण

मांडून उभे राहिले. रजपुतांच्या विरूद्ध संघर्ष काही वर्षातच सुरू होणार होता. लोकांच्या भावनांची अजिबात कदर करायची नाही या वागण्याने मुत्सद्दी म्हणून औरंगजेब मोठ्या अपयशाचा धनी का झाला याची कल्पना येते.

## 'हिंदवी स्वराज्य'

शिवाजीमहाराजांनी आपला राज्यभिषेक करून घेतला आणि ते स्वतंत्र असे छत्रपती राजे झाले. ही घटना म्हणजे भारताच्या कानाकोपऱ्यातून भारतीय जनता उठून उभी राहिली या गोष्टीचे द्योतक होय. उद्देश होता हिंदवी स्वराज्याचा, म्हणजे भारतात भारतीय राज्याचा. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनात 'हिंदवी स्वराज्य' हा शब्द अनेक वेळा वापरला गेला आहे.

शिवाजी महाराजांनी अनेक प्रदेश जिंकून घेतले असले तरी सन 1674 पर्यंत तांत्रिक दृष्टीने ते मोगल सम्राटाच्या प्रजाजनांपैकी होते. मोगलांची चाकरी बजावणारे मातब्बर मराठे सरदार काय किंवा विजापूरचे बादशहा काय हे महाराजांना अद्यापही आदिलशहापेक्षा दर्जाने कमी लेखीत. महाराजांनी आपल्या कर्तबगारीने जे स्थान मिळविले होते त्याला कायदेशीर स्वरूप देणे आवश्यक होते. राजेशाही स्थापन करण्याची गरज होती. शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक झाला पाहिजे ही इच्छा प्रजेच्या सर्व वर्गात पसरली होती. या सार्वजनिक भावनांना वाट करून देण्याचे काम थोर ब्राह्मण पंडित, वाराणशीचे विश्वेश्वर उर्फ गागाभट्ट यांनी केले. महाराजांचा चरित्रकार, सभासद हा राज्याभिषेक प्रसंगी हजर होता. तो लिहितो :

*"पुढे वेदमूर्ती गागाभट्ट म्हणून वाराणशीहून राजियाची कीर्ति ऐकून दर्शनास आले. भट गोसावी यांचे मते, मुसलमान बादशाहा तक्तीं बसून, छत्र धरून, पातशाही करितात, आणि शिवाजीराजे यांनीहि चार पादशाही दबविल्या. आणि पाऊण लाख घोडा लष्कर गडकोट असें (मेळविलें) असता त्यांस तक्त नाही. या करिता मऱ्हाठा राजा छत्रपती व्हावा असे चित्तांत आणिले. आणि, (तें) राजियांसहि मानिले. अवघे मातब्बर लोक बोलावून आणून विचार करिता सर्वांचे मनास आलें तेव्हां भट गोसावी म्हणू लागले की, तक्ती बसावें!"*

स्वतंत्र राज्याची स्थापना हे शिवाजी महाराजांचे ध्येय होते. मोगलांशी त्यांचे चाललेले युद्ध सन 1670 मध्ये सुरू झाले. ते सतत चालू होते. यावरून त्यांच्या निर्धाराची कल्पना यावी. राज्याभिषेकानंतर महाराजांनी आपली नाणी पाडली, आणि स्वत:चा शक चालू केला. या दोन्ही गोष्टी म्हणजे त्यांच्या स्वतंत्र राज्याची

चिन्हेच होत. पुढे बुंदेला छत्रसाल यानेही महाराजांचे अनुकरण केले. शिवाजी महाराजांनी त्याला शस्त्रविद्या शिकविली होती. आणि त्याला आशीर्वाद दिला होता. छत्रसालाने मध्यभारतातील बुंदेल खंडात स्वराज्याची स्थापना केली आणि शिवाजी महाराजांचे अनुकरण म्हणून त्याने इ. स. 1687 मध्ये राजा म्हणून राज्याभिषेक करवून घेतला.

पुढे 19 मे, 1674 रोजी शिवाजीमहाराजांनी प्रतापगडला भेट दिली. आणि देवी भवानीचे दर्शन घेतले. त्यावेळी त्यांनी देवीला सोन्याचे छत्र अर्पण केले. छत्राचे वजन 3 मण होते आणि त्याची किंमत 56 हजार रूपये होती.

शिवाजी महाराज हे क्षत्रिय होते. दरम्यानच्या काळातील राजकीय घालमेलीमुळे क्षत्रियांनी पाळावयाचे संस्कार लुप्त झाले होते; त्यामुळे प्रथम उपनयनाचा संस्कार करण्याची आवश्यकता होती. त्यानंतर महाराजांचे तुलादान झाले. त्यानंतर श्री विष्णूच्या सुवर्णमूर्तीचे दान (तुला पुरूषदान) करण्यात आले. त्यानंतर महाराजांचा आपल्या पत्नींशी दुसऱ्यांदा विवाह समारंभ करण्यात आला. हे सगळे समारंभ 29 आणि 30 मे ह्या दिवशी झाले.

ब्रिटिशांचा वकील हेन्री ऑक्सिंडन हा रायगडावर त्यावेळी हजर होता. महाराजांच्या तुलादानासंबंधी तो लिहितो:

''आज हिंदूच्या पद्धतीप्रमाणे राजाचे सोन्यानाण्यात तुलादान करण्यात आले. ही रक्कम 60 हजार पॅगोडा इतकी भरली. पुढे या रकमेत आणखी 1 लाखाची भर घालण्यात येणार आहे. येथे शेजारील देशोदेशींहून मोठ्या संख्येने ब्राह्मण जमले आहेत. राज्याभिषेकानंतर ही रक्कम त्यांच्यात वाटण्यात येणार आहे.'' राज्याभिषेकाचा समारंभ संपूर्णपणे वैदिक पद्धतीने पार पाडण्यात आला. सन 1674 च्या 6 जूनच्या सकाळी शिवाजी महाराज हे सिंहासनारूढ झाले. तो दिवस खरोखरीच संस्मरणीय होय. सभासदाचे पुढील वर्णन प्रत्ययकारी वाटते:

*''तक्त सुवर्णाचे, बत्तीस मणाचे, सिद्ध करविले. नवरत्ने अमोलिक जितकी कोशांत होती त्यामध्ये शोध करून मोठी मोलाची रत्नें तक्तांस जडाव केली. सप्त महानदियांची उदके व थोर थोर नदियांची उदके व समुद्रांची उदकें तीर्थक्षेत्र नामांकित, तेथील तीर्थोदकें आणिली. सुवर्णाचे कलश केले व सुवर्णाचे तांबे केले. आठ कलश व आठ तांबे यांनी अष्टप्रधानांनी राजियास अभिषेक करावा असा निश्चय करून, सुदिन पाहून मुहूर्त पाहिला...*

*सिंहासनावर बसले. सिंहासनास अष्ट खांब जडित केले. त्या पद्दतीप्रमाणे शास्त्रोक्त सर्वाहि साहित्य सिद्ध केले. संपूर्ण खर्चाची संख्या एक क्रोड बेचाळीस*

*लक्ष होन जाले. अष्टप्रधानांस लक्ष लक्ष होन बक्षीस दर आसामीस त्याखेरीज एक एक हत्ती, घोडा, वस्त्रे, अलंकार असे देणे दिले. येणेप्रमाणे राजे सिंहासनरूढ जाले. या युगी सर्व पृथ्वीवर म्लेंच्छ बादशहा.* (म्लेंच्छ शब्दाने सर्व परदेशी अभिप्रेत आहे, त्यांत युरोपियनांचाही समावेश होतो. या शब्दांत कोणताही विशिष्ट धार्मिक गट अभिप्रेत नाही. म्लेंच्छ या शब्दाचा अर्थ करावा तर अभारतीय असा होतो.) *मऱ्हाटा पातशहा येवढा छत्रपती जाला ही गोष्ट काही सामान्य जाली नाही.''*

हेन्री ऑक्सिंडन याने दिलेले वर्णनही तितकेच रोचक आहे. तो म्हणतो:

''सहा जूनला (1674) सात किंवा आठच्या सुमारास मी दरबारात गेलो. राजा एका भव्य सिंहासनावर बसला होता. उत्तमोत्तम वस्त्रालंकार परिधान केलेले सरदार त्याच्यासमोर उभे होते. राजाचा मुलगा संभाजीराजा, पेशवा मोरोपंडित (मोरोपंत) आणि मोठा प्रतिष्ठित असा ब्राह्मण हे सिंहासनाच्या पायथ्याशी एका बैठकीवर बसले होते. इतर मंडळी आणि त्याबरोबरच सैन्यातील अधिकारी वगैरे मोठ्या आदराने उभी होती. मी काही अंतरावरून मुजरा केला. शिवाजी राजाला देण्यासाठी आम्ही हिऱ्याची अंगठी आणली होती. ती नारायण शेणवी याने वर धरली. थोड्या वेळाने त्यांचे (शिवाजीराजांचे) लक्ष आमच्याकडे गेले. आम्हाला त्यांनी जवळ येण्याची आज्ञा केली. अगदी सिंहासनाच्या पायथ्यापर्यंत. तेथे थोड्या वेळात विश्रांती घेतल्यावर आम्हाला निरोप देण्यात आला. तेवढ्या वेळात मी काही गोष्टी लक्षात ठेवल्या.

''सिंहासनाच्या दोन्ही बाजूंस सुशोभित केलेले भाले उभे केले होते. भाल्यांच्या टेकावर मुसलमानी पद्धतीप्रमाणे सत्ता आणि अधिकारी यांची निदर्शक अशी चिन्हे होती. उजवीकडच्या भाल्यावर दोन मोठे मासे होते. त्यांची डोकी सोन्याची होती. त्यांचे दात मोठे होते. डावीकडच्या भाल्यावर घोड्याच्या पुष्कळ शेपट्या होत्या. (कदाचित मोर्चेले आणि चवऱ्या असाव्यात.) एका रत्नजडित भाल्याच्या टोकावर सोन्याचा एक तराजू होता आणि तो समतोल ठेवला होता. हा तराजू म्हणजे न्यायाचे द्योतक होय. आम्ही वाड्याच्या प्रवेशद्वारापाशी आलो. तेथे दरवाज्याच्या दोन्ही बाजूस दोन लहान हत्ती होते. आणि सोनेरी लगाम, आणि मौल्यवान खोगरी वगैरे घातलेले दोन उमदे घोडे होते. ते हत्ती आणि घोडे पाहून आम्हाला कौतुक वाटले. रायगडाच्या डोंगराचा रस्ता इतका अवघड आणि धोक्याचा असा असूनही हे हत्ती वगैरे इतक्या वर कसे आणण्यात आले असतील याचे आम्हाला कोडे पडले.''

याच सुमारास म्हणजे सन 1674 च्या 17 जून रोजी शिवाजीमहाराजांच्या मातोश्री जिजाबाई यांचे निधन झाले. महाराज हे जन्मभर लढे लढवित होते. अशा भाग्यशाली पुत्राला सर्वात मोठे स्फूर्तिस्थान म्हणजे जिजाबाई होत. माता आणि पुत्र यांची परस्परभक्ती आणि परस्परांबद्दल वाटणारा जिव्हाळा यांची, वरील शिवाजीमहाराज आणि मातोश्री जिजाबाई यांच्याप्रमाणे इतिहासामध्ये फारच थोडी उदाहरणे आढळतात.

शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाकडे मोगलांनी दुर्लक्ष केले. सन 1674 च्या 24 सप्टेंबर रोजी महाराजानी तांत्रिक पद्धतीने आपला आणखी एक राज्याभिषेक करून घेतला. जास्तीजास्त लोकांना समाधान लाभावे हा त्यांचा हेतू. या घटनेकडे मोगलांनी दुर्लक्ष केले. असे असले तरी महाराजांचा मोगलांशी आणि मोगलांचे आश्रित जंजिरेकर शिद्दी यांच्याशी लढा चालूच होता. मराठ्यांनी वऱ्हाड आणि खानदेशात व्यापक प्रमाणावर आक्रमणे केली. ते अगदी बऱ्हाणपूरच्या तटापर्यंत जाऊन पोहोचले. ब्रिटिशांची तक्रार अशी की त्यांच्या धरणगाव येथील वखारीचे सन 1674 च्या 20 जानेवारी रोजी मोठे नुकसान झाले. या आक्रमणाच्या प्रतिकारासाठी मोगल काहीच करू शक्त नव्हते. जंजिऱ्याच्या शिद्यांच्यावर महाराजांचे दडपण सतत चालू होते. शिद्यांना सवलती देणे बंद करा असा खणखणीत इशारा महाराजांनी ब्रिटिशांना दिला हे ब्रिटिशांच्या सन 1674 च्या 26 ऑगस्टच्या पत्रात स्पष्ट झाले आहे. ते पत्र पुढीलप्रमाणे आहे:

''आमच्या प्रेसिडेंट (अध्यक्ष) यांना शिवाजीने पुढीलप्रमाणे कळविले आहे, 'तुम्ही आपल्या बंदरात शिद्यांच्या आरमाराला यापुढे थांबू देत असाल तर एक लक्षात ठेवा की तुमच्यातील आणि माझ्यातील शांततेचा तह बाजूला राहील. मी तुमच्या बंदरात शिद्यांवर हल्ला करीन आणि तुमच्या विरूद्धही युद्ध पुकारीन. शिवाजीने असे सूचित केले आहे की आम्ही शिद्यांच्या पदरात झुकते माप घालीत आहोत. (त्याच्या ऐवजी शिद्यांशी पक्षपात करीत आहोत.)' या पत्राची अध्यक्षांनी गंभीरपणे दखल घेतली. अध्यक्षांनी आज्ञा केली की सेक्रेटरी (सचीव) आणि कॅप्टन, थॉमस निकोल्स यांना ताबडतोब शिद्यांकडे पाठविण्यात यावे. शिवाजीने अध्यक्षाला दिलेला इशारा शिद्यांला कळविण्यात यावा; आणि शिद्यांला सांगावे की तो आणि त्याचे आरमार याने बंदर सोडून निघून जावे.''

पण विजापूर राज्यामधून अधिक प्रदेश जिंकून घ्यावा या गोष्टीवर महाराजांचे लक्ष केंद्रित झाले. विजापूर राज्यातील परिस्थिती त्या दृष्टीने अनुकूलच होती. कोल्हापूर, बालाघाट आणि कारवार हे प्रदेश ताब्यात यावेत

म्हणजे दक्षिण कोकणातील आपल्या राज्याला सलग असलेला प्रदेश आपल्या मालकीचा होईल. विजापूरची सत्ता त्या भागातून नाहीशी व्हावी. ह्या हेतूपूर्तीसाठी गोव्याजवळील विजापूरच्या सुभेदाराचे मुख्य ठिकाण जे फोंडा ते जिंकून घेणे आवश्यक होते.

पण विजापूरच्या साहाय्याला मोगल धावून येणारच नाहीत अशी महाराजांना खात्री वाटेना. महाराजांनी मोगल सुभेदार बहादूरखान याला आश्वासन दिले की आपला हेतू मोगलांशी शांतता राखणे हाच आहे. महाराजांच्या शब्दांमुळे बहादूरखान कसा फसला याची मजेदार हकीकत भीमसेन सक्सेना याने पुढील शब्दांत दिली आहे:

''शिवाजी आपल्याला चक्क बनवीत आहे याची बहादूरखानाला अजिबात कल्पना नव्हती. शिवाजीने बादशहाकडे अर्ज पाठविला त्या अर्जात म्हटले होते, 'मला क्षमा करावी. मी माझ्या मुलाला मोगल छावणीत पाठवितो.' बहादूरखानाने शिवाजीचा अर्ज बादशहाकडे पाठविला. त्या अर्जाबरोबर स्वत: बहादूरखानाने आपल्याकडून बादशहाला एक पत्र लिहिले. त्यावेळी बादशहाचा मुक्काम रावळपिंडीजवळ हसन अब्दाल येथे होता. बादशहाने बहादूरखानाला लिहिले ते असे, 'त्या धूर्त माणसाच्या (शिवाजी) शब्दांनी फसू नकोस. मलीक बरखुर्दार याला माझ्या स्वभावाची माहिती आहे. तू हिंदूंच्या स्वभावाची माहिती असलेले अधिकारी आणि मलिक बरखुर्दार यांना शिवाजीकडे पाठव. त्याच्याशी मुत्सद्देगिरीने बोलणी कर. शांततेची विनंती शिवाजी करीत आहे. या मागे त्याचे हेतू काय आहेत याचा शोध घे. त्याची एकंदरीत वागणूक कशी आहे, या सर्व गोष्टींची खात्री करून घे, आणि मग मला पत्र लिही.'

''बहादूरखानाने आपला सचीव मुहम्मद सईद, गंगाराम गुजराती आणि मलिक बरखुर्दार यांना शिवाजीच्या भेटीसाठी पाठविले. तोपर्यंत शिवाजीने आपले गुप्त हेतू तडीस नेले होते. त्याने पन्हाळागड (फोंडा पाहिजे) विजापूरकडून जिंकून घेतला होता. बहादूरखानाने पाठविलेले अधिकारी पुरंदरच्या किल्ल्यात शिवाजीला भेटले. शिवाजीने त्यांचा उत्कृष्ट पाहुणचार केला, आणि त्यांचे भरघोस स्वागत केले. ही गोष्ट झाली पहिल्या दिवशी. दुसऱ्या दिवशी शिवाजी त्यांना परखडपणे म्हणाला, 'तुम्ही असे काय शौर्य गाजवले आहे की मी तुमच्याशी तह करावा? तुम्ही लवकर निघून जा कसे? नाही तर तुमची फजिती होईल.'

''ते अधिकारी निराश होऊन परत गेले. त्यांनी घडलेल्या घटना बहादूरखानाला सांगितल्या. बहादूरखानाने तो सगळा वृत्तांत लिहून बादशहाकडे पाठविला.''

या अवधीत औरंगजेबाने बहादूरखानाच्या शिफारशीवरून संभाजीला मनसब दिली होती. *मासिरे आलमगिरीतील* 7 जुलै 1675ची पुढील नोंद आहे:[1]

'जफरजंग (बहादूरखान याची याची नवीन पदवी) च्या विनंतीवरून शिवाजीचा मुलगा संभाजी याला सहा हजाराची मनसब देण्यात आली. बक्षीस म्हणून 80 लाख *दाम* (सुमारे 2 लाख रुपये) देण्यात आले. नगारे-नौबती, एक ध्वज, खिलतीची वस्त्रे, आणि फर्मान ही *गुर्जबर्दार* (वेत्रधारी) यांच्याबरोबर पाठविण्यात आली.'

इकडे महाराजांनी मोगलांना तहाच्या बोलण्यात गुंतवून ठेवले. तिकडे त्यांचे सैन्य कोल्हापूर भागात पसरले. शिवाजीमहाराज हे स्वत: गोव्याजवळील फोंडा जिंकून घेण्यासाठी चाल करून गेले. ते फोंड्याच्या वाटेवर असताना राजापूर येथील ब्रिटिश वखारीचा अधिकारी जॉन चाईल्ड याने महाराजांची राजापूर येथे सन 1675 च्या मार्च रोजी भेट घेतली. महाराजांशी झालेल्या या मुलाखतीचे रोचक वर्णन त्याने करून ठेविले आहे.[2]

सन 1675 च्या एप्रिल महिन्याच्या सुरुवातीस महाराज फोंड्याला पोहोचले. इंग्लिश रेकॉर्डस्मधील 1 एप्रिलची नोंद पुढीलप्रमाणे आहे;[3] "त्याच्याबरोबर (शिवाजी) 15 हजार स्वार, 14 हजार पायदळ आणि 1 हजार कामगार वगैरे आहे. कामगारांच्यापाशी कुऱ्हाडी, कुदळी, फावडे इत्यादी आहेत. त्याने कोल्हापूर घेतले आहे, आणि बातमी अशी आहे की तो लवकरच रायबाग घेणार आहे."

फोंड्याचा वेढा चालू झाला. फोंड्याचा सुभेदार मुहम्मदखान याने किल्ला मोठ्या शर्थीने लढविला. त्याने विजापूरचे सरदार बहलोलखान आणि रुस्तुमे जमान यांना आपल्या मदतीसाठी बोलाविले. पण शिवाजीमहाराजांनी त्यांना कोकणात उतरू दिले नाही. इंग्लिश रेकॉर्डस्मधील नोंदीप्रमाणे, राजाने (शिवाजी) घाटाच्या मार्गावर झाडे पाडून वाट अडविली आहे आणि तेथे सैनिकांच्या रांगा उभ्या केल्या आहेत. फोंड्यावर दडपण आणण्यासाठी महाराजांनी वेंगुर्ल्याला चाळीस जहाजे पाठविली. फोंडा किल्ल्यांतील शिबंदीला मदत करण्यासाठी पोर्तुगीजांनी पुष्कळ प्रयत्न केले; पण त्यांना यश मिळाले नाही. किल्ल्याखाली सुरुंग लावण्यात आले आणि बुरुज उडविण्यात आले. शिवाजीमहाराजांचा चरित्रकार सभासद याने या मोहिमेत महाराजांचा अधिकारी इब्राहीमखान याने गाजविलेल्या शौर्याचा आवर्जून

1. सरकार, *मासिरे आलमगिरी*, पृ. 88.
2. *इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी*, खंड 2, पृ. 44.
3. *इंग्लिश रेकॉर्डस ऑन शिवाजी*, खंड 1. पृ. 41.

उल्लेख केला आहे.

मराठ्यांनी सन 1675 च्या 17 एप्रिल रोजी फोंड्याचा किल्ला जिंकून घेतला. किल्लेदार मुहम्मदखान याला कैद करण्यात आले.

यानंतर मराठे कारवार जिल्ह्यात चाल करून गेले. 21 मे पर्यंत मराठ्यांनी अंकोला आणि शिवेश्वर ही स्थळे ताब्यात घेतली होती. पुढील महिन्या-दोन महिन्यांतच कारवारही त्यांच्या हाती गेले. अंकोल्याच्या दक्षिणेस गंगावली ही नदी समुद्राला जाऊन मिळते तेथपर्यंत शिवाजीमहाराजांचे राज्य पसरले होते. समुद्रकिनाऱ्यापासून विजापूरचा संबंध संपूर्णपणे तुटला होता.

जुलै महिन्यापर्यंत मराठ्यांनी कोल्हापूर जिंकून आपल्या राज्यास जोडून घेतले होते. मराठ्यांनी कोल्हापूर जिंकले याबद्दल ब्रिटिशांनी दिलेला वृत्तांत मनोरंजक आहे. कोल्हापूरजवळील रायबाग येथून सन 1675 च्या 7 ऑगस्ट रोजी लिहिताना ब्रिटिश म्हणतो, 30 तारीख (जुलै 1675), भल्या पहाटे आम्हाला बातमी कळली ती अशी की शिवाजीच्या पथकांनी कोल्हापुरात प्रवेश केला आणि तेथील बादशहाच्या (आदिलशहा) गव्हर्नरला (प्रशासकाला) कैद केले. गावातील पुष्कळ लोक गाव सोडून चालले होते. पण शिवाजीच्या सैनिकांनी त्यांना चांगल्या वागणुकीची आश्वासने देऊन त्यांना गावात राहवून घेतले. आता गावातील लोक शांत आणि सुरक्षित आहेत. शहराचे (कोल्हापूर) संरक्षण करण्यासाठी शिवाजीने दोन हजार सैनिक तैनात केले असे म्हणतात. कोल्हापूरच्या मुसलमान सुभेदाराला पन्हाळगडावर नेण्यात आले आहे. तेथे तो अद्याप कैदेत आहे.

विजापूर राज्यातून इतका मोठा भाग निघून जावा यामुळे राज्यात मोठा गोंधळ उडाला. राज्यात दक्षिणी मुसलमान आणि हबशी हे एकीकडे आणि पठाण दुसरीकडे अशी दुफळी झाली. त्यांच्या कलहामुळे राज्याच्या चिंधड्या उडू लागल्या. पठाणांचा पुढारी बहालोलखान. प्रतिस्पर्धी पक्षाचा पुढारी खवासखान हा राजाचा पालक आणि मुख्य प्रधान होता. लोकांच्यामध्ये सर्वसाधारणपणे समज असा पसरला होता की शिवाजीमहाराजांकडून बहलोलखानाला भक्कम भेटी व रकमा मिळाल्या. तुमच्या जहागिरीवर आम्ही हल्ला करणार नाही असेही आश्वासन महाराजांनी बहलोलखानाला दिले आहे. यामुळेच बहलोलखान हा शिवाजीमहाराजांच्या मोहिमेत जाणूनबुजून निष्क्रीय बनला आहे.

विजापूरच्या राज्यातून जो मुलुख शिवाजीमहाराजांनी घेतला होता तो परत घेण्याचा निर्धार खवासखानाने केला हे स्पष्ट आहे. खवासखानाचा दुसरा हेतू असा की विजापूर राज्यातील पठाण पक्षाचे बळ खच्ची करावे. वरील कारणांमुळे

खवासखान ह्याने मोगलांशी जवळचा संपर्क साधला.

मोगलांचा सुभेदार बहादूरखान आणि विजापूरचा मुख्य प्रधान खवासखान यांची भेट पंढरपूर येथे सन 1675च्या ऑक्टोबर महिन्यात झाली. तहाच्या म्हणून विजापूरने पुढील अटी मोगलांच्या समोर ठेवल्या:

1. विजापूरचा अल्पवयीन बादशहा सिंकदर आदिलशहा याच्या बहिणीचे लग्न औरंगजेबाच्या एका मुलाशी व्हावे.
2. शिवाजींची शक्ती नष्ट करण्यासाठी मोगल आणि विजापूर यांनी एक होऊन झटावे.
3. औरंगजेबाने विजापूरकडून मिळणारी वार्षिक खंडणी माफ करावी.
4. सिंकदर आदिलशहाला बादशहा ही पदवी देण्यात यावी.

तहाच्या बहुतेक अटी मान्य करण्यात आल्या. खवासखानाचा मुख्य भर होता तो पठाण प्रतिस्पर्धी आणि त्यांचा पुढारी बहलोलखान यांना दाबून टाकण्याच्या गोष्टीवर. खवासखानाच्या विरूद्ध पठाणांच्यामध्ये उसळलेला राग काय सांगावा? पण या रागाला त्यांनी सोयिस्कर नाव असे दिले की खवासखानाने विजापूर राज्याचा विश्वासघात केला. खवासखान विजापूरला परत आला. लागलीच त्याला पकडून कैदेत टाकण्यात आले. ही घटना सन 1675 च्या 11 नोव्हेंबरची आहे.

ह्याचा सूड घेतला विजापूर येथील दक्षिणी मुसलमान पक्षाचा नेता शेख मिनहाज याने. त्याने पठाणांच्यावर हल्ला चढविला, आणि बहलोलखानाचा प्रमुख अनुयायी खिज्रखान पन्नी याला ठार मारले. दक्षिणी मुसलमान हे खवासखानाला कैदेतून सोडवून त्याला पुन्हा सत्तेवर आणतील अशी बहलोलखानाला भीती वाटू लागली. त्यामुळे त्याने खवासखानाला ठार मारले. ही घटना सन 1676 च्या 18 जानेवारीची आहे.

खवासखानाचा खून म्हणजे विजापूर राज्यातील तीव्र अंत:कलहाची सुरूवात होय. तुंगभद्रेच्या दक्षिणेस अधोनीच्या जवळ सन 1676 च्या 21 मार्च रोजी उभय दलांचे मोठे युद्ध झाले. दक्षिणी लोकांचा पराजय झाला. ते पळून गोवळकोंड्याला गेले. शेख मिनहाज याने गुलबर्गा येथे आपला तळ कायम केला.

खवासखानाच्या खुनाने मोगल सुभेदार बहादूरखान याला मोठा धक्का बसला. विजापूरचे सावज आपल्या हातातून सुटून जात आहे हे त्याला दिसून आले. औरंगजेबाने विजापूरवर आक्रमण करण्याची बहादूरखानाला आज्ञा केली. या अवधीत औरंगजेबाने वायव्य प्रांतातील असंतोष संपुष्टात आणला होता. रावळपिंडीजवळील हसन अब्दाल त्याने सन 1675 च्या 29 डिसेंबर रोजी सोडले.

लाहोर येथे तो सन 1676 च्या 31 जानेवारी रोजी होता. सन 1676 च्या 5 एप्रिल रोजी तो दिल्लीला परत आला. बहादूरखानाच्या मदतीसाठी दिलेरखान हा उत्तरेकडून दक्षिणेकडे सन 1676 च्या जूनमध्ये आला.

या सुमारास, म्हणजे सन 1675 मध्ये शिवाजीमहाराज अतिशय गंभीर अशा दुखण्याने साताऱ्याला आजारी होते. त्यावेळी अफवाही विलक्षण पसरल्या. इंग्लिश रेकॉर्डस्‌मध्ये त्यांच्यावर विषप्रयोग झाल्याची आणि त्या कारस्थानात संभाजीराजे असल्याची माहिती देण्यात आली आहे. ही अफवा बिनबुडाची होती. तीत काहीच तथ्य नव्हते. महाराजांचा आजार सन 1676 च्या सुरूवातीपर्यंत चालू असला पाहिजे. कारण विजापूर राज्यातील अथणी ह्या समृद्ध शहरावर त्यांनी (शिवाजीमहाराजांनी) हल्ला केल्याचे आपल्याला माहीत आहे. ब्रिटिशांच्या वृत्तांताप्रमाणे या गावातून जी लूट नेण्यात आली ती 3 लाख पॅगोडांची होती.

विजापूरवर आक्रमण करण्यास मोगल सज्ज होते. विजापूर आणि मोगल हे दोघे मिळून आपल्याविरुद्ध चाल करून येतील अशी काळजी महाराजांना राहिली नाही. विजापूर हे मोगलांशी लढण्याची तयारी करू लागले. शिवाजीमहाराजांनी विजापूरला ह्या कामात आपले सहकार्य देऊ केले. सुरतेहून सन 1676 च्या 1 मे रोजी लिहिताना ब्रिटिश म्हणतात, "शिवाजी याने पण रिंगणात उतरण्याची संधी साधली आहे. तो आता विजापूरचा सरदार बहलोलखान याला पाठिंबा देत आहे."

सन 1676 च्या 31 मे रोजी बहादूरखानाने भीमा नदी ओलांडली. विजापूर राज्याने ज्या जिद्दीने आपले स्वत:चे संरक्षण केले ती पाहून मोगलांना अतिशय धक्का बसला. इंडि मुक्कामी सन 1676 च्या 13 जून रोजी उभय दळांत अतिशय निकराची लढाई झाली. भयानक अशा पराजयापासून मोगल कसेबसे वाचले. या घटनेने बहादूरखानाच्या मनाचा कोंडमारा झाला. त्याने पुन्हा भिमा नदी ओलांडली. यानंतर त्याने विजापूर राज्यातील नळदुर्गच्या किल्ल्याला वेढा घातला. तेथेही त्याला माघार घ्यावी लागली. विजापूरला गोवळकोंड्याची मदत मिळाली होती.

## एकजूटीतील डावपेच

बहादूरखानाची परिस्थिती अत्यंत पेचाची झाली होती. भीमा नदीच्या उत्तरेस असलेला विजापूर राज्याचा सगळा प्रदेश हस्तगत करून मोगल साम्राज्याला जोडण्याची त्याने योजना आखली. त्या प्रदेशात नळदुर्ग, अक्कलकोट आणि गुलबर्गा अशी स्थळे होती. या कामासाठी त्याला मित्र हवे होते. त्याचा शोध घेत घेत बहादूरखानाने लवकरच शिवाजीमहाराजांशी तडजोड केली.

महाराजांना मिळालेली ही संधी म्हणजे एक वरदानच होते. शायिस्तेखानाच्या वेळेपासून, म्हणजे सन 1660 पासून शिवाजीमहाराजांनी विजापूरविरुद्धच्या मोहिमेत मोगलांना आपले पुन्हा सहकार्य देऊ केले होते. शिवाजीमहाराजांनी आपले कोकण आणि घाटावरील लहानसे राज्य निर्माण केले होते ते विजापूर राज्यातूनच होय. शयिस्तेखानाच्या काळात मोगलांनी शिवाजीमहाराजांची ही सूचना झिडकारून लावली होती. या त्यांच्या धोरणावर पुढे मिर्झा राजा जयसिंग याने कडक टीका केली. शिवाजीमहाराजांना जयसिंग हा आपल्या विजापूरच्या मोहिमेत आपल्याबरोबर ओढू शकला. त्याने विजापूर, बालघाट महाराजांना मिळेल अशी सवलत दिली होती. पण जयसिंगाच्या मोहिमेतील महाराजांचे सहकार्य हे तुल्यबलांचे सहकार्य नव्हते. त्यामुळे शिवाजीमहाराजांना त्या मोहिमेसंबंधी उत्साह वाटणे शक्य नव्हते. सन 1673 मध्ये शिवाजीमहाराजांनी कोल्हापूर, बालघाट आणि उत्तर कानरा हे प्रदेश विजापूरकडून स्वतःच्या प्रयत्नांनी जिंकून घेतले.

आणि आताची वेळ अशी की मोगलांना विजापूरविरुद्ध त्यांची मदत हवी होती. महाराज हे ओळखून होते की मोगल हे उत्तरेकडून विजापूरच्या नाड्या आवळीत येत आहेत, भीमा नदीच्या उत्तरेकडील भीमा नदीचा प्रदेश जिंकून घेणार आहेत. पश्चिमेकडे धारवाड आणि बंकापूर प्रांतात पठाणांच्या जहागिरी होत्या. ऐन दक्षिणेकडे विजापूरची मांडलिक असलेले बिदनूर आणि म्हैसूर ही राज्ये होती.

आग्नेय दिशेकडे म्हणजे विजापूरच्या तमिळनाड प्रांताकडे शिवाजीमहाराजांनी आपले लक्ष वळविले. महाराजांचे सावत्र भाऊ व्यंकोजी हे विजापूरचे अधिकारी. त्यांनी तंजावरचे जुने राजघराणे बाजूला सारून तंजावर येथे आपली स्वतःची सत्ता स्थापन केली. विजापूर राज्याचे रास्त अंमलाखालील तमिळनाडमधील प्रदेश म्हणजे सध्याचे उत्तर आणि दक्षिण अर्काट हे जिल्हे होत. ते जिंकून घेतले तर मराठ्यांची सत्ता कावेरीपर्यंत पोहोचेल, आणि राज्याची सीमा पश्चिम किनाऱ्यापासून पूर्व किनाऱ्यापर्यंत पसरते. शहाजीराजे आणि व्यंकोजी यांच्या हाताखाली मराठ्यांच्या ताब्यात बेंगळूर, कोलार, होसकोट, दोड्डुबाळापूर आणि इतर ठिकाणे होती. ती म्हैसूर कर्नाटकात होती. दक्षिणेत या ज्या घडामोडी होत होत्या त्यामुळे शिवाजीमहाराजांच्या महत्वाकांक्षांना अधिकच चालना मिळाली. रघुनाथ हणुमंते हा शहाजी राजे आणि त्यांच्यानंतर व्यंकोजी राजे यांचा अधिकारी होता. तो दक्षिणेतून महाराजांकडे आला. दक्षिणेवर चाल करून जाणे हे कसे शक्य आहे हे दाखविणारा वृत्तांत त्याने सादर केला. अक्कण्णा आणि मादण्णा या प्रधानांच्या प्रभावाखाली गोवळकोंड्याच्या राज्याने मोगलांच्या विरुद्ध चढेल प्रतिकाराचे धोरण स्वीकारले.

गोवळकोंडा राज्याचे विजापूर राज्याशी सीमाभागाचे आणि प्रदेशांच्या देवघेवीचे वाद चालू होते; तेही निकालात काढावयाचे होते. गोवळकोंड्याच्या प्रधानांनी या, वरील सर्व प्रकरणांसंबंधी शिवाजीमहाराजांशी समझौता केला. गोवळकोंड्याशी झालेल्या या जुटीचा उपयोग महाराजांनी केला तो असा. त्यांनी या जुटीला मोगल आक्रमणाविरुद्ध दक्षिणी राज्ये असे स्वरूप दिले. महाराजांची गोवळकोंड्याच्या राज्याशी झालेली ही जूट म्हणजे महाराजांनी चालवलेला संघर्ष हा राजकीय स्वरूपाचा होता हे दाखविणारे उत्कृष्ट उदाहरण होय.

विजापूर राज्यांत पठाण बळावले होते. त्यांच्यात आणि शिवाजीमहाराजांतून विस्तवही जात नव्हता. शिवाजीमहाराजांच्या मते विजापूरातील पठाणांचा प्रभाव म्हणजे परक्यांचा प्रभाव हाच होय. महाराजांनी ह्या विचारसरणीला तर्कशुद्ध स्वरूप दिले. त्यांनी मराठ्यांना पुढीलप्रमाणे आवाहन केले की, 'तुम्हाला आता विजापूरच्या गादीशी निष्ठा बाळगण्याचे कारण राहिले नाही. तुम्ही आता त्या निष्ठेतून मोकळे झाला आहात.' सभासद म्हणतो:

''त्यास पेडगांवी बहादूरखान गनीम पाठीवर येईल म्हणून निराजीपंत न्यायाधिश पाठविले. कित्येक द्रव्य अलंकार (भूषणे) रत्नखचित पाठविली. 'त्यांस अंतरंगे सख्य (करून) एक वर्षपर्यंत आपणांस कर्नाटक साधावयास लागेल. तुम्ही राज्यास उपद्रव न करणे,' असे त्यांस सांगून ठायी ठेविले.''

बहादूरखानासारखा अनुभवी सेनापती; महाराज दक्षिणेच्या मोहिमेवर जाणार होते. स्वराज्यातील आपल्या गैरहजेरीत बहादूरखानाने काहीच करू नये, स्वस्थ बसून रहावे याबद्दल महाराजांनी त्याचे मन वळविले, आणि तोही कबूल झाला. हे कसे घडले, हे एक कोडेच आहे. कदाचित त्याची संगती पुढीलप्रमाणे लावता येईल. विजापूरचा नाश करण्यासाठी बहादूरखानाने आटोकाट प्रयत्न चालविला होता. हे एक कारण. त्याच्या जोडीला दुसरे कारण म्हणजे तो विलक्षण अहंकारी होता. नंतर काही दिवसांनी औरंगजेबाने बहाणा केला की बहादूरखान आणि शिवाजीमहाराज यांच्यामधील परस्पर एकजुटीची आपल्याला अजिबात माहिती नव्हती. दक्षिणेच्या सुभेदारीवरून त्याने बहादूरखानाला काढले आणि त्याच्या जागी दिलेरखानाची नेमणूक केली. असे करीत असताना त्याने आपल्याला बहादूरखान आणि शिवाजी त्यांच्या युतीमुळे धक्का बसला हे स्पष्टपणे सूचित केले.

या अवधीत गोवळकोंड्याच्या मार्गे दक्षिणेकडे चालून जाण्याची शिवाजीमहाराजांनी तयारी केली. आपल्या गैरहजेरीत राज्याचा कारभार

चालविण्यासाठी त्यांनी उत्कृष्ट व्यवस्था केली. मोरोपंत पेशवे यांच्याकडे उत्तरेकडील प्रदेश सोपविण्यात आला. दक्षिणेकडील प्रदेश आण्णाजी दत्तो यांच्या नियंत्रणाखाली होता. राज्याचा मध्यभाग, पन्हाळगडासहित दत्ताजी त्र्यंबक वाकेनविस यांच्या व्यवस्थेखाली होता. राहूजी सोमनाथ याने राजगडाला राहावे आणि दैनंदिन कारभार पाहावा असे ठरले.

शिवाजीमहाराजांचे पुत्र संभाजीराजे हे आता एकोणीस वर्षाचे तरुण होते. ते अगदी लहान असताना त्यांच्या आईचा मृत्यू झाला होता. पण शिवाजीमहाराजांच्या मातोश्री आणि संभाजीराजांच्या आजी, जिजाबाई यांनी त्यांचे मोठ्या लाडाने आणि ममतेने लालन-पालन केले. महाराजांच्या बरोबर ते आग्रा येथे गेले होते. महाराजांच्या मोहिमांतून आणि राज्यकारभारातून ते थोडाबहुत भाग घेत असत.

संभाजीराजांचे सावत्र बंधू राजाराम यांचा जन्म इ.स. 1670 मध्ये झाला. त्यानंतर राजारामाची आई सोयराबाई हिचे महत्व वाढले. याचा परिणाम संभाजीराजांच्या मनावर झाला असावा. संभाजीराजे हे आपल्या वडिलांप्रमाणेच तीक्ष्ण बुद्धिमत्तेचे आणि शूर व धाडसी होते. पण त्यात दुराग्रहीपणाची भर पडलेली दिसते. शिवाजीमहाराज म्हणजे नीतिमत्तेचा आदर्श होय. संभाजीराजांच्या रंगेलपणाच्या तारुण्यसुलभ प्रमादांमुळे महाराजांना निश्चितच अस्वस्थ वाटत असले पाहिजे. आधीच मोगल आणि शिवाजीमहाराज यांची मैत्री कच्ची; केव्हा तुटेल याचा नेम नाही. अशा परिस्थितीत महाराजांच्या गैरहजेरीत संभाजीराजांनी रायगडला राहावे हे विशेष प्रशस्त ठरणार नाही; याची महाराजांना कल्पना आली. या प्रकरणाचा राजकीय आणि घरगुती दृष्टीने अतिशय खोलवर विचार करून महाराजांनी निर्णय घेतला. संभाजीराजांची पत्नी येसुबाई हिचे माहेर म्हणजे कोकणातील श्रृंगारपूर. संभाजीराजांना इ.स. 1677 मध्ये शृंगारपूर येथे पाठविण्याचे ठरले. त्या प्रदेशाची व्यवस्थाही त्यांच्याकडे सोपविण्यात आली.

येथे एका गोष्टीची आठवण करून देणे आवश्यक आहे. शिवाजीमहाराजांचा सेनापती, सुप्रसिद्ध नेताजी पालकर हा महाराजांना सोडून मोगलांना मिळाला होता. मोगलांनी त्याला काही दिवसांनी कैद करून आग्रा येथे नेले. तेथे त्याला मुसलमान करण्यात आले. त्याचे नाव मुहम्मद कुलीखान असे ठेवण्यात आले. वायव्य प्रांतात त्याला तैनात करण्यात आले. तेथून पळून जाण्याचा त्याने दोनदा प्रयत्न केला. पण दोन्ही वेळेस त्याला पकडण्यात आले. सन 1676 मध्ये दिलेरखानाच्या सैन्याबरोबर तो (नेताजी पालकर) दक्षिणेत आला. त्याने लवकरच मनाचा एक निश्चय केला,

आणि तो महाराजांच्याकडे परत आला. महाराजांनी त्याचे स्वागत केले इतकेच नव्हे तर त्याला हिंदू धर्मात परत घेतले. 'जेधे शकावली' म्हणते,[1] "शके 1598 नळ संवत्सर, आषाढ वद्य चतुर्दशी (11 जून 1676) नेताजी पालकर याने प्रायश्चित घेतले आणि ते शुद्ध झाले."

या एका घटनेने शिवाजी महाराजांना काळाची गरज काय होती याची किती असाधारण जाणीव होती ह्याची कल्पना येते. नेताजी दहा वर्षे मुसलमान म्हणून वावरत होता, आणि नंतर मराठा समाजात त्याला पुन्हा मानाने प्रवेश मिळाला ही ती घटना आहे.

शिवाजी महाराज हे सन 1676 च्या सहा ऑक्टोबर रोजी म्हणजे दसऱ्याच्या दिवशी राजगडातून बाहेर पडले. त्यांनी कोकणातील चिपळूण येथील परशुराम क्षेत्राचे दर्शन घेतले. नंतर घाटावर आले. तेथे त्यांनी सत्पुरुष मौनीबाबा यांचे दर्शन घेऊन त्यांचा अनुग्रह मिळविला. यापूर्वीच शिवाजीमहाराजांनी समर्थ रामदास या सुप्रसिद्ध संतांची आणि विचारवंतांची चाफळ (सातारा जिल्हा) येथे भेट घेतली होती. त्यांनीही महाराजांना आशीर्वाद आणि अनुग्रह दिले होते. महाराजांना समर्थ रामदासांबद्दल अतिशय आदर वाटत होता. समर्थांनी चाफळ येथे राममंदिर बांधले होते. महाराजांनी देवळाच्या व्यवस्थेसाठी आणि विविध उत्सवांसाठी भक्कम देणग्या आणि इनामे दिली. साताऱ्यापासून 14 कि.मी. अंतरावर परळीचा किल्ला आहे. महाराजांनी समर्थांना विनंती केली की, 'आपण परळीच्या किल्ल्यावर कायमचे वास्तव्य करावे.' समर्थांनी ते मान्य केले. आणि ते सन 1677 मध्ये परळीच्या किल्ल्यात राहाण्यास आले. परळीचा किल्ला पुढे सज्जनगड या नावाने प्रसिद्ध पावला.

शिवाजीमहाराजांनी विजापूर राज्याच्या पश्चिमेकडील जिल्ह्यातील पठाणांशी लढण्यासाठी आपला सेनापती हंबीरराव मोहिते याच्या नेतृत्वाखाली सैन्य रवाना केले. त्या प्रदेशात कोप्पळ (रायचूर जिल्हा कर्नाटक) किल्ल्याचा किल्लेदार कासीमखान, आणि त्याचा भाऊ हसनखान हे दोघे मियाना पठाण बंधू प्रमुख सरदार होते. त्यांच्याशी मराठ्यांनी झुंज केली. यलबर्गा येथे मोठी निकराची लढाई झाली. ही लढाई सन 1677 च्या जानेवारी महिन्यात झाली. प्रखर अशा युद्धानंतर पठाणांचा मोड झाला आणि त्यांनी पलायन केले. हसनखान आणि त्याचा भाऊ कासीमखान याना मराठ्यांनी कैद केले. त्यावेळी शिवाजीमहाराज हे हैदराबादच्या वाटेवर होते.

---

1. *सोअर्स बुक ऑफ मराठा हिस्टरी,* पृ. 29.

या लढाईनंतर हंबीरराव हा महाराजांना जाऊन मिळाला.

इकडे मोगल सेनापती बहादूरखान याने विजापूर राज्याकडून सन 14 मे 1677 रोजी नळदुर्गचा किल्ला जिंकून घेतला. सन 1677 च्या 7 जुलै रोजी गुलबर्गा हे त्यांच्या हाती पडले. भीमा नदीच्या उत्तरेकडील विजापूर राज्याचा भाग मोगल साम्राज्याशी जोडला गेला. ऐन याचवेळी शिवाजीमहाराजांनी तमिळनाडमधील विजापूरची सत्ता नाहीशी करण्याची मोहीम चालू केली.

महाराजांनी स्वराज्याच्या संरक्षणाची उत्तम व्यवस्था केली होती. आश्चर्याची गोष्ट म्हणजे विजापूरविरुद्धच्या अविचारी आक्रमणाच्या हेतून प्रेरित होऊन मोगलांनी मराठी राज्याच्या रक्षणाची हमी घ्यावी हे विशेष, पण महाराजांनी सगळी व्यवस्था करूनच रायगड सोडले होते. सन 1677 च्या फेब्रुवारी महिन्यात ते हैदराबादेस आले. गोवळकोंड्याचा बादशहा अबुल हसन आणि त्याचे मंत्री यांनी महाराजांचे भव्य स्वागत केले. सर्व शहर शृंगारण्यात आले होते. सभासदाने म्हटल्याप्रमाणे, *"पातशहांनी कुल नगर शृंगारिलें. चौकेरी बिदीस कुंकम केशराचे सडे रंगमाळा घातल्या. गुडिया, पताका, निशाणें नगरांत लावली. नगर- नागरिक लोक कोट्यानकोटी राजा पाहावयास उभे राहिले. नारींनी मंगल आर्त्या अगणित उजळून राजियास वंदिले. सोने-रुपियाची फुले राजियावरी उधळली."*

शिवाजीमहाराजांचा मुक्काम हैदराबाद येथे गोषामहाल वाड्यात होता. हा बादशहाचा एक राजवाडा होय.[1] वर म्हटल्याप्रमाणे गोवळकोंड्याचे राज्य हे संपूर्णतया मोगलांचे मांडलिक बनले होते. ते खालील तीन तह आणि करारनामे असे:

1. 23 मे 1636 रोजी गोवळकोंड्याच्या राज्याने शरणागतीचा कागद, *इन्कियादनामा* सादर केला.
2. सन 1656 च्या 24 फेब्रुवारीला मोगल बादशहाने गोवळकोंड्याच्या राजाला केलेल्या क्षमेचे पत्र आणि औरंगजेबाच्या अटी. या अटी 1656 सालच्या एप्रिल महिन्याच्या आहेत.
3. सन 1674 च्या 4 मेचा तह किंवा करार. याला *ताहूद* म्हणतात. मदण्णा हा गोवळकोंड्याचा मुख्य प्रधान झाला होता. त्याचे धोरण पुढीलप्रमाणे होते, (अ) मोगलांचे आक्रमण थांबाविणे. (ब) विजापूर राज्याबरोबर सीमा भागातील प्रदेशासंबंधी वाद आहे, तो वाद निकालात काढण्याचा

1. औरंगाबादी लक्ष्मीनारायण शफीक, *बिसातुल गनायम.*

एकच मार्ग आहे- तो म्हणजे तमिळनाडमधील विजापूरचे राजकीय वर्चस्व नाहीसे करून त्या जागी गोवळकोंड्याचे राज्य स्थापन करणे हा होय. शिवाजीमहाराजांशी मैत्री या धोरणांचा पुरस्कार करण्यासाठी होती.

शिवाजीमहाराजांचे स्वत:चेही हेतू होतेच. गोवळकोंड्याने मोगलांच्याविरुद्ध जो पवित्रा घेतला होता त्याला महाराजांनी पाठिंबा देण्याची तप्तरतेने मान्यता दिली. शिवाजी महाराजांचा एक हेतू होता तो विजापूरात वरचढ झालेल्या पठाणांचा नाश. गोवळकोंडा राज्याचे सहकार्य त्यांना या दृष्टीने स्वागतार्हच वाटले.

शिवाजी महाराज हे हैदराबादेत सुमारे एक महिना होते. अबुल हसन कुतुबशहा आणि शिवाजीमहाराज यांच्या तहातील अटी पुढीलप्रमाणे होत्या:

1. मोहीम चालू असेपर्यंत अबुल हसन कुतुबशहाने महाराजांना रोज 3 हजार होन (सुमारे 12 हजार रुपये) द्यावेत.
2. शिवाजीमहाराज विजापूरचा जो मुलुख जिंकतील त्यापैकी त्यांच्या जहागिरी वगळता बाकीचा मुलुख कुतुबशहाला देण्यात यावा.

सन 1677 च्या मार्च अखेरीस शिवाजी महाराजांनी हैदराबाद सोडले. त्यांच्या सैन्यात 16 ते 20 हजार घोडेस्वार आणि सुमारे 30 हजार पायदळ सैनिक होते. महाराज हैदराबादेहून कर्नलला गेले. त्यानंतर ते कृष्णा आणि तुंगभद्रेच्या संगमावर, निवृत्ती संगमावर गेले. महाराज हे तेथून कृष्णेच्या काठावर असलेल्या श्रीशैल येथील मल्लिकार्जुनाच्या सुप्रसिद्ध क्षेत्राकडे गेले. त्या स्थळातील धार्मिक वातावरणाचा त्यांच्या मनावर विलक्षण प्रभाव पडला. प्रपंचामधून निवृत्त होण्याचेही त्यांच्या मनात आले. परंतु त्यांनी मनाचा निग्रह केला आणि ते दक्षिणेकडे निघाले. सध्याच्या कडपा जिल्ह्यातून कूच करीत त्यांनी कालहस्ती आणि तिरूपती येथील देवतांचे दर्शन घेतले. सन 1677 च्या मे महिन्याच्या पहिल्या आठवड्यात शिवाजीमहाराज हे मद्रासच्या पश्चिमेस 11 कि. मी. अंतरावर पेद्दा पोलम येथे होते.

गोवळकोंडा राज्याच्या दक्षिणेकडील प्रदेशात तमीळनाडच्या लहानशा भागाचा अंतर्भाव होत होता. मद्रासच्या शहराच्या उत्तर आणि दक्षिणेकडची, चिंगलपट धरून किनारपट्टी काय तेवढी त्यांच्याकडे होती. उत्तर आणि दक्षिण अर्काट हे जिल्हे, कडलूर आणि पाँडिचरी ही नगरे, हा प्रदेश विजापूर राज्यात होता. तंजावर आणि तिरूचिरापल्ली (पूर्वीचे त्रिचनापल्ली) ही राज्ये विजापूरच्या नियंत्रणाखाली होती. विजापूर राज्याचा तमिळनाडमधील सुभेदार शेरखान याचे मुख्य ठिकाण होते बालगुंडपुरम्. हे गाव आता तिरूचिरांपल्ली जिल्ह्यात असून

खेड्याच्या स्वरूपात आहे. शेरखान हा विजापूरचा पठाण मुख्य प्रधान बहलोलखान याचा पक्षपाती होता. याउलट तमिळनाडमधील जिंजी किल्ल्याचा बलिष्ट किल्लेदार नसिर मुहम्मद हा बहलोलखानाचा प्रतिस्पर्धी आणि खून झालेला माजी मुख्य प्रधान खवासखान याचा भाऊ होता.

विजापूरच्या राज्यातील अंत:कलह हा तमिळनाडमध्येही पसरला. नसीर मुहम्मदचा नाश करावा आणि जिंजी ताब्यात घ्यावी हा शेरखानाचा निश्चय. अशा रीतीने कोंडमारा झाल्यामुळे नसीर मुहम्मदने जिंजीचा किल्ला गोवळकोंडा राज्याला देऊन टाकण्याची तयारी दाखविली. अर्थात या देकाराचे स्वागतच करण्यात आले.

ऐन या सुमारास शिवाजीमहाराज दक्षिणेत उतरले. महाराजांच्या बरोबर गोवळकोंडा राज्याची पथकेपण होती. त्यामुळे जिंजीचा किल्ला तू आमच्या हवाली कर असे म्हणून नसिर मुहम्मद याचे मन वळविणे शिवाजीमहाराजांना सोपे गेले. यामुळे विशेष सायास न पडता जिंजीचा बळकट किल्ला मराठ्यांच्या ताब्यात आला. पाँडेचरीचा फ्रेंच प्रशासक मार्टिन हा आपल्या दैनंदिनीत लिहितो:[1]

''नसिर मुहम्मदचा एकच हेतू होता. कोणत्या ना कोणत्या प्रकाराने जिंजीचा किल्ला शेरखानाच्या ताब्यात जाऊ देऊ नये. त्याने कराराच्या अटीत काही बदल केला नाही. शिवाजी कर्नाटकात आला हे कळताच त्याने शिवाजीच्या स्वागताची तयारी केली. आमचा (मार्टिनचा) एक माणूस 28 तारखेस (मे, 1677) परत आला होता, शिवाजीच्या सैन्यातील एक हजार घोडेस्वारांचे एक पथक तेथे आले असून ते जिंजीजवळ तळ ठोकून आहेत. पथकाचा प्रमुख हा नसिर मुहम्मदशी सल्लामसलत करण्यात आला आहे. 31 तारखेच्या सकाळी आम्ही पाँडेचरीला परत आलो... आम्हाला त्याच दिवशी कळले की शिवाजी आणि नसिर मुहम्मद यांच्यात एक करार झाला आहे. शिवाजीची काही पथके जिंजीच्या किल्ल्यात यापूर्वीच दाखल झाली होती. नसिर मुहम्मदला रोख रक्कम देण्यात आली. याशिवाय 50 हजार एकूसच्या (एक नाणे) वार्षिक उत्पन्नाचा प्रदेश त्याला वंशपरंपरा देण्यात आला आहे. तो आता बायकामुलांसहित जिंजी सोडून जाण्याची तयारी करीत आहे.''

यानंतर शिवाजीमहाराज वेल्लोरवर चालून गेले. त्यानी वेल्लोरच्या किल्ल्याला वेढा घातला. वेढा लांबणीवर पडेल असे त्यांना दिसू लागले. त्यामुळे त्यांनी वेढा

1. सेन, *फॉरेन बायोग्राफीज ऑफ शिवाजी,* पृ. 239.

चालू ठेवण्यासाठी आपल्या सैन्याची काही पथके ठेवली. ते स्वत: मात्र बाकीचे सैन्य घेऊन भोवतालचा प्रदेश जिंकीत चालले.

केवळ लूट मिळविणे हा शिवाजीमहाराजांचा या मोहिमेत हेतू नव्हता. त्यांची इच्छा होती, हा प्रदेश कायमचा जिंकून घेण्याची. महाराजांनी आपल्याबरोबर महाराष्ट्रातून विविध खात्यांतील बरीच माणसे आणली होती. त्यांच्या सहकार्याने जिंकलेल्या प्रदेशात मुलकी प्रशासन सुरू झाले.

## किल्ले आणि तटबंदी

शिवाजीमहाराजांनी त्या प्रदेशाच्या संरक्षणाच्या योजना बळकट केल्या. जिंजीच्या किल्ल्याकडे त्यांनी विशेष लक्ष पुरविले. मार्टिन लिहितो, ''शिवाजीने जिंजी किल्ल्याची जागा बारकाईने पाहिली. जिंजीमुळे सुरक्षिततेची मोठी व्यवस्था होत होती. शिवाजीने आज्ञा केली की किल्ल्याच्या तटाचा कांही भाग पाडावा आणि तट बांधावे. त्याप्रमाणे किल्ल्यामधील एका भागाचे पाडण्याचे काम आणि त्याच्याऐवजी मजबूत तटबंदी उभारण्याचे काम जोरात चालू होते.'' (सन 1678, फेब्रुवारी) सन 1678 च्या जुलैमध्ये लिहिताना जेसुईट म्हणतात:[1]

''या प्रदेशातील मुख्य मुख्य स्थळे बळकट करण्यासाठी शिवाजीमहाराजांनी आपली सर्व शक्ती आणि आपल्या राज्याची सर्व साधने खर्ची घातली. त्याने जिंजीच्या भं.वती नवे तट उभे केले, खंदक खणले, बुरूज बांधले, आणि इतर आवश्यक कामे केली. ही कामे त्याने इतक्या उत्कृष्टपणे पार पाडली की युरोपियनांनाही त्याचा हेवा वाटावा.''

या सुमाराम शेरखान हा शिवाजीमहाराजांच्या विरुद्ध लढा देण्याची तयारी करीत होता. पाँडेचरीमध्ये फ्रेंचांची वसाहत त्याच्यामुळे घडून आली होती. फ्रेंचांनी त्याच्यासाठी म्हणून नसिर मुहम्मदकडून पाँडेचरीच्या पश्चिमेस 24 कि. मी. अंतरावर असलेले वाल्डूर हे गाव जिंकून दिले होते. शेरखानाने (शिवाजीमहाराजांच्या विरुद्धच्या मोहिमेत) फ्रेंचांची मदत मागितली. मार्टिनने (फ्रेंच प्रशासक) शिवाजीमहाराजांकडे एक वकील पाठवून सुरक्षिततेच्या आश्वासनाची विनंती केली होती. महाराजांनी फ्रेंचांना कडक इशारा दिला. मार्टिन म्हणतो:

''शिवाजीने आमच्या वकिलाला आश्वासन दिले ते असे, कोणताही पक्ष न घेता तुम्ही पाँडेचरीत सुरक्षित रहावे. पण जर का तुम्ही माझ्या माणसांना थोडी जरी

---

1. श्रीनिवासचारी, जी. एम्., *ए हिस्ट्री ऑफ जिंजी अँण्ड इट्स् रूलर्स,* पृ. 223.

इजा पोहोचविलीत तर याद राखून ठेवा. तुमच्याशी अगर राजापूर येथील वखारीत तुमची जी माणसे असतील त्यांच्याशी कोणत्याही प्रकारची दयामाया दाखविण्यात येणार नाही. आम्ही थोड्याच दिवसांत पण पाँडेचरीच्या प्रशासनासाठी हवालदार पाठवणार आहोत, आणि याप्रमाणे तुम्ही शेरखानाच्या अधिकाऱ्यांबरोबर नांदलात तसेच तुम्हाला आमच्या हवालदारांबरोबर नांदावे लागेल.''

शेरखान आणि मार्टिन यांची गाठ सन 29 जून 1677 रोजी पडली. त्यावेळी शेरखानाने लंब्या-चौड्या बाता केल्या. शेरखानाने थाप मारली ती अशी, विजापूरचा मुख्य प्रधान बहलोलखान याने गोवळकोंड्याच्या बादशहाला निर्वाणीचा खलिता दिला असून त्याने शिवाजीशी केलेला तह मोडून टाकावा अशी मागणी केली आहे. शेरखानाने मार्टिनला हे पण सांगितले की शिवाजीने 4 ते 5 हजारच घोडेस्वार पाठविले तर आपण त्यांच्याशी युद्ध करू.

मार्टिनला मात्र शंका होती. मार्टिनच्या माहितीप्रमाणे महाराजांपाशी 12 हजार घोडेस्वार आणि कित्येक हजारांचे पायदळ होते. मार्टिनच्या मते युद्ध करण्याची शेरखानाची पात्रता नव्हती.

शेरखानावर हल्ला झाला तो जून 1677 मध्ये. तिरूवाडी नावाचे गाव आहे. त्याला आता तिरूमलपाडी म्हणतात. हे गाव कावेरीची मुख्य शाखा जी कोलडून नदी त्यावर असून तंजावरपासून 27 कि. मी. अंतरावर आहे. या युद्धात शेरखानाचा पराजय झाला आणि तो युद्ध सोडून पळाला. त्याने भुवनगिरी या किल्ल्याचा आश्रय घेतला. मराठ्यांनी शेरखानाचा पाठलाग केला आणि भुवनगिरीला वेढा घातला.

शेरखानाने 5 जुलै रोजी आपल्या ताब्यातील सर्व प्रदेश मराठ्यांच्या हवाली केला. याशिवाय मराठ्यांना 2 हजार पॅगोडा खंडणी म्हणून देण्याचे त्याने कबूल केले. ती देईपर्यंत त्याचा मोठा मुलगा याला मराठ्यांच्याकडे ओलीस ठेवण्यात आला. विजापूरकडून आपल्याला मदत येईल अशी त्याला शेवटपर्यंत आशा वाटत होती. पण ती आशा निरर्थक होती. अशा रीतीने एका झटक्यात तमिळनाडमधील विजापूरची सत्ता नाहीशी झाली. त्याबरोबरच तंजावर आणि मदुरा या राज्यातील विजापूरचे वर्चस्वही नष्ट झाले.

आता शिवाजीमहाराजांच्यासमोर तंजावरचे प्रकरण उभे राहिले. तंजावरवर सत्ता होती त्यांचे सावत्र बंधू व्यंकोजी यांची. व्यंकोजी राजांना म्हैसूर कर्नाटकांतील प्रदेश आणि तमीळनाडमधील जिंजीभोवतालचा प्रदेश हे शहाजीराजांकडील वारसाने मिळाले होते. पण त्यांनी स्वत:च्या कर्तबगारीने तंजावर जिंकले आणि तेथे सन 1676 च्या जानेवारीमध्ये आपले राज्य स्थापन केले, ही त्यांची स्वत:ची

कर्तबगारी होय. व्यंकोजीचे हे राजकारण दूर करणे (तंजावरवरून हटवणे) हे विजापूरच्या मनात असूनही साधनांच्या अभावी शक्य नव्हते. पण एक गोष्ट मात्र स्पष्ट होती की व्यंकोजी हा बऱ्याच बाबतीत विजापूरवर अवलंबून होता. (आपण विजापूरचे अंकित आहोत ही भूमिका त्याने सोडली नव्हती.)

तंजावरसहित व्यंकोजीचा सर्व प्रदेश आपल्या ताब्यात घ्यावा हा विचारही महाराजांच्या मनात आला होता. व्यंकोजीराजांना महाराष्ट्रातही भक्कम जहागीर द्यावी किंवा गोवळकोंडा राज्यात कुतुबशहाकडून जहागीर मिळवून द्यावी अन अशा रीतीने तंजावरहून त्यांना (व्यंकोजीना) हलवावे हे बरे, असे महाराजांना वाटले असेल. असे का बरे? याचे कारण असे की यापुढे विजापूरचे संबंध एक तंजावरच काय, मदुरा आणि म्हैसूर यांच्याशीही राहाता कामा नयेत असा त्यांचा ठाम निर्धार होता.

असे असले तरी आपला हेतू साध्य करून घेण्यासाठी महाराजांनी व्यंकोजीराजांना भेटीस बोलाविले. त्या दोघांची भेट 1677च्या जुलै मध्ये तिरूवाडीच्या छावणीत झाली. आपल्या वडिलार्जित स्थावर जंगम मालमत्तेच्या वाटणीची महाराजांनी मागणी केली. शिवाजीमहाराजांच्या मनांत काय विचार घोळत असावेत याची कल्पना व्यंकोजीराजांना आली. त्यामुळे धास्तावून व्यंकोजीराजे तंजावरला पळून गेले.

शिवाजीमहाराजांनी व्यंकोजीकडे तंजावरचा ताबा ठेवला पण कावेरीच्या उत्तरेकडे असलेला व्यंकोजीचा प्रदेश म्हणजे म्हैसूर-कर्नाटकातील बेंगलोर, होसकोट, कोलार इत्यादी आणि तमिळनाडमधील जिंजीजवळचा प्रदेश हे सर्व त्यांनी आपल्या राज्याला जोडून घेतले. शिवाजीमहाराजांचा मुक्काम तिरूवाडी येथे असताना मदुराई, म्हैसूर येथील राजे आणि वेलूर उलंदूरपेठ इत्यादीचे जमीनदार (पाळेगार) यांनी आपापले वकील महाराजांची भेट घेण्यासाठी पाठविले.

फ्रेंचांनी शिवाजीमहाराजांच्या छावणीचे चांगले वर्णन केले आहे.[1] महाराजांचे बळ कशात होते हे त्यांनी अचूकपणे सूचित केले आहे. फ्रेंचांच्या दृष्टीस काय आढळले? ते म्हणतात, "शिवाजीमहाराजांच्या छावणीत डामडौल नव्हता. छावणीत बायका-माणसे नव्हती. अतिरिक्त सरंजाम नव्हता. फक्त जाड्याभरड्या कपड्याचे तंबू होते. तेही किती म्हणाल? तर एक तंबू स्वत: शिवाजीमहाराजांसाठी व दुसरा त्यांच्या मुख्य प्रधानांसाठी."

---

1. सेन, *फॉरेन बायग्राफीज ऑफ शिवाजी,* पृ. 306 आणि 316.

आणखी एके ठिकाणी मार्टिनने म्हटले आहे, ''शिवाजीमहाराजांच्या घोडेस्वारांना सामान्यपणे प्रत्येकी दर महिन्यास दोन पॅगोडा असा पगार मिळतो, हे येथे सांगणे अस्थानी होणार नाही. सैन्यातील सर्व घोडे हे शिवाजीचे (सरकारचे). त्या घोड्यांची निगा राखण्यासाठी मोतद्दार असत. घोडेस्वार याची त्या बाबतीत काही ढवळाढवळ नसे. दर दोन माणसांमागे तीन घोडे असत. यामुळे शिवाजीमहाराजांची सैन्ये इतकी चपळ का याची कल्पना येईल. त्याच्या शत्रूंना वाटे की तो लांब अंतरावर आहे. अशा वेळी तो त्यांच्यावर अचानक तुटून पडे. यामुळे शत्रू गोंधळून जाई. या प्रदेशात असलेल्या शिवाजीच्या घोडेस्वारांची कुटुंबे हिंदुस्थानच्या पश्चिम किनारपट्टीवर राहात. त्यामुळे हे घोडेस्वार शिवाजीला चिकटून राहात. शिवाजी आपल्या हेरांना उदारपणे मुबलक पगार देत असे. त्यामुळे ते त्याला अचूक माहिती पुरवित. ह्या कारणांनी त्याला आपले विजय प्राप्त करणे बरेच सोईचे गेले.''

घोडदळाच्या चपळ हालचाली आणि भक्कम पगार घेऊन बाळगलेले उत्कृष्ट हेरखाते ही शिवाजीमहाराजांच्या यशाची दोन प्रमुख कारणे होत, असे या फ्रेंच माणसाचे मत दिसते. शिवाजीमहाराजांच्या छावणीचा साधेपणा, त्यातील भारी सरंजामाचा अभाव आणि छावणीतील स्त्रियांची अनुपस्थिती, या गोष्टी त्याच्या नजरेत आलेल्या दिसतात. शिवाजीमहाराज आपल्या घोडेस्वारांना वेळेवर पगार देत, पण हे घोडे मात्र सरकारचे असत ही गोष्टही त्याच्या नजरेतून सुटलेली नाही. अश्वदळांतील एकूण एक घोडे म्हणजे सरकारची मालमत्ता. मंदगती आणि मनसबदारीच्या पद्धतीच्या ओझ्याने वाकलेल्या मोगलांच्या सैन्याचा आणि वरील मराठा सैन्याचा काही मेळ आहे का? दोन अगदी विरुद्ध टोके!

हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावर डच लोकांनी पुष्कळ वर्षापासून वसाहती केल्या होत्या. त्यांनी महाराजांच्याकडे सन 1677 च्या 6 ऑगस्ट रोजी आपले प्रतिनिधी पाठविले. पूर्वीच्या सत्ताधाऱ्यांनी त्यांनी ज्या सवलती दिल्या होत्या त्या कायम ठेवून तशाच चालू ठेवाव्यात ही त्यांची इच्छा. त्यांची विनंती मान्य करण्यात आली.

इतिहासज्ञ डॉ. रवींद्र रामदास यांनी शिवाजीमहाराजांनी डचांच्या बरोबर केलेल्या व्यापारी करारातील एका विशिष्ट कलमाकडे लक्ष वेधले आहे. ते कलम असे आहे:

''मुसलमानांच्या कारकिर्दीत तुम्हाला स्त्री आणि पुरुष यांना गुलाम म्हणून विकत घेण्याची आणि विकण्याची अनिर्बंध परवानगी होती. पण आता माझ्या

राज्यात स्त्री आणि पुरुष यांना गुलाम म्हणून विकण्याची आणि विकत घेण्याची परवानगी मिळणार नाही. असे काही करण्याचा तुम्ही प्रयत्न कराल तर माझी माणसे तुम्हाला प्रतिबंध करतील. या कलमाचे काटेकोर पालन झालेच पाहिजे."[1]

शिवाजीमहाराजांच्या मानवजातीच्या संबंधीच्या या कळकळीवरून कल्याणकारी राज्य म्हणजे कसे असावे याचे त्यांना वाटत असलेले स्वरूप हे स्पष्टपणे दिसून येते.

सन 1677 च्या 27 जुलै रोजी शिवाजीमहाराजांनी कोलादून (कावेरीचे मुख्य पात्र) नदीवरील आपली छावणी हलवली. त्यानी वृद्धाचलम्च्या तीर्थस्थानाचे दर्शन घेतले. 22 सप्टेंबर रोजी महाराज हे वेल्लोरच्या नैऋत्य दिशेला 64 कि. मी. अंतरावर असलेल्या वणिकमवाडी या स्थळी पोहोचले. ऑक्टोबरच्या सुरूवातील ते मद्रास शहरापासून दोन टप्प्यावर होते. त्यावेळी मद्रासेतील दुर्गा मंदिराला त्यांनी भेट देऊन देवीचे दर्शन घेतले असावे. देवळांत अशा प्रकारची आख्यायिका आहे.

शिवाजीमहाराजांनी मद्रासमधील ब्रिटिशांशी पत्रव्यवहार केला होता. त्यांनी कांही औषधांची मागणी केली होती, याशिवाय निरनिराळ्या किल्ल्यांमधून नवीन कामे चालू करण्यासाठी त्यांनी इंजीनियर (तंत्रज्ञ) मागवले होते. ब्रिटिशांनी औषधे पाठविली, पण तंत्रज्ञांची मागणी त्यांनी खुबीने पण सौजन्याने टाळली.

तमिळनाडमधील प्रदेशातील प्रशासनासाठी महाराजांनी उत्कृष्ट व्यवस्था केली. रघुनाथ नारायण हनुमंते याची तमिळनाडचा प्रमुख प्रशासक म्हणून नेमणूक करण्यात आली. कर्नाटकमधील प्रदेशही त्याच्या हाताखाली देण्यात आले. व्यंकोजीच्या हालचालीवर लक्ष ठेवण्यासाठी महाराजांनी आपला सेनापती हंबीरराव मोहिते याच्या हाताखाली कसलेले सैन्य तमीळनाडमध्ये ठेवले होते.

महाराजांनी केले ते योग्यच होते. कावेरीच्या उत्तरेकडील प्रदेश आपल्या हातातून जावा याचे व्यंकोजीराजांना मनस्वी दुःख झाले. शिवाजीमहाराज उत्तरेकडे परत चालले, ते आता दक्षिणेत नाहीत ही संधी साधून त्याने मराठ्यांच्या सैन्यावर हल्ला चढविला. ही घटना नोव्हेंबर 1677 मधील होय. अपेक्षेप्रमाणेच ह्या व्यंकोजीचा पराजय होऊन त्याला तंजावरला पळून जावे लागले. महाराजांची सैन्ये तंजावर घेऊ शकली असती पण महाराजांनी तंजावर हे व्यंकोजीराजांकडे ठेविले. पण तहास अनुसरून बाकीचा इतर प्रदेश मात्र शिवाजीमहाराजांच्या राज्यास जोडला गेला.

---

1. *इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी,* खंड 1, पृ. 137.

व्यंकोजीराजांनी स्थापन केलेले तंजावरचे राज्य सन 1799 पर्यंत चालले. त्यापूर्वी ब्रिटिशांनी तेथील राज्यकारभार आपल्या ताब्यात घेतला. तंजावरचे मराठे राजे हे कला आणि साहित्य यांचे मोठे आश्रयदाते होते. त्यांनी संस्कृत, तमिळ, तेलुगु आणि मराठी विद्वानांना आश्रय दिला. तंजावर येथील सरस्वती-महाल ग्रंथालय ही एक महत्वाची संस्था आहे. ह्या ग्रंथालयात संस्कृत, तमिळ, तेलुगु व मराठी ह्या भाषांतील हजारो हस्तलिखिते ठेवण्यात आली आहेत. सरस्वती महाल ग्रंथालयाला आपल्या देशातील राष्ट्रीय महत्वाची अशी एक संस्था समजण्यात येते हे योग्यच आहे. तंजावरच्या मराठी राजांनी पुढील पिढ्यांच्यासाठी जी अनेक चांगली कामे करून ठेवली त्यामध्ये सरस्वती महाल ग्रंथालय हे एक होय.

## अविरत कूच

सन 1677 च्या ऑक्टोबर महिन्याच्या शेवटी महाराजांनी तमीळनाड प्रदेश सोडून कूच केले. त्यांनी घाट ओलांडला. अन् ते कर्नाटकांत दाखल झाले. वाटेत त्यांनी व्यंकोजीराजांचे प्रदेश आपल्या ताब्यात घेतले. तमीळनाडमधील वेल्लोरचा विजापुरी किल्लेदार याने पुढे म्हणजे सन 1678 च्या 21 जुलै रोजी किल्ला मराठ्यांच्या ताब्यात दिला.

महाराष्ट्रात परत येताना महाराजांच्या म्हैसूर राज्याशी काही चकमकी झाल्या. महाराजांना महाराष्ट्रात परत येण्याची घाई होती हे स्पष्ट आहे. मोगलांच्या बरोबरचा तह म्हणजे एक कच्चे सूत्र. मोगल सुभेदार बहादूरखान याने विजापूरकडून नळदूर्ग आणि गुलबर्गा हे जिंकून घेतले. बहादूरखानाचा दुय्यम सेनापती दिलेरखान याने विजापूरचा पठाण मुख्य प्रधान बहलोलखान याच्याशी त्वरेने संपर्क साधला. बहलोलखानाचा हेतू विजापूर वाचविण्याचा होता. दिलेरखानाला हे मान्य होते. विजापूर वाचवायचे कसे? मोगलांची सैन्ये गोवळकोंड्याकडे वळविली तर! दिलेरखान आणि बहलोलखान या दोघांनी औरंगजेबापाशी पुढीलप्रमाणे तक्रार केली.

''बहादूरखानाने शिवाजीशी तह केला आहे, आणि गोवळकोंड्याने शिवाजीशी स्नेहसंबंध राखले आहेत. बहादूरखानाला बडतर्फ करण्यात यावे. आणि मग बहलोलखान आणि दिलेरखान हे दोघे गोवळकोंडा राज्यावर चाल करून जातील आणि त्या राज्याला अद्दल घडवतील.''

आश्चर्य पहा, वरील विचारसरणीने औरंगजेबाचेही मन वळले. दक्षिणेतील मोगल धोरणाची ही अशीच शोकांतिका होत गेली. इ.स. 1656 मध्ये राजपुत्र

औरंगजेब दक्षिणेचा सुभेदार होता. त्यावेळी तो गोवळकोंड्याचे राज्य संपूर्णपणे नष्ट करू शकला असता. पण गोवळकोंड्याचा माजी मुख्य प्रधान आणि आताचा शहाजहानचा मुख्य प्रधान धूर्त मीर जुमला याला स्वत:च्या कर्नाटकातील जहागिरीची काळजी होती. त्याने काय करावे ? त्याने शहाजहान आणि औरंगजेब यांची मने वळवून त्यांना विजापूरवर हल्ला करण्यास लावले. अर्थात त्यामुळे गोवळकोंड्याला जीवदान मिळाले.

इ.स. 1660 मध्ये विजापूरविरुद्ध तुम्ही मोहीम कराल तर मी तुमच्याशी सहकार्य करीन असे शिवाजीमहाराजांचे आश्वासन शाइस्तेखानाने झिडकारले. तयारी न करता राजा जयसिंग याने विजापूरची मोहीम हाती घेतली. या मोहिमेत शिवाजीमहाराजांना ओढण्यात आले. महाराज हे त्यात मन:पूर्वक सामील झाले नव्हते. ही मोहीम करावयास नको होती. परिणाम काय झाला ? मोगलांना अगतिक होऊन परतावे लागले. आणि आता विजापूरचा सर्वनाश जवळ येऊन ठेपलेला, तर बहादूरखानाच्या विरुद्ध त्याच्याच सरदारांनी केलेल्या कारस्थानामुळे तो सर्वनाश व्हावयाचा थांबला.

बहादूरखान उत्तरेकडे चालला. दिलेरखान (मोगल सेनापती) आणि बहलोलखान (विजापूरचा मुख्य प्रधान) यांनी गोवळकोंडा राज्यावर आक्रमण केले. त्यांची सैन्ये सन 1677 च्या सप्टेंबरमध्ये मळखेड येथे पोहोचली. मळखेड हे गाव गुलबर्ग्याच्या पूर्वेस 35 कि. मि. अंतरावर आहे. दोन महिन्यापर्यंत निकराच्या लढाया झाल्या. गोवळकोंड्याच्या सैन्याने प्रखर प्रतिकार केला. मोगलांना पुढे सरकता येईना. शेवटी ऑक्टोबर महिन्यात मोगलांना गुलबर्ग्याकडे परतावे लागले. मोगलांचे परतणे म्हणजे एक फजितवाडाच होता. पावलोपावली त्यांना शत्रूशी लढतच यावे लागले. पस्तीस कि. मी. ते अंतर काय, पण ते कापण्यासाठी मोगलांना तब्बल 12 दिवस लागले.

यानंतर लवकरच बहलोलखान हा गुलबर्गा येथे भयंकर आजारी पडला. गोवळकोंड्याचा बादशहा अबुल हसन कुतुबशहा याने विजापुरातील दक्षिणी मुसलमानांचा पुढारी शिद्दी मसूद आणि बहलोलखान यांच्यात तडजोड घडवून आणली. तडजोडीच्या अटी पुढीलप्रमाणे ठरल्या. शिद्दी समुद याने मुख्य प्रधान (विजापूरचा) म्हणून कारभार करावा, आणि बहलोलखानाला सैनिकांच्या पगाराची थकबाकी म्हणून मुबलक रक्कम देण्यात यावी. वरील तडजोड घडवून आणण्यात दिलेखानाचाही भाग होता.

ह्या सुमारास बहलोलखान हा सन 1677 च्या 25 डिसेंबर रोजी वारला.

इतका प्रचंड कोलाहल झाल्यानंतर कुठे पठाणांना दक्षिणी पक्षाच्या समोर नमावे लागले.

विजापूरचा नवीन मुख्य प्रधान शिद्दी मसूद याच्याकडून दिलेरखानाने तहाच्या कठीण अटी मान्य करून घेतल्या: ''विजापूरने मोगल सम्राटाची संपूर्ण ताबेदारी पत्करावी. शिवाजीचा नाश करण्यामध्ये मोगल हे विजापूरला मदत करतील. विजापूरचा बादशहा सिंकदर आदिलशहा याची बहीण औरंगजेबाचा मुलगा आज्जम याला देण्यात यावी.''

या घडामोडींकडे शिवाजीमहाराजांचे बारकाईने लक्ष होते. मसूदच्या नेतृत्वाखाली विजापूरने आपल्याविरुद्ध युद्ध करण्याचे धोरण पत्करले आहे हे त्यांना दिसत होते. महाराजांना मोगलांनी आपल्याविरुद्ध युद्ध चालू ठेवण्याचा निश्चय केला आहे याचीही दखल घ्यावयाची होती. आपल्याविरुद्ध मोगल आणि विजापूर हे दोघे एक झाले आहेत ही राजकारणावरील छाया अधिक दाट होत आहे हे त्यांना जाणवत होते. अशा वेळी दक्षिण भारतात रेंगाळत राहाणे त्यांना परवडण्यासारखे नव्हते. सहा महिन्यांच्या अल्पावधीत महाराजांनी विजापूरचे दक्षिणेतील वर्चस्व प्रभावीपणे नष्ट केले आणि त्या जागेवर मराठ्यांच्या संरक्षणाचा एक भक्कम तळ कायम केला. तमिळनाडमधून मराठ्यांना हुसकून लावण्यासाठी मोगलांना 20 वर्षे झुंज द्यावी लागली. ह्या एका गोष्टीने मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धातील मोगलांच्या डावपेचावर अतिशय गंभीर असे परिणाम झाले.

शिवाजीमहाराजांच्या दक्षिणेतील कार्याचे मार्टिनने थोडक्यात पण मार्मिक वर्णन केले आहे:

''युरोपमध्ये आम्ही जर मोठ्या क्रांत्यांची उदाहरणे पाहिली नसती तर आम्हालाही म्हणता आले असते की, (दक्षिणेत) इतक्या आकस्मिकपणे घडून आलेली अशी क्रांती यापूर्वी कधीच कुणीही पाहिली नसेल.''

परतीच्या मार्गावर शिवाजीमहाराज कोप्पळ (रायपूर जिल्हा, कर्नाटक), लक्ष्मेश्वर आणि बेलवडी या स्थळी आले. बेलवडीचे स्थळ फेब्रुवारी महिन्यात जिंकून घेण्यात आले. सन 1678च्या एप्रिल महिन्यात शिवाजीमहाराज हे आपल्या राज्यातील पन्हाळगड येथे आले.

# 9

# शेवटची दोन वर्षे

## एक

**मो**गलांच्या बरोबर युद्ध चालूच होते. इ.स. 1678 मधे वेल्लोर (उत्तर अर्काट जिल्हा, तमिळनाड) चा किल्ला मराठ्यांच्या हाती पडल्यावर मार्टिन याने आपल्या दैनंदिनीत जी नोंद केली त्यावरून महाराजांच्या राज्याच्या विस्ताराची आपल्याला कल्पना येते. तो म्हणतो, ''शिवाजीच्या सैन्याने इतर प्रांतांतही आपली सत्ता पुढे सरकावली आहे. ती पुढील प्रमाणे. आम्हाला अशी खात्री देण्यात येते की शिवाजीच्या पश्चिमेकडील राज्यात आणि इकडे पूर्वेकडील त्याने जिंकून घेतलेल्या राज्यात फक्त 30 लीग (सुमारे 90 मैल किंवा 144 कि. मी.) इतकेच अंतर राहिले आहे.''

दिलेरखानाने विजापूरचा मुख्य प्रधान शिद्दी समूद याच्यावर कठोर अटी लादल्या होत्या. त्या दोघांनी मिळून शिवाजीमहाराजांच्या विरुद्ध मोहीम उघडली खरी पण तीत त्यांना यश आले नाही. या सुमारास औरंगजेबाने दिलेरखानाला एक सणसणीत पत्र लिहिले. त्यात त्याने म्हटले, 'तुम्ही शिद्दी मसूदला विजापूरचा ताबा का घेऊ दिलात? अफगाण (पठाण, विजापूरात) गोंधळलेल्या मन:स्थितीत आहेत. दक्षिणी सरदार यांचे आपसात मतभेद आहेत. त्यांना आपल्याकडे वळवून घ्या. त्यांना बादशाही चाकरीत घ्या. आणि विजापूरला वेढा घाला.'

बहादूरखान तरी काय करीत होता? विजापूरच्या नाशाचाच प्रयत्न करीत होता ना? दिलेरखानालाही आता तेच करावे लागले.

सन 1678 चा पावसाळा दिलेरखानाने बहादूरगड (अहमदनगर जिल्हा, श्रीगोंदा तालुका, दौड जवळ, भीमेच्या काठावर) येथे काढला. विजापूरविरुद्ध तो मोहिमेची तयारी करीत होता. अंत:कलहाने पेटलेल्या त्या राज्यातून येथील जितकी माणसे फुटून येऊ पाहात होती त्यांना तो उत्तेजन देत होता. औरंगजेबाने स्पष्ट सूचना दिल्या होत्या की फुटून येणाऱ्या अधिकाऱ्यांना योग्य त्या मनसबी देण्यात याव्यात, त्यांना जी रोख रक्कम देण्यात यावी तिच्यासाठी मनसबी ठरविण्याची वाट

पाहाण्याची आवश्यकता नाही. कुणीही सरदार आपली पथके घेऊन विजापूरहून आला की त्याला प्रत्येक घोडेस्वारामागे रोजचे सहा आणे ताबडतोब दिले गेले पाहिजेत अशी आज्ञा होती. तारीखे दिल्कुशाचा लेखक भीमसेन सक्सेना लिहितो की अल्पावधीत 20 हजार घोडेस्वार विजापूर आणि गोवळकोंडा सोडून दिलेरखानाला येऊन मिळाले.

याच सुमारास राजपुत्र मुअज्जम हा दक्षिणेत सन 1678 च्या ऑक्टोबरमध्ये आला आणि दक्षिणेचा सुभेदार म्हणून औरंगाबाद येथे काम पाहू लागला.

## दोन

दिलेरखानाचा सर्वात मोठा विजय म्हणजे त्याने संभाजीराजांचे मन मोगलांना येऊन मिळण्यासाठी वळविले हा होय. आपल्या मुलाने आपल्याला सोडून मोगलांकडे निघून जावे या घटनेने शिवाजीमहाराजांना अत्यंत धक्का बसला. संभाजीराजे हे अतिशय हट्टी आणि दुराग्रही स्वभावाचे होते. ते महाराजांचे वारस आणि युवराजही होते. राज्यकारभारात आपल्याला मिळत आहे त्याहून अधिक वाटा मिळावा अशी कदाचित् त्यांची तीव्र इच्छा असावी. आपली सावत्र आई स्वत:चा मुलगा राजाराम याच्या हितासाठी झटत असल्यामुळे त्या गोष्टीचा परिणाम आपल्या भवितव्यावर होण्याची शक्यता आहे, असेही त्याना वाटले असावे. महाराजांचे मंत्री विरूद्ध कारस्थाने करतात अशीही त्यांची भावना असावी.

दक्षिण भारताच्या मोहिमेवर शिवाजीमहाराजांनी संभाजीराजांना आपल्याबरोबर घेतले नाही. त्यांनी आपल्या गैरहजेरीत संभाजीराजांना राहण्यासाठी म्हणून रायगडाच्या बाहेर नेमले. हा आपल्यावरील महाराजांच्या विश्वासाचा अभावच होय. असेही संभाजीराजांच्या मनाने घेतले असावे.

शत्रूची मर्मस्थळे शोधणे हा मोगलांचा सततचा उद्योग असे. मनसबदारी देण्याचे आमिष हे पुष्कळदा प्रभावी ठरे. या मनसबदारीच्या आश्वासनाचा दुबळ्या झालेल्या रजपूत राज्यांत त्यानी यशस्वीपणे उपयोग करून घेतला. उदयपूरच्या राजघराण्यातील धाकटी भावंडे आणि मुले मोगलांच्या हाताखाली मनसबी मिळवू लागली, आणि अजाणतेपणे का होईना त्याचा परिणाम म्हणून राज्याचा विस्तार आणि राज्याचे वर्चस्व कमी होऊ लागले.

संभाजीराजांसाठी मनसब ही शिवाजीमहाराजांकडे सन 1665 मध्ये पुरंदरला आणि सन 1667 मधे औरंगाबाद या मुक्कामाहून मान्य करण्यात आली. सन 1675 मध्ये बहादूरखानाने संभाजीराजांसाठी मनसब मागितली. मनसबीच्या

ह्या प्राप्तीसंबंधी संभाजीराजांनी मागील घटनेवरून स्वत:च्या मनाची समजूत घातली असावी. आपल्या कृत्याचे समर्थन संभाजीराजांनी एका दानपत्रात केले आहे. हे दानपत्र सन 1680 च्या 24 ऑगस्ट रोजी एका ब्राह्मणाला देण्यात आले आहे. दानपत्रात म्हटले आहे, ''राणीचे (सोयराबाई) मन स्फटिकासारखे निर्मळ होते. पण कुटिल मंत्र्यांनी दुष्ट सल्ला दिला की मोठ्या मुलाला गादी मिळता कामा नये. या सल्याचा प्रभाव तिच्यावर पडला. राजाने (शिवाजीमहाराज) राणीच्या बाजूने पक्षपात केला. त्यामुळे तो आपल्या विरूद्ध झाला. असे असूनही त्याने आपल्या वडिलांच्या सेवेत आणि निष्ठेत काही म्हणता काही कसूर केली नाही. आपल्या कर्तव्यपालनात तो स्वत: (संभाजी) दशरथी रामाप्रमाणे होता. त्याने दीड कोटी रूपयांची दौलत, किल्ले आणि राजाचा दर्जा, मान आणि सन्मानही गवताप्रमाणे तुच्छ समजून त्यांचा त्याग केला.''

संभाजीराजांनी मोठ्या ऐटीने स्वत:ची रामाबरोबर तुलना केली आहे. पण सन 13 डिसेंबर 1678 रोजी त्याने मोगलांना जाऊन मिळण्याचे पाऊल उचलले. हा मार्ग अतिशय धोक्याचा होता. दिलेरखानाने संभाजीराजांचे भरघोस स्वागत केले. त्याचा आनंद गगनात मावेना. औरंगजेबाने त्या तरूण राजपुत्राला (संभाजी) सात हजारी मनसबदार बनविले. हा मान फारच थोड्या लोकांना मिळाला होता. या शिवाय संभाजीला राजा ही पदवी देण्यात आली.

संभाजीराजांचे मोगलांकडे निघून जाणे हा प्रकार म्हणजे महाराजांच्यावर फार मोठा आघात होता. पण त्या महापुरूषाने आपला संयम सोडला नाही. आपल्या मुलाने परत यावे यासाठी त्याचे मन वळविण्याचे महाराजांनी प्रयत्न चालू ठेवले. शिवाजीमहाराजांनी विजापूर आणि मोगल यांच्यात वितुष्ट घडवून आणले आणि त्यांची जूट फोडली. त्याबरोबरच त्यांनी विजापूरला आपले संपूर्ण सहकार्य देऊ केले.

या सुमारास दिलेरखान आणि संभाजीराजे यांनी मराठ्यांच्या भूपाळगड या किल्ल्यावर हल्ला चढविला. हा किल्ला सन 1679 च्या 2 एप्रिल रोजी मोगलांच्या ताब्यात आला. किल्ला मराठ्यांच्या हातून जाण्याचे प्रमुख कारण म्हणजे शिवाजीमहाराजांचा मुलगा हाच, किल्ला घेण्यासाठी चाल करून येत आहेत हे पाहून किल्लेदार अगतिक झाला; हे होय. शिवाजीमहाराजांनी शिस्तीचे कडक उपाय योजले, आणि किल्लेदाराला योग्य ती शिक्षा केली. त्यामुळे राज्यातील इतर किल्ल्यांतील शिबंदी, किल्लेदार आणि लष्करी ठाण्याचे अधिकारी या सर्वांनी वरील घटनेपासून योग्य धडा घेतला.

मराठ्यांच्या विरूद्ध आपले काही चालत नाही असे पाहून दिलेरखानाने आपले लक्ष विजापूरकडे वळविले. तोपर्यंत शिद्दी मसूद आणि शिवाजीमहाराज यांनी आपसात मैत्रीचा तह केला होता.

विजापूरवर हल्ला करण्यासाठी दिलेरखानाने जय्यत तयारी केली. पण त्याच्याकडे सैनिक काय किंवा सरंजाम काय, मदत म्हणून पाठविण्याची औरंगजेबाची परिस्थिती नव्हती. जोधपूरचा राजा महाराजा जसवंतसिंग हा 10 डिसेंबर 1678 रोजी वारला. औरंगजेबाने जोधपूरचे राज्य जप्त केले. स्वत: औरंगजेब हा 19 फेब्रुवारी 1679 रोजी अजमेर येथे दाखल झाला. जसवंतसिंगाचा मुलगा अजितसिंग याचा जन्म आपल्या बापाच्या मृत्युनंतर अल्पकाळातच झाला. त्या लहान बालकाला दिल्ली येथे आपल्या ताब्यात घेण्याचे औरंगजेबाने प्रयत्न केले. पण रजपुतांनी त्या बालकाला शर्थीने सोडविले. आणि ते (रजपूत) त्याला (अजितसिंग) सन 1679 च्या 23 जुलै रोजी घेऊन गेले.

रजपूतांचा बिमोड करण्यासाठी औरंगजेब हा 3 सप्टेंबर रोजी पुन्हा अजमेरकडे रवाना झाला. उदयपूरच्या राज्याने जोधपूरशी हातमिळविणी केली होती. आणि दोन्ही राज्ये मोगलांशी निकराने लढू लागली होती.

### तीन

याचवेळी औरंगजेबाने जिझियाकर लागू करण्याचे हुकूम काढले. मोगल साम्राज्यातील प्रजेपैकी प्रचंड संख्या राज्यकर्त्याहून वेगळ्या धर्माची होती. त्यांना दुय्यम दर्जाचे नागरिक म्हणून वागवण्याचे औरंगजेबाचे धोरण होते. त्याचा घवघवीत पुरावा म्हणजे जिझिया कराचा हा हुकूम होय. औरंगजेबाचा धर्मनिष्ठ सचीव आणि चरित्रकार साकी मुस्तैदखान म्हणतो, [1] "या धर्मनिष्ठ बादशहाचे (औरंगजेब) सर्व उद्देश एकाच दिशेने असत. आणि ती दिशा म्हणजे इस्लामच्या व्यवहार धर्माचा (लॉ) प्रसार करणे आणि काफिरांचे व्यवहार आणि चालीरीती या नाहीशा करणे; ही होय. या हेतूने प्रेरित होऊन त्याने आपल्या उच्च दिवाणी अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे आज्ञा केली, हा हुकूम बुधवारपासून (2 एप्रिल 1679) अंमलांत यावा. हा हुकूम कुराणातील पुढील आदेशानुसार असावा. ते आदेश पुढीलप्रमाणे आहेत. 'त्यानी (बिगर मुसलमानांनी) जिझिया कर हा नम्रपणे आपल्या हाताने भरावा. असे करताना इस्लामी धर्मशास्त्राने घालून दिलेली रीत

1. खान, साकी मुस्तैदखान, *मासिरे आलमगीरी*

पाळावी. ज़िझिया कर हा बिगर मुसलमानांकडून (जिम्मी), राजधानीत आणि प्रांताप्रांतातून वसूल करण्यात यावा.'

सुप्रसिद्ध इतिहासज्ञ एम्. अत्हरअली यांनी या बाबतीत आपले विचार पुढीलप्रमाणे मांडले आहेत[1] "औरंगजेबाने 1658-59 मध्ये सत्ता बळकाविली. आपल्या कृत्याचे त्याला समर्थन करावयाचे होते. यासाठी या कर्मठ बादशहाने पुराणमतवादी मुसमानांशी निकटचे रांबंध स्थापन केले. आणि हिंदूच्या विरुद्ध पक्षपाती धोरण स्वीकारले. या धोरणाला आणखी एक कारण घडले. औरंगजेबाला त्याच्या लष्करी मोहिमांतून अपयश येत गेले, हे ते कारण होय." रजपूतांच्यावरील औरंगजेबाच्या मोहिमेसंबंधी अत्हर अली यांचे म्हणणे असे की मनसबदारी पद्धतीचा मोठा पेचप्रसंग निर्माण झाला (जहागिरी देण्यासाठी प्रदेश शिल्लक नव्हते). आणि त्यामुळे रजपूतांची राज्ये हस्तगत करण्याचा औरंगजेबाला मोह झाला. औरंगजेबाच्या कारकिर्दीत रजपूतांचे महत्व नगण्य झाले. ही गोष्टही औरंगजेबाच्या लढाऊ कर्मठपणाच्या नवीन पवित्र्यांशी जुळणारीच होती. जिझियाकर लादण्याच्या औरंगजेबाच्या या अदूरदर्शी ह्या संबंधात औरंगजेबाला जे पत्र पाठविले ते मोठे लक्षणीय आहे. पत्राची भाषा, पत्रांच्या शब्दातील गांभीर्य, पत्रात व्यक्त केलेला निषेध आणि दिलेली समज ही पाहाण्यासारखी आहे. मानवतावादाच्या भूमिकेवरून केलेले आवाहन हे या पत्रात आढळते. पत्रात शेवटी शिवाजीमहाराजांनी औरंगजेबाला आपल्या सर्वनाशी धोरणांपासून मागे वळण्याचा गंभीर इशारा दिला आहे. पत्रातील या सर्व गोष्टी पाहाता भारताच्या इतिहासातील हे महत्वाचे आणि मोलाचे असे पत्र म्हणावे लागेल. ह्या पत्रातील काही उतारे पुढे आहेत:

"नुकतेच माझ्या कानावर आले आहे की माझ्याविरुद्ध चालविलेल्या युद्धामुळे तुमचा खजिना रिकामा झाला आहे. खर्चाची तूट भरून काढण्यासाठी तुम्ही हिंदूंच्यावर जिझिया कर लादण्याचे ठरविले आहे. बादशहा सलामत, कुराणात परमेश्वराचे वर्णन रब्बुल आलमीन (सर्व जगाचा स्वामी) असे केले आहे. रब्बुल मुसलमीन (मुसलमानांचा स्वामी) असे नाही. वास्तविक पाहता हिंदू आणि मुसलमान म्हणजे त्या दिव्य दैवी संपदेचे दोन सुंदर आविष्कारच होत. मशिदीत प्रार्थनेची बांग देतात, तर मंदिरात घंटानादाच्या द्वारे परमेश्वराचे वैभव वर्णिले जाते. धार्मिक द्वेष बाळगणारा आणि धर्मवेडा माणूस हा परमेश्वराच्या आदेशाची अवज्ञा करणारा आणि आदेशाविरूद्ध वागणारा, असाच म्हणावा लागेल. त्या दैवी

1. अली, एम्. अत्हर, *मोगल नोबिलीटी अंडर औरंगजेब.*

चित्रकाराने काढलेल्या चित्रांवर टीका करणे म्हणजे चित्रकाराला दोष देणे असे होय. कोणत्याही निर्मितीमध्ये दोष दाखविणे याचा अर्थ हा की तुम्ही निर्मात्याला दूषणे देता आहात; असे करू नका.

न्यायबुद्धीने पाहाता कोणत्याही दृष्टीने जिझियाचे समर्थन होऊ शकत नाही. भारतात तर हे नवीनच आहे.''

## चार

महाराजांनी विजापूर शहरात संरक्षणासाठी 10 हजार घोडेस्वारांचे सैन्य पाठविले. याशिवाय धान्याच्या गोणीनी भरलेले 10 हजार बैल विजापूरकडे रवाना करण्यात आले. विजापूरकडे धान्य आदी रसद याचा पुरवठा करण्यासाठी जनतेला आज्ञा करण्यात आली. शिवाजीचा सेनापती आनंद रास 2 ते 3 हजार घोडेस्वार घेऊन विजापूरास आला.

सन 1679 च्या 7 ऑक्टोबर रोजी दिलेरखान हा विजापूर शहाराच्या इशान्येस 10 कि.मी. अंतरावर होता.

शिवाजीमहाराजही 10 हजार सैन्य घेऊन विजापूरला आले. त्यांनी विजापूरचा मुख्य प्रधान शिद्दी मसूद याच्याशी सल्लामसलत केली. त्यात असे ठरले की शिद्दी मसूद हा विजापूर शहराचे संरक्षण करील. शिवाजीमहाराजांनी मोगलांच्या दक्षिण सुभ्यात धुमाकूळ घालावा आणि अशा रीतीने मोगलांना विजापूरचा वेढा उठविण्यास भाग पाडावे.

त्या प्रमाणे इकडे विजापूरला दिलेरखानाचा वेढा चालू असताना महाराजांनी मोगलांच्या सुभ्यात प्रवेश केला. ते जेथे जेथे गेले तेथे तेथे हल्ले करीतच गेले. दक्षिणेचा सुभेदार राजपुत्र मुअज्जम हा अतिशय संतापला. त्याने बादशहाला पुढीलप्रमाणे कळविले, 'विजापूर जिंकून घेणे हे कठीण काम आहे. आणि दिलेरखान हा विनाकारण सार्वजनिक खजिना या कामावर उधळीत चालला आहे.' दिलेरखानला विजापूरच्या समोर अपयश आले ही गोष्ट त्याच्या मनाला अतिशय झोंबली. मग त्याने विजापूरच्या भोवतालचा प्रदेश कुठे उध्वस्त कर, कुठे शहर लुटून घे, कुठे रहिवाशांना कैद कर असे प्रकार चालू केले. संभाजीराजांनी अशा अविचारी कृत्यांचा निषेध केला. शिवाजीमहाराजांच्या कडक शिस्तीत वाढलेले संभाजीराजे बरोबर असल्यामुळे दिलेरखानाचे मराठी राज्याविरुद्ध काही चालेना. मोगलांशी येऊन मिळण्यात आपण मोठा अविचार केला याचा संभाजी राजांना आता पश्चाताप होऊ लागला होता. महाराजांनी त्यांचे मन वळविले. सन 1679 च्या

20 नोव्हेंबर रोजी संभाजीराजे हे अथणी येथील मोगल छावणीतून निसटले. ते प्रथम विजापूरला गेले. तेथून ते नंतर सन 1679 च्या 5 डिसेंबर रोजी पन्हाळगडला आले.

**पाच**

त्या अवधीत मोगलांच्या दक्षिणेतील सुभ्यात शिवाजीमहाराज हे विजेच्या गतीने हल्ले करीत होते. ते वऱ्हाड आणि खानदेश या सुभ्यापर्यंत चाल करून गेले. या मोहिमेतील त्यांची नेत्रदीपक कामगिरी म्हणजे जालन्यावरील हल्ला आणि तेथील लूट ही होय. जालना हे औरंगाबादेहून केवळ 64 कि.मी. अंतरावर असलेले शहर आहे. महाराजाचा जालन्यावरील हल्ला हा नोव्हेंबरच्या शेवटच्या आठवड्यात झाला. जालन्याहून परत येत असताना महाराज हे पट्टयाच्या (ऊर्फ विश्रामगड) किल्यावर थांबले होते. तेथे त्यांना संभाजीराजे हे निसटले असून सुरक्षितपणे पन्हाळगडास आले आहेत अशी बातमी कळली. शिवाजीमहाराज आपल्या पुत्राला भेटण्यासाठी त्वरेने पन्हाळगडास गेले. पश्चातापाने पोळलेला मुलगा आपल्या पित्याच्या पायावर मस्तक ठेवतो असे हे हृदयविदारक दृश्य होते. विजापूरविरूद्ध दिलेरखानाने केलेले सर्व प्रयत्न फसले... औरंगजेबाच्या कडक आज्ञेमुळे दिलेरखानाने सन 1680 च्या 29 जानेवारी रोजी विजापूरचा वेढा उठवला. 'तुम्ही मोगल मुलखात परत या', असा हुकूम त्याला देण्यात आला होता. असे असूनही त्याने विजापूरचे मांडलिक असलेले लढाऊ बेडर जमातीचे सरदार यांच्यावर हल्ला चढविला. या लढ्यातही त्याची (दिलेरखानाची) फजिती झाली. मोगलांची जबर हानी झाली. त्यांच्या मृत आणि जखमी सैनिकांची संख्या 1700 होती. दिलेरखानाला पराभव पत्करावा लागला. त्याने शेवटी भिमा नदी ओलांडली आणि बहादूरगड येथे आपला तळ दिला. दिलेरखान आणि दक्षिणेचा मोगल सुभेदार राजपुत्र मुअज्जम ह्या दोघांनाही दरबारात परत बोलविण्यात आले. सन 1680 च्या मार्चमध्ये बहादूरखानाची दक्षिणेचा सुभेदार म्हणून पुन्हा एकदा नेमणूक झाली.

किती उपरोधपूर्ण घटना पहा! पुन्हा एका मोगल सेनापतीला फजिती होऊन परत जावे लागले. अशा प्रकारे फजिती झालेल्या अधिकाऱ्यांच्या दीर्घ मालिकेत आणखी एकाची भर पडली. शाइस्तेखान, महाबतखान, बहादूरखान, दिलेरखान आणि राजपुत्र मुअज्जम ही ती माणसे होत. मोगलांचा संधिसाधूपणा, त्याच्यातील चिकाटीचा अभाव, तत्वशून्य कारस्थाने, आज या राज्याबरोबर तर उद्या दुसऱ्या राज्याबरोबर हात मिळविणे, या सर्व गोष्टींचा हा परिणाम होता. आपल्या उत्तर

आयुष्यात औरंगजेब हा आपल्या पत्रात पुढीलप्रमाणे तक्रार करतो, 'दक्षिणेतील माझे सेनापती हे अकार्यक्षम ठरले, त्यांनी आपल्या कर्तव्याकडे दुर्लक्ष केले. त्यामुळे दक्षिणेतील मोहिमेचे नेतृत्व करण्यासाठी मला स्वत:ला यावे लागले.' औरंगजेबाच्या धोरणाला यश आले नाही याची जबाबदारी कुणावर? या अपयशाला फक्त एक मनुष्य जबाबदार, आणि तो म्हणजे औरंगजेबच होय. शिवाजीमहाराजांना ब्रिटिशांशीही लढावे लागले. जंजिऱ्याचे शिद्दी यांच्या विरुद्ध शिवाजीमहाराजांनी संरक्षक उपाय योजले त्यातून हे युद्ध उद्‌भवले. जंजिऱ्याचे शिद्दी हे मोगलांचे आरमार किंवा त्या नावाने जे काही ओळखले जात होते ते चालवित होते. खांदेरीचे बेट येथे किल्ला बांधून ते ठिकाण मजबूत करावे असे महाराजांनी ठरविले.

या घटनेने आपल्या हितसंबंधांना धोका निर्माण होईल अशी ब्रिटिशांना जाणीव झाली. मुख्य प्रदेशातून खांदेरीच्या बेटाकडे रसद आदी सामान पोहोचू नये असे त्यांनी प्रयत्न केले. सप्टेंबर महिन्यांत ब्रिटिशांच्या एका पथकाने लेफ्टनंट थॉर्प याच्या नेतृत्वाखाली खांदेरी बेटावर हल्ला चढविला. तो हल्ला फसला. थार्प, ब्रॅडबरी आणि हेन्री वेल्च हे मारले गेले. बरेच लोक जखमी झाले. जॉर्ज कोल आणि इतर अनेक लोकांना कैद करण्यात येऊन बेटावर (खांदेरी) ठेवण्यात आले. हा वृतांत कळविताना रिव्हेंज या जहाजाचा कप्तान मिंचिन् हा सन 1679 च्या 19 सप्टेंबर रोजी म्हणतो, 'या वेळी जर शत्रू चालून आला तर मी स्वत:चे संरक्षण करू शकेन अशी माझी परिस्थिती नाही. आपण लवकरात लवकर नवीन सैनिक तरी पाठवावे किंवा पुढे काय करावे यासंबंधी आदेश तरी पाठवावेत अशी नम्र विनंती आहे.'

त्यानंतर ब्रिटिशांनी खांदेरी बेटाला रीतसर वेढा घालण्याचे ठरविले. ब्रिटिश आरमारचा प्रमुख म्हणून कॅप्टन रिचर्ड किलाबिन याची नेमणूक करण्यात आली. सन 1679 च्या 18 ऑक्टोबर रोजी मराठे आणि ब्रिटिश यांच्यात आरमारी युद्ध झाले. लढाई निकराची झाली. मराठा आरमारने माघार घेतली खरी, पण तिने एका ब्रिटिश अधिकाऱ्याला कैद केले. ब्रिटिशांनी बेटाला घातलेला वेढा फसला. मराठे मोकळेपणाने मुख्य प्रदेशातून बेटाकडे सामानसुमान पाठवू लागले आणि बेटावर किल्ला आधी बांधून बेट बळकट करू लागले.

ब्रिटिशांना एक गोष्ट माहीत होती ती ही की शिवाजीमहाराज हे आपल्या स्वत:च्या प्रदेशात सैन्याची जय्यत तयारी करीत आहेत, आणि हे करण्यामागे त्यांचा हेतू मुंबई या बेटावर स्वारी करण्याचा आहे. या युद्धात जंजिऱ्याचा शिद्दीही पडला. आणि त्याने खानदेशावर हल्ला चालू केला. मराठ्यांनी खांदेरी बेटाचे मोठ्या निर्धाराने रक्षण केले.

ब्रिटिशांच्या दृष्टीने ही मोहीम अयशस्वी तर झालीच. ती त्यांना अतिशय महागात पडली. खुद्द मुंबईला जो धोका निर्माण झाला तो सहजपणे नजरेआड करण्यासारखा नव्हता. सन 1680 च्या जानेवारी महिन्याच्या तहाने ब्रिटिशांनी आपले आरमार खांदेरी बेटावरून काढून घेतले. 27 जानेवारी रोजी त्यांनी आपल्या आरमारला परत येण्याची आज्ञा केली. 31 जानेवारी रोजी ब्रिटिश लिहितात, 'हे हेन्द्री केन्द्री (खांदेरी-उंदेरी) प्रकरण झालेच नसते तर किती बरे झाले असते. शिवाजीचे सैनिक खांदेरीवर आहेत, ज्या चिकाटीने ते ठाण मांडून बसले आहेत ती पाहून सारे जण चकित झालेत.'

अशा रीतीने शिवाजीमहाराज आणि ब्रिटिश यांच्या मधील आरमारी संघर्ष समाप्त झाला. शिद्यांच्या बरोबर चाललेले युद्ध रेंगाळत होते. पोर्तुगीजांच्या बाबतीत महाराजांची तक्रार होती. आश्वासन दिल्याप्रमाणे ते रामनगरची चौथाई देत नव्हते. महाराजांनी त्यांच्याविरुद्ध तयारी सुरू केली होती. पोर्तुगीज म्हणजे एक ऱ्हास पावत जाणारी शक्ती होती. ही जाणीव पोर्तुगीजांनाही होती. त्याचबरोबरच मराठ्यांचा वैभव सूर्य उदय पावत आहे याची त्यांना (पोर्तुगीजांना) तीव्र जाणीव होती.

मोगलांशी युद्ध चालूच होते. सन 1680 च्या 24 फेब्रुवारी रोजी खानदेशातील सोपडा या गावाहून लिहिताना ब्रिटिश म्हणतात, 'शिवाजीच्या सैन्याबद्दल म्हणाल तर त्यांनी इकडील प्रदेश बहुतेक लुटून आणि जाळपोळ करून उध्वस्त केला आहे. फक्त जी शहरे त्यांना चौथाई देतात त्यांनाच ते संरक्षण देतात. शिवाजीचे सैन्य मोरो पंडिताच्या (मोरोपंत) नेतृत्वाखाली असून ते येथील सरहद्दीवर आहे. इकडील भागातील जे जे किल्ले म्हणून घेता येतील ते ते घेण्याच्या प्रयत्नात ते (मराठा सैन्य) आहेत. त्यांनी (मराठ्यांनी) आतापर्यंत हनुमंतगडाचा किल्ला घेतला आहे. कोणी म्हणतात की ते सुरतेकडे वळणार आहेत तर कुणी म्हणतात की ते ब्ऱ्हाणपूरकडे जातील.' रजपूतांच्या मोहिमेत औरंगजेब गुंतला होता. उत्तरेत त्याच्याकडे जाण्याच्या तयारीत राजपुत्र मुअज्जम आणि दिलेरखान हे होते. अशा परिस्थितीत मोगल हे शिवाजीविरुद्ध काहीच करू शकत नव्हते. पन्हाळगड येथे आपला मुलगा संभाजी याला भेटण्यासाठी शिवाजीमहाराज त्वरेने आले. पितापुत्रात दिलजमाई झाली. राज्यकारभारात आपल्या मुलाला अधिक प्रामुख्याने मिळवून घ्यावे याची निकड महाराजांना जाणवू लागली. राज्याचा मोठा भाग, शक्य तर दक्षिणेकडचा, संभाजीराजांच्या अमलाखाली दिला तर कसे असाही विचार त्यांच्या मनात खेळत असला पाहिजे. परंतु अंतिम निर्णय घेणे शक्य नव्हते.

महाराज हे आपला धाकटा मुलगा राजाराम याची मौंज आणि लग्न ही उरकून

घेण्यासाठी रायगडास परतणार होते. समारंभ संपल्यानंतर पन्हाळगडास परत यावे आणि संभाजीमहाराजांसंबंधी कायमची व्यवस्था करावी अशी त्यांची इच्छा होती. पण नियतीच्या मनात दुसरेच काही होते! पन्हाळगडावरून परत येताना महाराज हे सज्जनगडावर समर्थ रामदास यांच्या सहवासात काही दिवस राहिले.

राजारामाची मौंज ही 7 मार्च रोजी आणि लग्न 15 मार्च रोजी, अशी पाठोपाठ झाली.

यानंतर शिवाजीमहाराज लवकरच आजारी पडले. सभासद आणि इतर बखरकार यांच्या मते तो नवज्वर होता (टाईफॉईड). अल्पकालीन आजारानंतर त्यांचे 3 एप्रिल 1680 रोजी निधन झाले.

ब्रिटिशांच्या मते महाराजांचा मृत्यू रक्तस्त्रावामुळे (ब्लडी फ्लक्स) झाला. पोर्तुगीजांच्या मते गळू किंवा बेंड (ॲप्सेस) ह्यामुळे झाला. मोगलांच्या मते रक्ताच्या उलट्या होऊन झाला.

महाराजांचा मृत्यू ज्वर आणि रक्ताची आव यामुळे झाला असण्याचा संभव दिसतो.

# 10

# उपसंहार

## एक

**शिवाजीमहाराजांच्या** मृत्यूच्या कारणासंबंधी अनेक अफवा उठल्या. त्या सर्व बिनबुडाच्या होत्या आणि महाराजांच्या मृत्युनंतर बराच काळ लोटल्यावर त्या प्रसृत झाल्या. या अफवांत काही म्हणता काहीच तथ्य नव्हते. महाराजांचा मृत्यू हा नैसर्गिक कारणाने झाला. एक अत्यंत असाधारण व्यक्तिमत्व समाप्त झाले. तीस वर्षांच्या काळात महाराजांनी स्वतंत्र राज्याची स्थापना केली. प्रबळ अशा मोगल साम्राज्याला आव्हान दिले आणि पुढील पिढ्यांना कधीही उणे न पडणारे, स्फूर्तिदायक असे आपले नाव मागे ठेवून ते गेले.

शिवाजी महाराजांचा जन्म एका उमराव घराण्यात झाला होता. आपल्या साध्वी मातोश्रींच्या देखरेखीखाली ते लहानाचे मोठे झाले; त्यामुळे महाराजांचा दृष्टिकोन विशाल आणि उदार झाला. सर्व धर्मांचा ते आदर करू लागले आणि मान ठेवू लागले. ज्या साधूंचा ते आदर करीत त्यापैकी कोकणचे बाबा याकूब हे एक होते. जाती आणि धर्म यांची ही बंधने न पाळता त्यांनी सर्व धर्माच्या संस्थांना आणि प्रार्थना स्थळांना मुक्त हस्ताने अनुदाने दिली. इतिहासकार ख्वाफीखान याने नमूद करून ठेवले आहे की, 'लुटालुटीत कुराणाची एखादी प्रत हाती पडली तर शिवाजी ही ती प्रत योग्य त्या आदराने त्या प्रतीच्या मालकाकडे परत करीत असे. युद्धात सापडलेले कैदी, स्त्री आणि बालके यांच्याशीही त्याची वागणूक अशाच प्रकारची असे.' सर्व धर्माचे लोक त्यांच्या संबंधी असलेली ही सहानुभूती ही महाराजांना जी प्राप्त झाली, ती त्यांच्या खोलवर असलेल्या धार्मिक वृत्तीतूनच निर्माण झाली होती. औरंगजेबाचा लढाऊ कर्मठपणा पाहिला तर महाराजांची उदार वृत्ती हे अगदी विरुद्ध असलेले दुसरे टोक होय.

शिवाजीमहाराजांनी विजापूर किंवा मोगल यांच्याविरुद्ध जो लढा दिला तो हिंदू आणि मुलमाान मुसलमान यांच्यातील होय असे समजणे हे चूक आहे. शिवाजीमहाराजांनी राजकारणात प्रवेश केला तोपर्यंत विजापूर हे मोगलांचे

मांडलिक बनले होते. विजापूरची शक्ती आणि वर्चस्व ही ऱ्हास पावत होती. विजापूर राज्यातील पठाण, दक्षिणी आणि हबशी हे सत्तेसाठी झगडत होते. मोगल हे उघड उघड ह्या संधीचा लाभ घेत होते. विजापूरचे सरदार एकतर मोगलांना जाऊन मिळत होते किंवा अर्धस्वतंत्र बनू पहात होते. शिवाजीमहाराजांना जो वडिलोपार्जित मुलुख मिळाला होता तो त्यांचा देशच होता. तेथे आपली सत्ता बळकट करणे आणि आपली सत्ता वाढविणे हे योग्य होईल असे त्यांना वाटणे साहाजिकच आहे. शिद्दी जौहर हा कर्नूलला स्वतंत्रपणे जर वागू शकतो, आपल्या बंकापूरच्या तळावर पठाण बहलोलखान हा जर विजापूरच्या सत्तेला आवाहन देऊ शकतो तर शिवाजीमहाराज याच भूमीतले आणि येथील रहिवाशांचेच पुढारी. मराठा राज्याची स्थापना करण्यासाठी त्यांनी झटावे यापेक्षा आणखी तर्कशुद्ध गोष्ट कोणती असू शकते? महाराजांचे राज्य हे प्रामुख्याने विजापूर राज्यातूनच घडवलें गेले. कोकण आणि वरघाटी मुलूख हे त्यांचे मुख्य तळ होते. विजापूर आणि शिवाजीमहाराज यांच्यातील लढा दीर्घ काळ चालला. शेवटी विजापूर राज्याचे दक्षिणेकडील प्रदेश शिवाजीमहाराजांच्या ताब्यात आले. विजापूरला तो प्रदेश गमवावा लागला.

शहाजहानच्या काळात मोगलांना विजापूर आणि गोवळकोंडा ही दक्षिणेतील राज्ये खालसा करून आपल्या साम्राज्याला जोडावीत असे वाटले नाही. ती मांडलिक म्हणून राहिली; तर त्यांची हरकत नव्हती. पण औरंगजेब हा दक्षिणेचा सुभेदार म्हणून आला आणि ती राज्ये नष्ट करण्याची महत्वाकांक्षा त्याला निर्माण झाली. शिवाजीमहाराजांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांनी चालविलेला लढा हा आपले अस्तित्व टिकविण्याचाच होता. मोगलांची दृष्टी विस्ताराची होती आणि मराठे लढत होते ते स्वदेशाच्या सुरक्षिततेसाठी. हा उद्देशच साधासुधा नव्हता, ज्याच्यासाठी लढा द्यावा आणि ज्याच्यासाठी प्राण अर्पण करावे अशा तोलामोलाचे हे ध्येय होते. ह्या लढ्यांत मराठ्यांना नेतृत्व लाभले ते तरी कोणाचे? तर एका असामान्य आणि नरश्रेष्ठ पुरूषाचे! नेतृत्वाला लागणारे योग्य ते व्यक्तिमत्व महाराजांपाशी होते. गौर वर्ण, मध्यम बांधा, पिळदार शरीरयष्टी, तीक्ष्ण आणि तळपणारे स्मित, हे त्यांचे व्यक्तिमत्व. महाराज म्हणजे नेतृत्व करण्यासाठीच जन्माला आल्यासारखे वाटत. सन 1666 मध्ये एका रजपूताने आग्रा येथे त्यांना पाहिले. त्याने महाराजांचे वर्णन पुढील प्रमाणे केले आहे.[1] 'बांध्याने मध्यम (*डॉल सो हकीर*), विलक्षण गोरा

---

1. राजस्थानी रेकॉर्डस्: *शिवाजीज् व्हिजिट टू आग्रा*

(*अजायब गोरो*), प्रत्यक्ष राजाच वाटतो (*आपही राजसि दिसो जी*). [1]

महाराजांच्या भोवती माणसे गोळा झाली. संकटाच्या समयी महाराज आपला जीव धोक्यात घालण्यास कधीही मागेपुढे पाहात नसत. लोकांना असाच पुढारी हवा होता तो त्यांना मिळाला. महाराजांशी अफझलखानाशी भेट, शायिस्तेखानवरील रात्रीचा हल्ला, आग्रा येथील भेट, अशी अनेक उदाहरणे सांगता येतील. महाराजांना भीतीचा स्पर्शही होत नसे, हे दाखविणारे हे प्रसंग होत. त्यांची लष्करी यंत्रणा पाहिली तर त्यांच्याकडे युद्धक्षेत्रात अगदी नवीन मार्ग शोधून काढण्याचे श्रेय जाते. संरक्षणाची स्थळे निर्माण करताना त्यांनी सह्याद्रीच्या पर्वतरांगांचा भरपूर उपयोग करून घेतला. घाटावर आणि समुद्रकिनाऱ्यावर त्यांनी अनेक किल्ले बांधले. कित्येक किल्ल्यांची डागडुजी करण्यात आली. किल्ल्याकिल्ल्यातून कसलेली शिबंदी ठेवण्यात येऊन त्याना बळकटी आणण्यात आली. प्रतापगड आणि जिंजीचे किल्ले, सिंधुदुर्गचा सागरी किल्ला, असे अनेक किल्ले पाहिले तर महाराजांच्या लष्करी तंत्रशास्त्रातील कुशलतेची साक्ष पटते.

महाराजांनी स्वत: आपले सैन्य उभे केले. हे सैन्य संपूर्णपणे त्यांच्या नियंत्रणाखाली असे. मनसबदारी पद्धतीमुळे मोगल सैन्यात जे दोष निर्माण झाले होते त्यांचा महाराजांच्या सैन्यात मागमूसही नव्हता. मनसबदारी पद्धतीमुळे मोगल सैन्य म्हणजे सरंजामी पथकाचा एक विस्कळीत मेळावा याहून आधिक स्वरूप नव्हते. शिवाजीमहाराजांच्या सैन्यात डामडोल अगर वैभव यांचा दिमाख नव्हता, पण त्याबरोबरच मोगल सैन्यात आढळून देणारी मंद गतीही नव्हती. महाराजांच्या सैन्यात सैनिकांचा पगार रोख देण्यात येई आणि तोही वेळेवर. सैन्यातील सर्व घोडे राज्यसरकारच्या मालकीचे असत. ते स्वारांच्या मालकीचे नसत. महाराजांच्या सैन्याच्या हालचाली अतिशय चपळ असत. कित्येक वेळा त्यामुळे शत्रू गोंधळून जात असे. फ्रेंचांच्या मते शिवाजीमहाराजांच्या यशाचे रहस्य त्यांच्या चपळ हालचालीत होते. महाराजांच्या सैन्यातील शिस्त अतिशय कडक असे. उभ्या पिकाचे कसलेही नुकसान होता कामा नये ह्याविषयी सैन्याला कडक हुकूम दिलेले असत. मोहिमेत मिळविलेल्या लुटींचा भरणा खजिन्यात करावा लागे. सैन्य छावणीत असेल तेव्हा तिला रसदेचा पुरवठा त्या कामासाठी गोळा करून ठेवलेल्या धान्य आदी सामुग्रीतूनच होई. प्रजेला त्रास देणे किंवा सामानसुमानाची जबरदस्तीने खरेदी करणे असे प्रकार अजिबात घडता कामा नयेत असे सैन्याला स्पष्टपणे बजावण्यात आले होते.

सरकारी सेवेच्या भरतीत मग ती लष्करी असो अगर मुलकी, जात जमात,

अगर धर्म असा भेदभाव मुळीच पाळण्यात येत नसे. सैन्यात प्रामुख्याने स्वराज्याचे भूमीपुत्रच असत. सर्व जातींचे हिंदू, किनारपट्टीवरचे मुसलमान, सर्वांना आरमारात नोकऱ्या मिळत. शिवाजी महाराजांनी तर जंजिऱ्याच्या शिद्दीना मराठा आरमाराचे अधिपत्य देऊ केले होते. त्यांची अट एकच होती आणि ती म्हणजे शिद्दयांनी राष्ट्रीय धारेमध्ये येऊन मिळावे. महाराजांच्या सेवेत बरेच मुसलमान अधिकारी होते. काही नावे घ्यायची असली तर फोंड्याचा किल्ला जिंकणारा इब्राहिम आणि मराठा आरमाराचा अधिकारी दौलतखान ही नावे घेता येतील. शिवाजीमहाराजांचे मुख्य बळ त्यांचे अश्वदळ आणि किल्ले यांत होते. पण दर्यावर्दी आणि आरमारी क्षेत्रात शिवाजीमहाराजांना नवनिर्मितीचे प्रवर्तक असेच म्हणणे योग्य ठरेल. मोगलांनी आपल्या स्वत:च्या आरमाराकडे खंत वाटण्याएवढे दुर्लक्ष केले होते. ते इतके की मक्केच्या यात्रेसाठी त्यांच्या जहाजांना पोर्तुगीजांकडून परवानापत्रे (पासपोर्ट) मिळवून सुरक्षिततेची व्यवस्था करावी लागली. शिवाजीमहाराजांनी सन 1657 मध्ये आरमाराची स्थापना केली. ही अत्यंत श्रेयस्कर घटना आहे. समुद्रावर पहारा देण्यासाठी किनाऱ्यावर अनेक किल्ले बांधण्यात आले. पोर्तुगीज, ब्रिटिश, शिद्दी आणि मोगल यांच्यावर प्रभावी नियंत्रण ठेवण्यात आले.

महाराजांनी आपल्या हेरखात्याकडे दुर्लक्ष केले नाही. महाराजांची ही हेरयंत्रणा कार्यक्षम होती. तिच्यावर भक्कम खर्च करण्यात येई. मराठा सैन्याची ती एक मोठी उपयुक्त बाजू होती.

## दोन

शूर आणि धाडसी शिवाजीमहाराज हे आपल्या काळातील नामवंत सेनानायक म्हणावे लागतील. आपली साधने मर्यादित आहेत याची त्यांना जाणीव होती. आपल्या शत्रूपाशी प्रचंड साधनसामग्री आहे याची त्यांना जाणीव होती. त्यांनी शत्रूच्या प्रत्येक मर्मस्थळाचा पुरेपूर फायदा घेतला. त्यांच्या हालचालीवर ते बारकाईने लक्ष ठेवून असत. स्वत:च्या हालचाली ते अशा करीत की शत्रू अवघड ठिकाणी कोंडीत पकडला जावा. एकाहून अधिक शत्रू एकत्र होऊन चालून आले की त्यांच्यामध्ये पाचर ठोकून पुन्हा शत्रूंची जूट मोडून काढीत.

सन 1670 मधील नाशिक जिल्ह्यातील बागलाणातील त्यांच्या मोहिमेचा म्हणजे महाराजांच्या लष्करी डावपेचांचा उत्कृष्ट नमुना होय. मोगलांचे सैन्य अहमदनगरच्या दक्षिणेकडून स्वराज्यावर चाल करून येण्यास सज्ज झाले होते. त्यांच्याशी उघड सामना देणे महाराजांना शक्य नव्हते. त्यामुळे महाराजांनी

नाशिकच्या पश्चिम भागावर हल्ला चढविला. दक्षिणेकडे चाल करून जाणाऱ्या मोगलांस पश्चिमेकडे वळावे लागले. या घटनेमुळे स्वराज्याचे संरक्षण झाले. इतक्यावरच थांबले नाही. महाराजांनी नाशिक प्रांतातील किल्ले इतक्या बळकटपणे आपल्या ताब्यात ठेवले होते की त्या प्रदेशातून मराठ्यांना काढून लावण्यासाठी मोगलांना एकोणीस वर्षे झटावे लागले. याचा परिणाम असा झाला की पुढील वर्षांत मोगलांना आपले डावपेच बदलावे लागले आणि हा बदल मोगलांना प्रतिकूल ठरला.

दक्षिण सुभ्यातील विविध भागांत महाराजांनी यशस्वी आक्रमणे केली. त्यामुळे मोगलांची सतत तारांबळ उडू लागली. महाराजांचे युद्धातील जे कौशल तेच राजकारणांत आणि मुत्सद्देगिरीत दिसून आले. महाराजांनी आपल्या संघर्षाचा पाया अधिक विस्तृत केला. मोगलांच्या विरूद्ध चाललेल्या लढ्यांत त्यांनी भारताचे अन्य भागही सामील करून घेतले. बुंदेलखंडचा वीर पुरूष छत्रसाल याने आपल्या देशातून मोगलांशी लढा चालू करावा यासाठी महाराजानी त्याला प्रोत्साहन दिले. बरेच रजपूत राजे महाराजांविषयी आदर बाळगून असत. महाराजांचा त्यांच्याशी संपर्क असे.

औरंगजेबाच्या लढाऊ कर्मठपणामुळे सर्वत्र असंतोष पसरला होता. महाराजांना त्यामुळे आपला लढा मोठ्या आत्मविश्वासाने व्यापक करणे शक्य झाले. पण लढ्यासाठी म्हणून त्यानी धार्मिक प्रश्न राबावेला नाही. मोगल साम्राज्याची मर्मस्थळे काय कमी होती? एकतर बादशहा हा कर्मठ. दुसरे असे की त्याला आपल्या स्वत:च्या तुर्क वंशाचा मोठा अभिमान वाटे. तिसरे असे की तो भारतीयांना कुचकामाचे समजे आणि मोगलांची नोकरशाही काय विचारावी? त्या नोकरशाहीतील बहुतेक अधिकारी इराण किंवा मध्य आशिया यामधून आलेले असत. ही परिस्थिती पाहाता या साम्राज्याचे नैतिक अधिष्ठान काय हाच प्रश्न विचारता येण्यासारखा आहे. मराठे, बुंदेल, यांसारख्या एतद्देशीय जमाती आणि तसे पाहू गेले तर वायव्य प्रांतातील पठाण हेही, यांनी या साम्राज्याचा विस्तार अडवून धरणे योग्य ठरले असते. हा लढा राजकीयच होता. शिवाजीमहाराजांनी विजापूर आणि गोवळकोंडा यांच्याशी केलेले तह पाहाता संकुचित जातीय विचारसरणी ही त्यांना कधी शिवलीही नाही हे दिसून येते.

आपल्या राज्यात धर्मवृत्ती जोपासली जावी आणि धर्माचे वातावरण पसरावे अशी शिवाजीमहाराजांची इच्छा होती. येथे धर्म हा शब्द सत्व या अर्थाने घेणे योग्य होईल. आपल्या सर्व कार्यामागे दिव्य दैवी शक्तीचे कृपायुक्त मार्गदर्शन लाभत आहे

अशी महाराजांची मनोमन श्रद्धा होती. शिवाजीमहाराजांनी स्थापन केलेल्या राज्यात सर्व धर्माबद्दल आदरभाव आणि उदार वृत्ती ही आढळून येते. आधुनिक युगातील धर्मनिरपेक्ष (सेक्युलर) राज्याची कल्पना अशीच आहे. महाराजांनी स्थापन केलेल्या राज्याची आणि आधुनिक काळातील अशा धर्मनिरपेक्ष राज्याच्या कल्पनेची जुळणी ही एकच आहे हे लक्षात येईल.

महाराजांच्या राज्यव्यवस्थेत राजा हा राज्याचा अधिपती असे. त्याला सहाय्य करण्यास अष्टप्रधानांचे मंडळ असे. मंत्र्यांना त्यांच्या खात्यांच्या जोडीला विशेष व्यवस्थेसाठी म्हणून निवडलेले प्रांतही जोडून देण्यात येत. (उदा. मोरोपंत पेशवे यांच्याकडे राज्याचा उत्तर भाग, दक्षिण भाग आण्णाजी दत्तोकडे आणि मध्यभाग दत्ताजी त्र्यंबक यांजकडे.) न्यायखात्याच्या यंत्रणेत कोणत्याही प्रकारचा हस्तक्षेप होत नसे. नायदानाचा पाया म्हणजे व्यवहार धर्म शास्त्र आणि परंपरागत चालत आलेले संकेत हे असत.

शिवाजी महाराज हे आपले राज्य हे कल्याणकारी राज्य व्हावे या साठी झटले. त्यांचे राज्य शेतकऱ्यांच्या अधिक जवळ आले. इनामाच्या द्वारे जमीन तोडून देण्यास महाराज नाखूष असत. पण केलेल्या सेवेचा मोबदला म्हणून रोख रकमा देण्याच्या धोरणास उत्तेजन देण्यात येई. सारा वसूल करणारे वंशपरंपरागत वतनदार असत. ते म्हणजे देशमुख आणि देशपांडे हे होत. त्यांचे महत्व कमी करण्यात आले आणि त्यांना शासकीय अधिकाऱ्यांच्या नियंत्रणाखाली ठेवण्यात आले. शेती आणि शेतकरी यांच्यासंबंधीची धोरणे अशी : नवीन जमिनी लागवडीखाली आणण्यात आल्या, जमिनीची मोजणी करण्यात आली आणि त्यांच्यावर योग्य तो सारा आकारण्यात आला. बेकायदेशीर पट्ट्यांची सक्तीने होणारी वसूली बंद करण्यात आली. तरूणांना मोठ्या संख्येने सैन्यात आणि इतर क्षेत्रात रोजगार उपलब्ध झाले. हे सुद्धा जनतेच्या सर्व थरांना लाभलेले वरदानच म्हटले पाहिजे.

व्यापार आणि उदीम यांच्याकडेही दुर्लक्ष करण्यात आले नाही. या क्षेत्रासाठी कायदेकानू आणि नियम बनविण्यात आले. आयात आणि निर्यात यावरील जकातीचे दर हे ठरविण्यात आले. व्यापाऱ्यांनी स्थायिक व्हावे आणि मालाची ने-आण मोकळेपणाने करावी यासाठी त्यांना सर्व प्रकारे उत्तेजन देण्यात आले.

सज्जन साधुसंत, विद्वान, कवी, आदीना महाराजांनी चांगला आश्रय दिला. संत-सज्जनाबद्दलचा महाराजांचा भक्तिभाव हा परिचित आहे. त्यांचा सहवास ते नेहमी शोधीत. तुकाराम, रामदास, मौनीबाबा, बाबा याकूब ही त्यापैकी काही नावे. त्यांच्या राजवटीत साहित्यालाही उदार आश्रय मिळाला. परमानंद, जयराम, गागाभट्ट

यांसारखे संस्कृत पंडित आणि भूषणांसारखा हिंदी कवी यांचा त्यांनी मोठा मानसन्मान केला. त्यांच्या प्रेरणेने राज्यव्यवहारकोश निर्माण झाला. हा कोश म्हणजे शासकीय व्यवहारातील वापरले जाणारे दक्षिणी उर्दूतील शब्द आणि त्यांचे संस्कृत पर्याय असा होय. हा सन 1679 मध्ये तयार झाला. हा (उर्दूचा) पहिलाच कोश होय आणि उर्दू-संस्कृतचा एकमेव कोश होय.

# 11

# निवडक संदर्भ ग्रंथ


## 1. संस्कृत

बेंद्रे वा सी (संपादन) . **श्री शिवराज्याभिषेक,** पी. पी. एच्. बुक स्टॉल, मुंबई 1959.

हनुमंते, रघुनाथपंत . **राजव्यवहारकोश,** (संपादन) आपटे आणि दिवेकर, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे, 1925.

परमानंद, कवींद्र : **शिवभारत,** संस्कृत संहिता आणि मराठी भाषांतर, (संपादन आणि प्रकाशन) दिवेकर, मुंबई 1927.

परमानंद कवींद्र · **परमानंद काव्य,** (संपादन) गो. स. सरदेसाई, ओरिएण्टल इन्स्टिट्यूट, बडोदे, 1952.

पिण्ड्ये, जयराम : **पर्णाल पर्वत ग्रहणाख्यान,** संस्कृत संहिता आणि हिंदी भाषांतर, (भाषांतर आणि संपादन) देवीसिंह चौहान, महाराष्ट्र सभा, पुणे, 1970.

सकळकळे, संकर्षण : **शिवकाव्य,** (संपादन) गोस्वामी, भारत इतिहास संशोधक मंडळ, त्रैमासिक, अंक 1 ते 4, 1974: ''शिवाजीची बिकानेरचा रजपूत राजा राव कर्ण याच्याशी गुप्त सल्लामसलत.''

## 2. मराठी

अमात्य, रामचंद्रपंत : **आज्ञापत्र,** (संपादन) डॉ व्ही. डी. राव, 1955

आपटे आणि दिवेकर, (संपादन) : **शिवचरित्र,** भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे, 1925.

आवळसकर, (संपादन) : **ऐतिहासिक साधने,** महाराष्ट्र शासन, 1963.

आवळसकर, (संपादन) : **रायगडची जीवनकथा,** महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई, 1962.

बनहट्टी (संपादन) : **आज्ञापत्र,** 1961.

बेंद्रे, वा. सी. : **श्री छत्रपति शिवाजीमहाराज,** मुंबई 1972.

बेंद्रे, वा. सी. : **छत्रपति संभाजी महाराज,** पुणे, 1960.

भावे : **युगप्रवर्तक शिवाजीमहाराज,** पुणे, 1955.

डी. ब्रागान्झा, ए. बी. : **मराठ्यांच्या इतिहासाची साधने,** खंड 2, आशिया, भाषांतर एस्. एस्. देसाई, विश्वकोश कार्यालय, वाई, 1968.

गोखले, कमल : **शिवपुत्र संभाजी,** ज्ञानविज्ञान विकास मंडळ, पुणे, 1971.

काळे : **छत्रपति शिवाजीमहाराज,** पुणे विद्यापीठ, पुणे, 1960.

खरे, ग. ह. : **महाराष्ट्राची चार दैवते,** पुणे, 1958.

खरे, ग ह. : **स्वराज्यातील तीन दुर्ग,** पुणे.

खरे, ग. ह., (संपादन) : **ऐतिहासिक फारसी साहित्य,** खंड 1 ते 4, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे.
महाजन, (संपादन) : **शिंदखेडकर जाधवराव यांची बखर,** महाजन, यवतमाळ.
पवार, आप्पासाहेब, (संपादन) : **ताराबाईकालीन कागदपत्रे,** खंड पहिला, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, 1969.
फाटक, न. र. : **श्री समर्थ चरित्र,** चित्रशाळा प्रेस, पुणे, 1959.
पिसुर्लेकर, पी. एस. : **पोर्तुगीज-मराठे संबंध,** पुणे विद्यापीठ, 1967.
राजवाडे, वि. का. : **मराठ्यांच्या इतिहासाची साधने,** खंड 8, 15, 20.
साने, का. ना. (संपादन) : **चिटणीस बखर,** 1924.
साने, का. ना. (संपादन) : **सभासद बखर,** 1923.
सरदेसाई, गो. स. : **शककर्ता शिवाजी,** ढवळे, मुंबई, 1935.
शेजवलकर : **शिवछत्रपती,** मराठा मंदिर, मुंबई, 1964.
वाकसकर, (संपादन) : **सभासद बखर,** व्हीनस प्रकाशन, पुणे, 1962.
वाकसकर, (संपादन) : **एक्याण्णव कलमी बखर,** 1930.
**ऐतिहासिक संकीर्ण साहित्य,** सर्व खंड, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे.
**मोर बखर,** इतिहास संग्रह, 1909.
**शिवचरित्र साहित्य,** सर्व खंड, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे.
**शिवकालीन पत्रसारसंग्रह,** तीन खंड, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे

## 3. हिंदी- उर्दू

कोटे (संपादन) : **संपूर्ण भूषण,** 1930.
मुल्ला नुस्त्रती : **तारीखे इस्कंदरी,** (संपादन), श्रीदेवीसिंह चौहान, महाराष्ट्र राष्ट्र भाषा सभा, पुणे, 1969.
सरकार जदुनाथ आणि डॉ. रघुवीर सिंह : "**शिवाजीची आग्रा येथे औरंगजेबाशी भेट**" राजस्थानी रेकॉर्डस्, कलकत्ता, 1963.
तिवारी गोरेलाल : **बुंदेलखंडका संक्षिप्त इतिहास,** नागरी प्रचारिणी सभा, काशी, 1934.
**बुसातीनु स्सल्लातीन,** हिंदी भाषांतर, बडोदे, 1995.

## 4. फारसी हस्तलिखिते*

हफ्त अंजुमन : **जयसिंगाची पत्रे.**
**इन्शाये खान मुहम्मद,** ओरिएण्टल मॅन्युस्क्रिप्ट लायब्ररी, हैद्राबाद.
**कुतूते शिवाजी**
**कारनामा जेठमल**
सक्सेना भीमसेन : **तारीखे दिल्कुशा**

* वरील हस्तलिखितांच्या प्रती मुंबई येथील सरकारी दफ्तरखान्यात आहेत.

## 5. फारसी मुद्रित ग्रंथ

खरे आणि कुळकर्णी, (संपादन) : **ऐतिहासिक फारसी साहित्य,** खंड 6, औरंगजेबाच्या दरबारचे अखबार, फारसी संहिता आणि मराठी, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे, 1973.
काजिम, मिर्जा मुहम्मद : **आलमगिरनामा,** बिब्लियोथिका इंडिका सेरीज, कलकत्ता, 1867.
लाहोरी, अब्दुल हमीद : **बादशाहनामा,** बिब्लियोथिका इंडिका सेरीज, कलकत्ता, 1867.
**दक्षिणच्या सुलतानांचे फर्मान आणि सनदा,** सरकारी दफ्तरखाना, आंध्र प्रदेश शासन, हैदराबाद.
खान, मोतेमद, **इक्बालनामा, फारसी संहिता,** बिब्लियोथिका इंडिका सेरीज, कलकत्ता, 1965.
खान, मुहम्मद साकी मुस्तैद : **मासिरे आलमगिरी,** (संपादन) अहमद अली, बिब्लियोथिका इंडिका सेरीज, कलकत्ता, 1870- 73.
खान, शाह नवाज, **मासिरूल् उमरा,** (संपादन) अशरफ अली, बिब्लियोथिका इंडिका सेरीज, 1887–95.
खान मुहम्मद हाशिम ख्वाफी, **मुंतखबुल्लुबाब,** बिब्लियोथिका इंडिका सेरीज, कलकत्ता, 1869.
**फारसी पत्रे, ताराबाईकालीन कागदपत्रे,** शिवाजी विद्यापीठ प्रकाशन, कोल्हापूर, 1971.
**औरंगजेबाच्या कारकिर्दीची निवडक कागदपत्रे,** 1659 ते 1706, सेंट्रल रेकॉर्डस् ऑफिस, आंध्रप्रदेश शासन, हैदराबाद.
**शहाजहानच्या कारकिर्दीची निवडक कागदपत्रे,** दफ्तर दिवाणी माल, हैदराबाद 1950.

## 6. इंग्रजी

बाळकृष्ण, डॉ. . **शिवाजी द ग्रेट,** खंड 1 आणि 2, भाग 2, तारपोरवाला, मुंबई, 1932.
गुणे, व्ही टी. : **मराठ्यांची न्यायपद्धती,** पुणे, 1953.
हटाळकर, व्ही. जी. : **फ्रेंच आणि मराठे यांचे संबंध,** मुंबई विद्यापीठ, मुंबई, 1958.
खान, साकी मुस्तैद : **मासिरे आलमगिरी,** भाषांतर - सर जदुनाथ सरकार, कलकत्ता, 1947.
कुळकर्णी, ए. आर. : **शिवकालीन महाराष्ट्र,** पुणे 1969.
मनुची, निकोलावो, **स्टोरीया द मोगोर,** भाषांतर विल्यम इर्विन.
मुद्दाचारी, डॉ. : **सतराव्या शतकातील म्हैसूर मराठे संबंध,** प्रसारांग, म्हैसूर विद्यापीठ, म्हैसूर, 1960.
पटवर्धन, आर. पी. आणि रॉलिन्स एच्. जी. (संपादन) : **सोअर्स बुक ऑफ मराठा हिस्टरी,** खंड, मुंबई, 1929.
पवार, आप्पासाहेब : **स्टडीज इन् मराठा हिस्टरी,** खंड पहिला, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, 1971.
प्रसाद : **जहांगीरचे चरित्र,** ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, मुंबई, 1922.
पुणतांबेकर, एस्. व्ही. : **आज्ञापत्र,** डायोसेसन प्रेस, मद्रास, 1929.
सरदेसाई, जी. एस्. : (संपादन) **शिवाजी सोवेनीर,** के. बी. ढवळे, मुंबई, 1927.
सरकार, जदुनाथ : **शिवाजी,** सहावी आवृत्ती, एस्. सी. सरकार अँण्ड सन्स प्रायव्हेट लिमिटेड, कलकत्ता, 1961.
सरकार, जदुनाथः **हाऊस ऑफ शिवाजी,** दुसरी आवृत्ती, एस्. सी. सरकार अँण्ड सन्स प्रा. लिमिटेड कलकत्ता 1948.
सरकार, जगदीश नारायण : **द लाईफ ऑफ मीर जुमला,** ठाकुर स्पिक आणि कंपनी, कलकत्ता, 1933.

सेन, डॉ. एस्. एन्. : **फॉरेन बायोग्राफीज ऑफ शिवाजी,** कलकत्ता, 1927.

श्रीनिवासाचारी, सी. एस्. : **ए हिस्टरी ऑफ जिंजी अँण्ड इट्स रूलर्स,** अन्नमलाई नगर विद्यापीठ, 1943.

टाट्टण, इगर्टन ऑफ : **इंडियन अँण्ड ओरिएण्टल आर्मर,** लंडन 1896.

**इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी,** शिवचरित्र कार्यालय, पुणे, 1931.

**मसिरूल् उमरा,** भाषांतर - बेव्हेरिज आणि बेनीप्रसाद

**तुजुके जहांगीरी,** भाषांतर - राजर्स, (संपादन) बेव्हेरिज, खंड 2 आणि 3, 1909.

**मुद्रक :- जे.जे. आफॅसेट प्रिंटर्स, दिल्ली**